॥ महाराष्ट्र साहित्यसेवक ग्रंथमाला ॥

पुष्प ५ वें

# भारतीय संग्राम!

लेखक

गंगाधर रामचंद्र साने, बी. ए.



सन १९२४

किंमत २ रु.

॥ महाराष्ट्र साहित्यसेवक ग्रंथमाला ॥

पुष्प ५ वें

# भारतीय संग्राम !

लेखक

गंगाधर रामचंद्र साने, बी. ए.



आवृत्ति पहिली

सन १९२४

किंमत २ रु.

मूळ पुस्तकाचे मुद्रकः—**केशव रावजी गोंधळेकर, " जगद्धितेच्छु प्रेस, "** ५०७ शनिवार पुणें.

आभिप्रायाचा फॉर्म मुद्रकः—**गणेश काशिनाथ गोखले** सेक्रेटरी, **श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स**, ४९५ जमखंडीकरांचा वाडा, शनिवार पेठ **पुणें**.

प्रकाशकः—**गं. रा. साने**, १२२ शुक्रवार, पुणें.



# ॥ समर्पण ॥

ॐ

" नारायणं नमस्कृत्य नरंचैव नरोत्तमं । दैवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ॥ " ह्या प्रसिद्ध श्लोकांत ज्या महर्षिव्यासांना नमस्कार केला आहे व ज्यांची ज्ञानेश्वरांनीं—-

" भानुतेजें धवळलें। जैसें त्रैलोक्य दिसें उजळलें । तैसें व्यास-मतीं कवळिलें । मिरवें विश्व ।। " व—

" म्हणऊनि महाभारतीं नाहीं । तें नोहे लोकीं तिहीं । येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ " या सुंदर ओव्यांनीं आपल्या ज्ञानेश्वरीग्रंथारंभीं स्तुति गायिलीं आहे त्या, महाभारत-ग्रंथासारख्या राष्ट्रीयग्रंथ निर्माणकर्त्या,--

**महर्षि व्यासांचे चरणीं**

हा ग्रंथ

सादर समर्पीत आहे.

**--ग्रंथकर्ता.**



॥ श्रीगोपालकृष्णायनमः ॥

# प्रकाशकाचे चार शब्द.



ज्या मंगलमय प्रभूच्या कृपेनें प्रस्तुत ग्रंथ अखंड असा आज वाचकांचे हातीं देण्याचा योग लाधला त्याचे चरणीं आधीं आम्ही अनन्य नमस्कार करितों.

वास्तविक हा ग्रंथ प्रथम व द्वितीय अशा दोन खंडांतून प्रसिद्ध व्हायचा, व अशा भीतिनेंच आम्ही मागील पुष्पांत ह्यासंबंधीं लिहितांना 'प्रथम खंड' अशीं अक्षरें घातलीं होतीं. परंतु भगवान् श्रीकृष्णाच्या कृपेनें, मालेच्या सुदैवानें, व आजवरच्या विद्वान रसिकांच्या आशीर्वादानें, रसिक व गुणज्ञ अशा जगद्धितेच्छु छापखान्याचे मालकांनी आमच्या लेखनकीर्तिस लोभावून पुस्तक छापायला जायचे आधींच, त्यांतील एक ओळही न पाहतां, पुस्तकाच्या ३०० प्रती विकत घेण्याचें उदारमनस्क आश्वासन व तसा प्रत्यक्ष कागद आम्हांस लिहून दिला. त्या त्यांच्या प्रोत्साहनानें आह्मांस मग साहजीकच हुरूप येऊन आम्ही समग्र पुस्तक एकदमच छापण्याची त्यांस ऑर्डर दिली—कारण आमच्या मनांतूनही आम्हांस तसें करावें असें फार वाटत होतेंच. फक्त मालेच्या सांपत्तिक अडचणींस्तव जीव थोडासा घुटमळत होता इतकेंच. अशा स्थितींत आर्थिकदृष्ट्या बिनमोल हात देऊन श्रीयुत नानासाहेब गोंधळेकर यांनीं जो रसिक गुणग्राहीपणा प्रकट केला व आम्हांस संपूर्ण ग्रंथ एकदम छापण्याचे कामीं जे उदारमनस्क साहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहों. रसिकांनीं त्यांच्या गुणज्ञतेचें चीज करावें, अशी आमची सर्वांस नम्र प्रार्थना आहे.

तसेंच हा ग्रंथ वास्तविक पाहतां 'जुलैच्या पहिल्या पंधरवड्यांत' प्रसिद्ध व्हावयाचा; पण येत्या जून–जुलैंत आम्हांस कदाचित् मुंबईस कांहीं महत्वाच्या कामासाठीं जावें लागून तिकडे आमचा सुमारें एक वर्षभर मुक्काम होण्याचा संभव आहे. तेव्हां त्याच्या आधीं हें पुष्पप्रकाशनाचें काम येथेंच उरकून जावें ह्मणजे मुंबईस जावेंच लागल्यास तेथील काम मग निश्चितपणें करतां येईल असें आम्हांस वाटलें. म्हणून हें पुस्तक दोन महिने आधीं काढीत आहों. पुढील पुष्प, मुंबईस जावेंच लागल्यास, तिकडून आल्यावर मार्चचे सुमारास काढूं. मालेच्या ग्रंथप्रकाशनांतील नित्यास्थिरक्रमांत मागें पुढें झालेल्या व होणाऱ्या या अपरिहार्य कार्यक्रमाला गोड मानून घेऊन वाचकवर्ग त्याजबद्दल राग

मानणार नाहीं अशी आशा आहे. मुंबईस न गेल्यास पुढील पुष्प नेहमीप्रमाणें जानेवारीचे प्रारंभास प्रसिद्ध होइलच.

"भगवान् श्रीकृष्ण" या पुस्तकाप्रमाणेंच प्रस्तुत ग्रंथाची हस्तलिखित प्रत लिहिण्याचें काम चालूं असतां आमचे मित्र रा. भिंगे यांनीं ज्या बिनमोल सूचना दिल्या व आमचे प्रेमळ व रसिक वडील बंधु ती. त्रिंबकराव यांनीं मधून मधून वाचून पाहून जो अपूर्व उत्साह दिला त्याबद्दल आम्ही दोघांचेहि अत्यंत आभारी आहोंत.

तसेंच नानाविध कामें मागें असूनही प्रो. ल. ग. लेलेशास्त्री; प्रो श्री. नी. चापेकर, व श्रीयुत ल. ब. भोपटकर यांनीं प्रस्तुत ग्रंथवाचनाची तसदी घेऊन आम्हांस आपले मार्मिक अभिप्राय लिहून दिले याबद्दल त्यांचे कोणत्या शब्दानीं आभार मानावे तेंच आम्हांस समजत नाहीं!

'माले' चें द्वितीय पुष्प "भगवान् श्रीकृष्ण" व तृतीय पुष्प "अलौकिक आत्मयज्ञ" व "कविसंसार" हीं पुस्तकें खलास झालीं असून त्यांची लवकरच द्वितीयावृत्ति काढावी लागणार आहे. पण "सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः" ह्या न्यायानें, द्रव्याभावामुळें तें काम लांबणीवर पडत आहे. तरी मालेच्या गरीब स्थितीकडें लक्ष देऊन वरील श्री. नानासाहेबांप्रमाणें कोणी रसिक व उदार-मनस्क दाता उभा राहिल्यास 'माले' चें हें व इतरही इच्छित कार्य तडीस जाणार आहेत. महाराष्ट्रांतील कोणा रसिक धनिकास अशी स्फूर्ति होईल काय? आमच्या प्रेमळ वाचकांनीं आम्हांस अजून एक एक दोन दोन जरी वर्गणीदार मिळवून दिले तरीहि मालेला बरेंच साहाय्य होणार आहे. तरी वाचकांनी तसा अवश्य यत्न करावा अशी आमची त्यांस नम्र विनंति आहे.

सरते शेवटीं पुस्तक सुबक छापून दिलें याबद्दल श्रीयुत नानासाहेब गोंधळे-कर यांचे व श्री गणेश प्रिंटिंग वर्क्सचे रा. गोखले यांचे आभार मानून व शक्य तितकी काळजी घेऊनही पुस्तकांत कांहीं किरकोळ मुद्रणदोष राहून गेले असल्यास वाचकांनीं त्याबद्दल क्षमा करावी अशी प्रार्थना करून पुरें करतों.

पुणें शहर<br>
शुक्रवार १२२<br>
ता. १०।५।२४

सर्वांचा नम्र—<br>
साहित्य सेवक<br>
**गं. रा. साने.**

———

# पोंच व अभिप्राय.

येथील ए. पी. बापट अँड ब्रदर्स. यांचेकडून 'सुभेकल्याण' ही उत्कृष्ट कादंबरी, व " बालस्वामी विवेकानंद " व " कै. नामदार गोखले " ह्या ' बालचरित्र मालिके'च्या दोन ' कलिका ' आमच्याकडे अभिप्रायार्थ आल्या आहेत. ह्या दोन कलिका प्रसिद्ध लेखक रा. भाऊ श्रीधर कुलकर्णी यांनीं गुंफिल्या असून त्यांचें रंग, रूप, चांगलें असून वासही मधुर आहे. रा.बापट यांनीं हें मालाकाराचें कार्य हातीं घेऊन लहान मुलांच्यासाठीं पुस्तकें काढण्याचा आरंभिलेला उद्योग स्तुत्य व उत्तेजनार्ह आहे. वरील कलिकांच्या किंमती माफक म्हणजे प्रत्येकीं ४ आणे प्रमाणें आहेत. ' सुभेकल्याण'वर सविस्तर अभिप्राय पुढील खेपेस देऊं.

**गं. रा साने.**

---

# मालेचीं इतर पुस्तकें व नियम.

**पुष्प १ लें**—' कमला ! ' किं. १० आणे. प्रो. ल. ग. लेलेशास्त्री यांची मार्मिक प्रस्तावना. ' ज्ञानप्रकाश ' ' स्वराज्य ' इ० चे उत्तम अभिप्राय.

**पुष्प २ रें**:—' भगवान् श्रीकृष्ण !' किं. १ रु. या पुस्तकाच्या कीर्तिबद्दल वेगळें लिहिण्याचें कारणच नाहीं. याचीं २।४ पुस्तकें नुकतींच हातीं आलीं आहेत. तीं नवीन वर्गणदार होणारांसच मिळतील.

**पुष्प ३ रें**:—( १ ) " अलौकिक आत्मयज्ञ !" किं. ८ आणे.

( २ ) " कविसंसार! " किं. १३ आणे; पैकीं "कविसंसारा" च्या प्रती शिल्लक नाहींत. " अ. आत्मयज्ञ " याच्या २।४ प्रती आहेत. त्या अर्थात् नवीन वर्गणीदार होणारांसच मिळतील.

**पुष्प ४ थें**:—'लीला !' किं. १ रु. या पुस्तकाबद्दल अंगापूरचे इनामदार रा. देशमूख आम्हांला लिहितातः—

" I am glad to write to you that the "लीला" you newly published is very good. "

**पुष्प ५ वें**:—" भारतीय संग्राम !" किं. २ रु. या पुस्तकाच्या प्रतीही थोड्याच काढल्या असल्यामुळें लवकर घेण्याची त्वरा करा ! मागाहून पस्तावाल !

**नियमः**--( १ ) १ रु. प्रवेश फी भरून मालेचे कायम वर्गणीदार होणारांस ' मालेचीं सर्व नवीं जुनीं पुस्तकें ३/४ किं. स मिळतील.

( २ ) पुस्तकें खलास झाल्यावर त्याबद्दल आम्ही जबाबदार नाहीं. पुन्हां तीं छापून झाल्यावर पाहिजे त्यास मिळतील.

**सूचनाः**—प्रथम, चतुर्थ व पंचम पुष्प एकदम घेतल्यास ट. ख. सुद्धां ३/८४ स देऊं तरी या अमूल्य संधीचा अवश्य फायदा घ्या व आजच मागवा !

पत्ताः—**गं. रा. साने**, १२२ शुक्रवार, पुणें.

# विद्वानांचे अभिप्राय.

१

## ( प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले. )

रा. रा. गंगाधर रामचंद्र साने, बी. ए. यांनीं लिहिलेलें ' भारतीय संग्राम ' हें पुस्तक मीं अथपासून इतिपर्यंत वाचिलें. पुस्तकाच्या नांवावरूनच त्यांतील विषयाचा बोध चटकन् होतो. महर्षि व्यास यांच्या अपूर्व महाभारतग्रंथांतील कौरवपांडवीय भाऊबंदकीचा सारांश या पुस्तकांत दिला आहे. शंतनुराजापासून तों पांडवस्वर्गारोहणापर्यंतची कथा यांत चातुर्यानें व रसिकपणानें संकलित केली आहे. हीं कथा या पूर्वी कित्येक लेखकांनीं मराठी गद्यांत संक्षेपानें कथन केलेली आहे. रा. आपटे यांचें ' बालभारत ' केवळ बालांकरितां बालबोध रीतीनें लिहिलेलें आहे. रा. लिमये, रा. द्रविड वगैरेंचा प्रयत्न प्रौढ-विद्यार्थ्यांकरितां किंबहुना सुजाण वाचकांकरितां आहे. रा. साने यांचा प्रयत्न या दुसऱ्या प्रकारच्या वाचकांकरितां आहे असें दिसून येतें. एकाच ग्रंथावर इतक्या लेखकांच्या उड्या पडल्या आहेत ही गोष्ट मूलग्रंथाच्या उत्तमत्वाची साक्ष पटविणारी आहे. रुचिभेदानें, भिन्न दृष्टिकोणानें व विशिष्ट भाषाशैलीनें प्रत्येक लेखकाच्या अशा कृतीला थोडें बहुत अभिनवत्व येत असतें. या कारणांमुळेंच प्रस्तुत ग्रंथालाही एकप्रकारचा नवीनपणा आला आहे. भारतीय युद्धाची हकीकत सांगतांना रा. साने यांनीं ठिकठिकाणीं काव्यपद्धतीचा स्वीकार केल्यामुळें तिला मनोहरपणा आला आहे. मूळांतील उद्दीपक प्रसंग त्यांनीं मराठींत तसेच उठविण्याचा केलेला प्रयत्न यशस्वी झाला आहे. त्यामुळें कथा कोठेंहि कंटाळवाणी वाटत नाहीं. उचित अलंकारांनी, दृष्टांतानीं व तुकाराम, वामन, श्रीधर, ज्ञानेश्वर, मयूरपंडित, व कित्येक आंग्लकवि यांच्या प्रसन्न व रमणीय कृतींतील सरस वचनांच्या उपन्यासानें कथाप्रबंधास वैचित्र्य व सौंदर्य आलें आहे. करुण, वीर, रौद्र, अद्भुत व भयानक या रसांच्या तरंगिणींचें या ग्रंथांत. प्रसंगोपात्त उठलेले कल्लोळ सहृदयास क्षणैक आत्मवश करून टाकतील. रा, साने यांच्या भाषेंत रस उभा करण्याचें सामर्थ्य किती आहे याची कल्पना यावरून सहज करतां येईल. महाभारतांतल्या मुख्य पात्रांच्या शीलाची छाननी हाही या ग्रंथाचा एक विशेष आहे. यांत लेखकानें बरीचशी चिकित्सक दृष्टी ठेवून समतोलपणा कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

या बाबतींत लेखकाच्या विचारसरणीशीं सर्वच वाचकांचें सर्वांशानें ऐकमत्य झालें नाहीं तरी लेखकाचा हा प्रयत्न प्रामाणिकपणाचा आहे आणि म्हणूनच कुतूहलास्पद झाला आहे. कथा प्रसंगानें नीति व बोध यांचे धडे प्रेमळपणानें व रसिकपणानें रा. साने यांनीं वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रशंसनीय प्रयत्न केला आहे. प्रस्तुत पुस्तकांत कित्येक लहान मोठे दोषही आहेत. तथापि त्यांनीं ग्रंथाच्या सरसतेची फारशी हानि झालेली नाहीं म्हणून या लहानशा अभिप्रायांत त्यांचा उल्लेख करण्याचें कारण नाहीं. एकंदरीत प्रस्तुत पुस्तक सरस, रमणीय, चित्ताकर्षक, प्रबोधक अतएव संग्राह्य आहे. महाराष्ट्रांतील वाचकवर्ग याचा योग्य परामर्श घेतील असा भरंवसा आहे.

---

२

## (श्री ल. ब. भोपटकर.)

रा. रा. गंगाधर रामचंद्र साने यांनीं लिहिलेला " भारतीय संग्राम "नांवाचा ग्रंथ मी समग्र वाचला; व लिहिण्यास आनंद वाटतो कीं, तो फारच सरस व सुरेख लिहिला गेला आहे. याच विषयावर मराठी वाङ्मयांत कांहीं ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. ते सर्व जरी मी वाचलेले नाहींत, तथापि जे वाचलेले आहेत त्यांची व या ग्रंथाची तुलना केली असतां मला रा. साने यांच्या ग्रंथास बरेंच वर स्थान द्यावेंसें वाटतें. रा. साने यांनीं धांवत्या परंतु चटकदार भाषेंत महाभारताचें सार दिलेलें आहे. परंतु माझ्या मतें या ग्रंथाचा विशेष हा आहे कीं, पूर्वग्रह अथवा परंपरा यांच्या भीडेस न पडतां, ग्रंथकारानें भारतीय युद्धांतील सर्व ठळक पात्रांच्या गुणदोषांचें विवेचन आपल्या समजुतीप्रमाणें केलेलें आहे. तें सर्वांना सारखेंच पटण्यासारखें जरी नसलें, तरी, या दिशेनें झालेला त्यांचा हा प्रयत्न सर्वस्वीं अभिनंदनीय आहे, यांत मुळींच शंका नाहीं. पांडवांचा पक्ष सत्य व कौरवांचा पक्ष असत्य असें म्हणण्याची धाटणी जरी कैक वर्षें पडून गेलेली असली, तरी पण एखाद्या निःपक्षपात चिकित्सकाला कौरवपक्ष निर्भेळ असत्यावर उभारलेला व पांडवपक्ष निर्लेप सत्यानें ओथंबलेला असा दिसतोच असें नाहीं. किंबहुना तो निरनिराळ्या प्रसंगांची चिकित्सा निर्विकार मनानें करूं लागल्यास, आस्तें आस्तें सत्याचा कांटा कौरवपक्षाच्या बाजूस झुकत चाललेला पाहून, साहाजिकपणें

त्याच्या ठायीं कौरवांविषयीं सहानुभूतीचे अंकूरही फुटूं लागतात. भारतीय युद्धांत ज्यांनीं भाग घेतलेला होता त्यांच्यापैकीं प्रमुख पात्रांचा विचार केला असतां एक भगवान् श्रीकृष्ण यांच्याशिवाय पांडवपक्षांकडील बाकीचीं पात्रें भीष्म, कर्ण, द्रोणाचार्य, दुर्योधन, अश्वत्थामा वगैरे पात्रांपुढें फिकीं दिसूं लागतात; इतकेंच नव्हे तर श्रीकृष्णाच्या एकजात व एकनिष्ठ सहाय्यावांचून कुरुक्षेत्रावर पांडव-पक्षाचा धीमोड होण्यास खाचित चुकतांना, अशी मनाची खात्री होऊं लागते. सबंध भारतीय युद्धाचा उगम धर्मराजाच्या जुगारी स्वभावांत झालेला आढळून येतो. असा एकही आणीबाणीचा प्रसंग दाखवितां येत नाहीं कीं, जेथें श्री-कृष्णाच्या युक्तिबाज स्वभावानें पांडवांना त्यांतून सुरक्षितपणें निभावून नेलेलें नाहीं. पांडवपक्षाच्या म्हणजेच अखेरीस विजयी झालेल्या पक्षाच्या एका अभिमानी इतिहासकारानें किंवा अभिमानी इतिहासकारांनीं महाभारत ग्रंथ लिहिलेला असल्याचा छाप त्यावर ढळढळितपणें उमटलेला दृष्टीस पडतो. महाभारतांत वर्णिलेल्या प्रसंगांचा इतिहास कौरवपक्षाच्या अभिमान्यांनीं कशा रीतीनें लिहिला असता, व त्यांचीं अनुमानें व विधानें कोणत्या प्रकारचीं झालीं असतीं, हा खरोखर विचार करण्यासारखा प्रश्न आहे, व माझ्या मतें या बाब-तींत रा. साने यांचें विवेचन अत्यंत सहाय्यभूत झाल्याविना खाचित राहणार नाहीं. एखाद्या पारंपरिक ग्रंथकाराप्रमाणें रा. साने यांनीं आपली दृष्टी दूषित न ठेवितां, प्रत्येक प्रसंगाचें विवरण व प्रत्येक पात्राचें स्वभावाविष्करण त्यांनीं स्वतंत्र बुद्धीनें करण्याचा जो प्रयत्न केलेला आहे तो स्तुत्यर्ह होय. त्यांचा ग्रंथ स्वतंत्र विचारसरणीस चालना दिल्याशिवाय खास राहणार नाहीं. ही विचारसरणी गेल्या अनेक शतकें लुप्त झाल्यामुळेंच महाभारताचें सतत पठण व अध्ययन चाल-लेलें असतांना सुद्धां त्याचा राष्ट्रीय चारित्र्यावर विशेषसा परिणाम झालेला दृष्टो-त्पत्तीस येत नाहीं !

पुणें, ता. १३ मे १९२४ **ल. ब. भोपटकर.**

---

३

## ( प्रो. श्री. नी. चापेकर. )

पुस्तकाच्या नांवावरूनच, तें महाभारतांतील मुख्य मुख्य कथाभागांचें आधु-निक पद्धतीनें केलेल्या संक्षिप्त निवेदनपर आहे, ही गोष्ट सहज ध्यानांत येण्या-

सारखी आहे. सदरहू पुस्तकाची हस्तलिखित प्रत व त्याचे छापील फर्मे-दोन्ही मी बहुतेक वाचले. हस्तलिखित प्रत पाहिली तेव्हां, महाभारताचें अशा तऱ्हेनें साधारण वाचकांस चित्ताकर्षक व बोधप्रद होईल असें रा. साने यांनीं तयार केलेलें रूपांतर मला आवडल्याचें मी त्यांना त्या वेळींच कळविलें होतें. सदरहू पुस्तक आतां मुद्रित स्वरूपांत महाराष्ट्रवाचकवर्गास सादर होत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. 'कमला' 'भगवान् श्रीकृष्ण' 'पंतांचा संसार' 'सिंहगड' वगैरे आपल्या कृतींच्या द्वारा रा. साने हे मराठी वाचकांच्या चांगल्या परिचयाचे झालेच आहेत. तेव्हां प्रस्तुत पुस्तकासंबंधानें विस्तारानें कांहीं सांगण्याची विशेषशी आवश्यकता नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, 'भगवान् श्रीकृष्ण' या पुस्तकांत ज्या आधुनिक दृष्टीनें आणि सत्कवींच्या परिणामकारक अवतरणांच्या विपुल मिश्रणयुक्त मधुर व चटकदार भाषाशैलीनें रा. साने यांनीं एकंदर श्रीकृष्णचरित्र व त्याचप्रमाणें त्यांतील विशेष बोधपूर्ण व अर्थपूर्ण प्रसंग ग्रथित केले आहेत, तीच दृष्टी व तीच भाषाशैली 'भारतीय संग्राम' याही पुस्तकांत रा० साने यांनीं कायम ठेविली आहे. प्रसंगविशेषीं प्रौढ वयाच्या सुसंस्कृत व गंभीर वृत्तीच्या एखाद्या वाचकांस रा० साने यांची भाषाशैली फारच अलंकारिक व कृत्रिम भावनोत्कटतेनें नटलेली अशी वाटली तरी ती साधारण दर्जाच्या वाचकास अनुकूल आहे; आणि मूळ विषयच गंभीर, उदात्त आणि स्वाभिमानपोषक असल्यामुळें, अशा तऱ्हेच्या भावनोत्कटतेनें, इष्ट परिणामाच्या बाबतींत, हानीऐवजीं जास्त फायदाच होण्याचा संभव आहे असें मला वाटतें. आतांपर्यंत लेखनव्यवसायाच्या सरावानें रा० साने यांच्या भाषाशैलीस एक प्रकारचा नीटस बांधेसूदपणा व ठरेल चटकदारपणा प्राप्त झाला आहे. त्यामुळें त्यांचीं पुस्तकें साधारण वाचकवर्गांत बरींच लोकप्रिय व परिणामकारक होतील असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

म्हणूनच, रा० साने यांचें प्रस्तुत पुस्तक चांगलें लोकाश्रयास पात्र होवो आणि त्यांच्या हातून दीर्घकालपर्यंत अशीच वाङ्मयसेवा अखंड उत्साहानें घडत राहो असें मी मनःपूर्वक इच्छितों.

पुणें,
सोमवार, चैत्र वद्य, १० मी, शके १८४६
ता. २८।४।२४

श्री. नी. चापेकर.

# पुस्तकांतील भागांची सूची.






# भारतीय संग्राम.

## भाग १ ला.



या हिंदुस्थान देशास भारतवर्ष किंवा भारतभूमि अशी संज्ञा आहे. त्यामध्यें सूर्य व चंद्र किंवा सोम अशीं दोन कुलें प्रसिद्ध होतीं. नुकत्याच* सांगितलेल्या रामायण कथेंतील रामप्रभु हे सूर्य-वंशीय होते. महाभारतांतील पात्रें चंद्रवंशांतील आहेत—इंदुकुलांतील आहेत. या कुलांमध्यें शंतनु या नांवाचा एक राजा होऊन गेला. तो एकदां गंगेच्या कांठावरून जात असतां प्रत्यक्ष गंगेनें अत्यंत सुंदर स्त्री रूप घेऊन त्यास दर्शन दिलें व त्याच्या विनवणीवरून ती त्याची बायको होण्यास कबूल झाली. परंतु तिनें एक लोकविलक्षण अट घातली. ती अशी कीं, "मला जितकीं मुलें होतील तितकीं मी गंगेंत नेऊन समर्पण करीन. त्याला तुमची ना नसावी व तुम्ही हरकत केल्यास मी तेथेंच गुप्त होईन." ह्या तिच्या अटीस तिच्या रूपास भुललेला बापडा शंतनु कबूल झाला. तो जरी रूपविमोहित होता तरी गंगेसारखी स्त्री त्याची भार्या होण्यास कबूल झाली ही एकच गोष्ट त्याच्या पवित्र तपश्चर्येची द्योतक आहे. अस्तु. याप्रमाणें त्यांचा संबंध झाल्यावर पुढें ठरल्याप्रमाणें गंगा प्रत्येक मूल भागीरथींत नेऊन टाकी

---

* प्रस्तुत ग्रंथ रामायणानंतर लिहिला आहे. रामायणही वाचकांस लवकरच सादर करण्याचा आमचा विचार आहे.

—ग्रंथकर्ता.

व प्रत्येक वेळीं बिचाऱ्या शंतनूचा जीव खालवर होई. पण करतो काय? आधींच कबुली देऊन चुकला होता. गंगा मात्र गंगेच्या कांठीं उभी राहून म्हणे:–" गंगे ! गोदे ! यमुने ! माझा नोहे तुझाचि हा बाळ। जतन करी गे ! यातें स्वाधिन केला न कापितां नाळ। " व खरोखरच ती त्या मुलास गंगेंत सोडून देई ! शंतनूच्या अलिप्तपणाची अथवा मायाजाळापासून दूर रहाण्याची ही एक परीक्षा ऊर्फ कसोटीच होती. करतां करतां सात मुलें बुडवीपर्यंत शंतनूनें कसाबसा दम काढला. पण आठव्या मुलाचे वेळीं मात्र त्याच्यानें दम निघेना. प्रत्येक मूल हिच्यानें गंगेंत बुडवतें तरी कसें असें त्यास वाटलें. व अशीं सर्वच मुलें बुडविल्यास आपला वंश तरी पुढें कसा चालेल हीही त्याला एक काळजीच पडली व म्हणून या खेपेस मात्र त्या मुलास घेऊन गंगा भागीरथीतिरीं धांवत असतां शंतनु तिच्या मागें " थांब, थांब. तूं इतके पुत्र मारिलेस, आतां एवढा तरी मला दे " असें ओरडत धांवला. त्याबरोबर त्या मुलासह गंगा ताबडतोब अंतर्धान पावली. तेंच बालक ' भीष्म ' या नावानें पुढें प्रसिद्धीस आलें. याप्रमाणें शंतनूचा मुलगा म्हणून 'शांतनव' किंवा गंगेचा मुलगा म्हणून 'गांगेय' अशीं त्याचीं नांवें होतीं. हें बालक पुढें फारच अद्वितीय असें निर्माण झालें. कडकडीत ब्रह्मचर्य, अलोट स्वार्थत्याग, भयंकर सत्यप्रतिज्ञ, विलक्षण शूर व निस्सीम कृष्णोपासक इत्यादि अनेक दृष्टीनें एक अद्वितीय हिरा म्हणून त्यांची ख्याति आहे. महाभारतांतील ठळक पात्रांपैकीं ते एक आहेत. त्यांचे वर वर्णिलेले एक एक गुण क्रमाक्रमानें वाचकांस कळणारच आहेत. अस्तु. याप्रमाणें भीष्म हळुं हळूं मोठे झाले–युवराज झाले–तारुण्यावस्थेंत त्यांनीं पाऊल टाकलें. अशा वेळीं ' गौरी ' सारख्या एखाद्या सुंदर तरुण कुमारिकेच्या प्रेमपाशांतही ते अडकले असण्याचा संभव आहे. कारण अजूनपर्यंत आजन्म ब्रह्मचर्यव्रताची शपथ घेण्याचा प्रसंग त्यांस आलेला नव्हता. पण त्याच वेळीं एक मोठा चमत्कारिक प्रसंग उद्भवला. राजा शंतनु यमुनेच्या कांठीं फिरावयास गेला असतां 'मत्स्यगंधा' या नांवाच्या एका खुपसुरत कोळ्याच्या मुलीवर त्याचें मन बसलें. व तिच्या ध्यासानें तो जवळ जवळ वेडा झाला. त्यास अन्नपाणी गोड लागेना कीं राज्यकारभारांत त्याचें लक्ष लागेना. त्यानें तिच्या बापाजवळ

तिच्यासाठीं मागणी घातली. पण 'तिच्या मुलाबाळांनाच वंशवरंपरेनें राज्याची गादी मिळेल तरच आपण तिला देऊं' अशी तिच्या बापानें अट घातली. त्यामुळें राजा शंतनु पेंचांत पडल्यासारखा झाला. कारण तिच्या बापाच्या अटीस कबूल होणें म्हणजे लाडक्या भीष्माच्या भावी संसारसुखावर आपण होऊन निखारे ठेवणें आहे हें त्यास ठाऊक होतें. परंतु त्या सुंदरीचा मोहही त्यास आवरेना. तिच्या ध्यासांत वेडापिसा होऊन विचारा विषण्ण चित्तानें काळ कंठीत होता. पण हा पेंच आमच्या बहाद्दर भीष्मानें सोडविला! आपल्या वडिलांची प्रीति मत्स्यगंधेवर जडली आहे व आपल्या भावी मुलांबाळांचा अडथळाच काय तो वडिलांच्या सुखाच्या आड येत आहे असें कळतांच त्या वीरानें तिथल्यातिथें सर्व दिक्पालांना व आकाशस्थ देवांना साक्षी ठेवून " मी आजन्म ब्रह्मचारी राहीन " अशी भयंकर–भीष्म–प्रतिज्ञा केली. " हा भीष्म! हा भीष्म!" असे त्यावेळीं लोकांनीं उद्गार काढले. आकाशांतून त्यावर पुष्पवृष्टी झाली! केवढी ही भयंकर प्रतिज्ञा! असल्या भयंकर प्रतिज्ञेमुळेंच त्यास " भीष्म " ( म्हणजे 'भयंकर' ) हें नांव प्राप्त झालें. बापाच्या सुखासाठीं आयुष्यांतल्या अत्यंत रम्य सुखावर देखील लाथ मारणारा व त्यासाठीं " गौरी " सारख्या बालिकेचें संभवनीय असें दृढ प्रेमबंधनही खाड्‌दिशी तोडणारा अलौकिक वीर भारतवर्षांतच निर्माण व्हावयाचा! असो. आपल्या मुलानें केलेला हा अलौकिक स्वार्थत्याग पाहून शंतनूस काय वाटलें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. शंतनूनें त्यावर प्रसन्न होऊन " तूं इच्छामरणी होशील " असा त्यास आशिर्वाद दिला! असो. पुढें मत्स्यगंधेचा व शंतनूचा विवाह होऊन शंतनूस चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन मुलगे झाले. याच मत्स्यगंधेस लग्नापूर्वी पराशर ऋषीपासून कृष्णद्वैपायन व्यास–ह्या कथेचा लेखक–महाभारतग्रंथकर्ता–झाला होता. असो. विचित्रवीर्याच्या जन्मानंतर लवकरच शंतनु दिवंगत झाला. व त्याचे पाठोपाठ तीन वर्षांनीं चित्रांगद एका तुंबळ युद्धांत मरण पावला. तेव्हां अल्पवयी विचित्रवीर्याच्या नांवानें भीष्म राज्यकारभार पाहूं लागले. विचित्रवीर्य मोठा झाल्यावर भीष्मांनीं काशीराजाच्या तीन कन्या–अंबा, अंबिका व अंबालिका–

अशा एका लढाईंत जिंकून आणल्या. पैकीं अंबेचें मन भीष्मावरच बसलें. पण आजन्म ब्रह्मचर्यव्रताच्या प्रतिज्ञेमुळें त्यांनीं तीस नाकारिलें. त्याचा त्या दुष्टेनें पुढें विलक्षणच सूड घेतला, तो कथाभाग भीष्मांच्या मृत्युप्रसंगीं येईलच. विचित्रवीर्यापासून, राहिलेल्या दोन्ही मुलींस–त्याच्या बायकांस–कांहीं मूलबाळ न होतांच तो अवघ्या सात वर्षांत क्षयरोगानें मरण पावला व पुढें शेवटीं गादीला वारस कोण असा प्रश्न येऊन पडला. त्यावेळेस नियोग पद्धतीनें व्यासांपासून दोघींस दोन मुलगे होण्याची भीष्मांनीं व्यवस्था केली. एकीस धृतराष्ट्र व दुसरीला पांडु असे दोन पुत्र झाले. व्यासांचें तेज सहन न झाल्यामुळें डोळे मिटल्याचा परिणाम आंधळा धृतराष्ट्र जन्मास आला. पांडु हा पंडुरोगी होता व धृतराष्ट्र आंधळा झाला. म्हणून पुन्हा एकदां नियोग करावा असें ठरलें. पण या खेपेस त्या मुलींनीं आपली एक दासीच धाडून दिली. तिच्यापासून झाला तो 'विदुर' होय. याप्रमाणें तिन्ही वेळां प्रकरण फसलें. पण एकदांची कशीबशी गादीच्या वारसाची चिंता संपली.

या ठिकाणीं 'भीष्मांच्या भयंकर भुली' संबंधीं वाचण्यांत आलेले एका लेखकाचे चार शब्द सांगणें अवश्य आहे, व ते हेच कीं "पितृभक्तीच्या उसळीबरोबर त्यांनीं जी भयंकर प्रतिज्ञा केली ती आधीं योग्य नव्हती. कारण त्याचा परिणाम पंडु व आंधळ्या प्रजेच्या हातीं राज्यकारभार देण्यांतच झाला कीं नाहीं ? दुसरें असें कीं, विचित्रवीर्याच्या मृत्यूनंतर तरी निदान त्यांनीं राज्याच्या कल्याणासाठीं तरी आपली अविचारी प्रतिज्ञा मोडून लग्न करण्यास विशेष हरकत नव्हती. प्रत्यक्ष भगवंतांनींही आपली प्रतिज्ञा वेळनुसार मोडली आहे. त्यानें काय त्याना दूषण आलें? सत्यवती–मत्स्यगंधा–ही त्यास लग्न करण्यास सांगत होती पण एकाच कल्पनेनें–निदान एवढ्या बाबतींत तरी–भारलेल्या भीष्मांनीं तिला साफ सांगितलें कीं "कोणत्याही सुखाकरतां मी सत्य सोडणार नाहीं!" पण येथें प्रश्न स्वतांच्या सुखाचा नसून भावी प्रजेच्या व राज्यांतील जानपदाच्या सुखाचा होता. व "ज्यामुळें 'पुष्कळांचें पुष्कळहित' होतें तें सत्य ("यद्भूतहितमत्यंतंतत्सत्यमिति धारणा") ह्या त्यांच्याच भावी उपदेशाप्रमाणें त्यांनीं येथेंही वागावयास पाहिजे होतें, एवढेंच आमचें

म्हणणें. तेव्हां या कामीं भीष्मांची ' भयंकर भूल ' झाली असें आम्हांस वाटतें. " असो.

याप्रमाणें या कथेतील ' वीरां'चे व मुख्यपात्रांचे जनक अशारितीनें या भूतलावर अवतीर्ण झाले. व त्यांच्या नांवानें भीष्मांनीं हस्तिनापुरास राज्यकारभार पाहण्यास आरंभ केला. हळुहळु ' धृतराष्ट्र ' व ' पांडु ' हीं राजघराण्यांतील बालकें मोठीं होऊं लागून तरुण झालीं, तेव्हां भीष्माचार्यांनीं त्यांचीं लग्नें करून दिलीं. गांधार देशच्या राजाची मुलगी गांधारी या नांवाची होती तिच्याशीं धृतराष्ट्राचें लग्न झालें. यादवकुलांतील शूर राजाची मुलगी—कुंतिभोजास दत्तक दिलेली—कुंती म्हणून होती तिचें पहिलें नांव ' पृथा ' असें होतें. तिचा व पांडूचा विवाह झाला. हस्तिनापुराची गादी सार्वभौम होती. अर्थात् दोन्ही लग्नें मोठ्या कडाक्यानें व थाटमाटानें झालीं असतील हें सांगणें नकोच. पुढें यथाकालीं पांडुपासून कुंतीला ' धर्म, ' ' भीम, ' व ' अर्जुन ' असे तीन पुत्र झाले. मद्रदेशच्या राजाची मुलगी माद्री या नांवाची होती. पंडुराजाची ही दुसरी बायको होती. तिच्यापासून पंडूला ' नकुल ' व ' सहदेव ' असे दोन मुलगे झाले. पुढें कांहीं दिवसानीं पंडुराजा स्त्रियासमवेत हिमालयाचे अरण्यांत शिकारीसाठीं राहिला असतां त्यास मिळालेल्या शापाप्रमाणें वसंतऋतूच्या बहरांत झिरझिरीत असें एकच वस्त्र नेसलेल्या सुंदर माद्रीशीं विमूढपणें तो रममाण झाला असतांच मरण पावला व त्याबरोबर त्यास नको नको म्हणून त्या भयंकर विमोहनापासून दूर लोटण्याचा निष्फळ प्रयत्न करणारी पण अत्यंत पतिव्रता साध्वी माद्री ही सती गेली ! असो. पंडुराजाची पांचींही मुलें एक एक विशेष गुणानें विख्यात होतीं. इतकीं कीं, भीष्मावरून ज्याप्रमाणें घोर प्रतिज्ञा केली असतां " भीष्मप्रतीज्ञा केली " अशी म्हण पडली आहे, तसेंच या पांचापैकीं बहुतेक मुलांचीही उपमा अद्याप घेतली जाते. धर्मराज हे प्रत्यक्ष धर्माचा अवतार म्हणून प्रसिद्धीस आले. भीमदादा भयंकर शक्तिमत्तेचे व विलक्षण मल्लविद्येचे व गदायुद्धाचे आदर्श म्हणून विख्यात झाले. अर्जुनानें अलौकिक धनुर्धारी वीर म्हणून नांव मिळविलें. आणि तें साहजीकच आहे. कारण कीं यमधर्म, वायु व इंद्र ह्या तीन देवांनीं

कुंतीच्या ठिकाणीं आपल्या तेजांचे अंश ठेविले होते. त्यामुळें यमधर्माप्रमाणें न्यायी, वायूप्रमाणें बलवान् व इंद्रासारखा पराक्रमी असे धर्म, भीम व अर्जुन अनुक्रमें व्हावेत यांत कांहींच नवल नाहीं. नकुल सहदेवांची जोडी अश्वविद्येंत व वैद्यशास्त्रांत अति प्रविण होती. अस्तु. हे या मंडळींचे गुण हळुंहळुं आपणास कळून येणारच आहेत. इकडे धृतराष्ट्रापासून गांधारीस शंभर पुत्र व एक कन्या झाली. त्यांत दुर्योधन, दुःशासन, विकर्ण इत्यादि मंडळी प्रसिद्ध आहेत. दुर्योधनाचा जन्म युधिष्ठिराचे–धर्माचे–मागून झाला. येथेच भावी युद्धाचें कारण विधात्यानें गुंतवून ठेवलें; कसें तें पुढें आपण पाहूंच. दुर्योधनाचे जन्माचे वेळीं गर्दभध्वनिसारखीं बरींच अशुभ सूचक चिन्हें झालीं व त्याच्या परित्यागाची मूक सूचना धृतराष्ट्रास देऊं लागली. पण जिथें विदुरादिकांच्या स्पष्ट सांगण्याचाही उपयोग झाला नाहीं, तेथें बिचाऱ्या मूक उत्पातास कोण दाद देणार ? पुत्रमोहास बळी पडून आंधळ्या धृतराष्ट्रानें हा कौरववंशाचा भावी ‘ कुलांगार ’ तसाच जतन केला ! असो. दुःशीला नांवाची गांधारीस एक मुलगी झाली होती. तिला सिंधु देशाचा राजा जयद्रथ यास दिलें होतें. ह्या जयद्रथाच्या नीच कारस्थानाचा वाचकांस पुढें परिचय होणारच आहे. कुंतीला कौमार्यावस्थेंत सूर्यापासून एक पुत्र झाला होता. तो जगविख्यात अलौकिक वीर, औदार्याचा पुतळा व दृढ मैत्रीचा आदर्श असा कर्ण होय. परंतु ह्या कर्णास तो कुमारी अवस्थेंत झाल्यामुळें कुंतीनें एका पेटींत घालून ती नदींत सोडून दिली. ती ‘ अधिरथ ’ या नांवाच्या एका सूताच्या–घोडे हांकणाऱ्या माणसाच्या–हातीं लागली व त्यानें त्या सुंदर व राजबिंड्या बालकास पाहून घरीं नेलें व स्वतांस कांहींच मूलबाळ नसल्यामुळें त्यानें व राधेनें–त्याच्या बायकोनें–त्याचें पोटच्या पोराप्रमाणें पालनपोषण केलें. याप्रमाणें कावळ्याच्या येथें वाढलेल्या कोकिळाप्रमाणें आमचा ‘ राधेय ’ कर्ण सूतपुत्र म्हणून प्रसिद्धीस आला ! ‘ दैवाची विचित्र लीला ’ म्हणतात ती अशी ! पण ह्या विधिघटनेनें त्यास किती छळलें, त्याचा जागोजाग किती पाणउतारा झाला ह्याचें वर्णन पुढें येणारच आहे. असो.

याप्रमाणें हीं राजघराण्यांतील बालकें एकत्र वाढत होतीं—हंसत–

खेळत–खिदळत–होतीं–आनंदानें कालक्रमणा करीत होती. पण त्यांच्य लहानपणच्या निरागस भांडणांतच भावी द्वेषाचें बीं पेरलें गेलें. अथवा दुष्ट बुद्धीच्या दुर्योधनानें तें पेरलें असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. कारण, "चारुनि विषान्न भीमा सर्प डंसविले नृपें" इत्यादि प्रकारांची कर्णवधाचे प्रसंगीं श्रीकृष्ण त्यास जी आठवण देतात ती ह्याच वेळच्या अमानुष कृत्यांची होय. भीमदादा सर्वांत बलवान् असल्यामुळें पाण्यांत बुडवून घटकाभर गंमत करणें इ. खोड्या तो करीत असेल. कौरवही त्यांच्यापरी त्याचें उसनें थोडेंबहुत फेडीत असतील, नाहीं असें नाहीं. परंतु ह्याच खोड्या मनांत धरून वरीलसारखे दुष्ट व नीच प्रकार करणें ह्यांत दुर्योधनाचा जन्मजात नीचपणा दिसत नाहीं काय ? सध्या सुद्धां अशा प्रकारच्या खोड्या करणारा एखादा छोटासा "भीमदादा" बालकांच्या–विद्यार्थ्यादिकांच्या–समूहांत असतोच. म्हणून त्याला कोणी वरीलसारखे प्रकार केल्याचें ऐकिलें आहे काय ? बरें; इतकेंही करून आपल्याला त्या खोड्या सहन होत नव्हत्या तर त्या त्यांनीं भीष्मआजोबांला सांगावयाच्या होत्या. त्यांनीं त्याची योग्य ती व्यवस्था केली असती. बिचारा भीम वरीलसारख्या अनर्थांतून लहानपणींही वांचला तो परमेश्वराच्या कृपेनें दुर्योधनादि दुष्टांचा कुरुक्षेत्राच्या पटांगणांत त्यास संहार करावयाचा होता व जन्मतःच तो अत्यंत बलवान् होता म्हणून; ती गोष्ट वेगळी. ती ईश्वराची खैर झाली. पण त्यानें दुर्योधनादिकांच्या जात्याच असणाऱ्या दुष्ट स्वभावरील दोष किमपीही कमी होत नाहीं. अस्तु. पण ह्या बीजाचा अद्याप वृक्ष व्हावयाचा होता. तेव्हां तोंवर आपण त्यांच्या खेळांकडेच पाहूं. ही मंडळी एकदां विटीदांडू खेळतां खेळतां त्यांची विटी एका कोरड्या विहीरींत पडली. तेव्हां तीं सर्व मुलें त्या विहिरीभोंवतीं हिरमुसलीं होऊन जमलीं. इतक्यांत "बाळांनों, तुमचें काय हरवलें आहे ?" असें म्हणत एक ब्राह्मण तेथें आला. याचें नांव द्रोणाचार्य. या द्रोणाचार्यांची व राजा द्रुपदाची लहानपणापासून मैत्री होती. एकाच गुरूपाशीं दोघांनींही अध्ययन केलें होतें व लहानपणच्या प्रेमांत दोघांच्याही मैत्रीच्या आणाभाका झाल्या होत्या. पण 'द्रुपद' राजा झाल्यावर त्यास ही ओळख राहिली नाहीं. ब्राह्मणांच्या घरीं संपत्तीचा

बास थोडाच असतो. बिचाऱ्या अश्वत्थाम्यास–द्रोणपुत्रास–दूध म्हणून पाण्यांत कालवलेलें लाह्यांचें पीठच प्यावें लागे! ह्याहून दारिद्र्याची परमावधि ती काय असणार? "बहुधन असो नसो परि एक असावें गृहीं गृहीं दुभतें" असें पंत म्हणात तें कांहीं खोटें नाहीं. तेव्हां एके-प्रसंगीं मदत मागावी म्हणून द्रोणाचार्य द्रुपदाकडे गेले असतां त्या राजानें उन्मत्तपणें त्यांचा पाणउतारा करून "मी तुम्हांस ओळखीत नाहीं" असें भर दरबारांत निर्लज्जपणें उत्तर देउन त्यांस घालवून दिलें होतें! मानी द्रोणाचार्यांस हा अपमान कसचा सहन होणार? त्यांनीं ताबडतोब प्रतिज्ञा केली कीं, "द्रुपदाचे पांच पाट काढून त्याला माझ्या पायावर नमवीन तरच नांवाचा द्रोणाचार्य!" व ताबडतोब त्या मानधन ब्राह्मणानें मनांत कांहीं बेत योजून हस्तिनपुराचा रस्ता पकडला, व वर सांगितल्याप्रमाणें तो त्या राजबालकांपाशीं येऊन उभा राहिला. "आमची विटी ह्या विहिरींत पडली आहे" असें त्यानीं सांगितल्यावर "मी देतों हं तुमची विटी काढून" असें म्हणून द्रोणाचार्यांनीं कांहीं दर्भ मंत्रून त्या विहिरींत सोडले व त्यांच्या साह्यानें ती विटी त्यांनीं वर काढली. त्यावेळेस त्या मुलांचा आनंद काय वर्णावा? त्यांनीं द्रोणाचार्यांस आपल्याबरोबर येण्याची विनंति करून तीं धांवतच आपल्या आजोबाकडे—भीष्मचार्यांकडे—निघालीं व त्यांनीं तें आनंदाचें वर्तमान भीष्मांच्या कानावर घातलें. भीष्माचार्यांनींही द्रोणांचा योग्य आदरसत्कार करून त्यांस आपल्याजवळ ठेवून घेतलें. व आपल्या मुलांना शस्त्रास्त्रविद्या व मंत्रविद्या शिकविण्यासाठीं त्यांस गुरुजी नेमलें. योग्य गुणांची किंमत झाली! द्रोणाचार्यांच्या बेताचा पाया उत्तम घातला गेला! आचार्यांनीं मग झटून सर्वांस वरील दोन्ही विद्येंत शिक्षण–दान करण्यास प्रारंभ केला. पण "वितरतिगुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे" या वचनाप्रमाणें सर्वच मुलें त्यांत सारखींच कशीं तरबेज होणार? त्यातही कांहीं अर्जुन, कर्ण, यासारखीं अद्वितीय मुलें आपल्या हुशारीनें चमकणारीं होतीं तर कांहीं बथ्थडही होतीं. 'एकलव्य' या नांवाच्या एका व्याधानें–पारध्यानें–तर मातीचे द्रोणाचार्य करून केवळ आत्मविश्वासाच्या बळावर तिरंदाजी साधली होती. ती इतकी कीं, एकदां

द्रोणाचार्य सर्व मुलांसह त्यांचा कुत्रा घेऊन शिकारीस गेले असतां तो कुत्रा त्या व्याधावर भुकूं लागला. तेव्हां त्यानें सात बाण अचूक त्या श्वानाच्या—कुत्र्याच्या—तोंडात मारून त्यास इजा न करतां त्याचें तोंड बंद केलें! सर्व मंडळी आश्चर्यचकित होऊन त्यास विचारूं लागली तेव्हां त्यानें वरील गोष्ट सांगितली. अस्तु. तेव्हां अशा हुशार शिष्यांपैकींच अर्जुन होता. इतका कीं, तो द्रोणाचार्यांचा पट्टशिष्य बनला. आपले पांग जर कोणी फेडील—आपली प्रतिज्ञा पुरी करील- तर हा एकटाच करील असा द्रोणाचार्यांसही विश्वास वाटला. कारण त्यांनीं एकदोनदां घेतलेल्या परीक्षेच्या प्रसंगीं तोच कसास उतरला होता. एकदा द्रोणानीं सर्व शिष्यांस एकत्र जमवून एका झाडाच्या शेंड्यावर एक कृत्रिम भास पक्षी ठेवून त्याचें डोकें उडविण्यास सर्वांस सांगितलें. पण या कामीं कितीजण लायक आहेत हें पाहण्यासाठीं त्यांनीं प्रत्येकास जवळ बोलावून " हं, लावलास का तीर ? बोल तुला आतां काय दिसतें ? " असा प्रश्न केला. त्यावेळीं कोणी म्हणे ' मला सर्व झाड व भास दिसतो ' कोणी म्हणे ' मला झाडाच्या फांद्या व भास दिसतो ' याप्रमाणें सर्वजण ' नापास ' ठरले. शेवटीं अर्जुनाची पाळी आली. त्यानें मात्र " मला तेवढें भासाचें डोकें दिसतें " असें उत्तर दिल्याबरोबर सर्व विद्यादानाचें सार्थक झाल्याचा आनंद आचार्यांस होऊन " उडव तर मग, पाहतोस काय ? " अशी त्यांस आज्ञा केली. क्षणार्धांत अर्जुनाचा बाण भासाचें डोकें भेदून पार गेला! या ठिकाणीं कर्णाचें द्रोणांनीं काय केलें अशी वाचकांस शंका येईल. कारण कर्णही पुढें मोठा धनुर्धारी वीर झाला असें आम्हीं वर सांगितलें आहे. तेव्हां त्याचें उत्तर इतकेंच कीं, कर्णासही—गुरूच्या ठिकाणीं नम्र अशा कर्णासही—त्यांनीं योग्य शिक्षण दिलें. परंतु ' सूतपुत्र ' ह्या प्रवादाच्या ' रक्तलांछना ' चा शिक्का जळजळीत निखाऱ्याप्रमाणें त्याच्या कपाळावर मारला गेल्यामुळें हतभागी कर्ण द्रोणांचा पट्टशिष्य होऊं शकला नाहीं. हाय! अभागी कर्णा! विधिघटनेच्या या दारुण लीलांचे खेळ तुला किती पहावे लागणार आहेत नकळे! असो. शब्दवेधित्व, अचुक तिरंदाजी, इ. गोष्टींतील वरीलप्रमाणें परीक्षा घेऊन विद्यादान पुरें झाल्यावर " आतां कोण काय गुरुदक्षिणा देणार ? "

असें विचारून द्रोणांनीं आपल्या सर्व शिष्यांस आपलें हृद्गत सांगितलें व "त्या उन्मत्त राजाला जो माझ्या पायांवर आणून नमवील त्यानें मला पुरेपूर गुरुदक्षिणा दिली असें मी समजेन" असेंही त्यांनीं उद्गार काढले. त्या वेळेस द्रुपदाला बांधून आणण्याची एकच चुरस उडाली, व आमचे वीर महावीर द्रुपदराजधानीवर जाऊन धडकले. पण अर्जुनानें सर्वांत जास्त पराक्रम गाजवून त्यास आपल्या रथास बांधून आणला व 'गुरुदक्षिणा' म्हणून त्यास गुरुचरणांवर अर्पण केला! त्यावेळेस द्रोणाचार्यांस किती धन्य वाटलें असेल याची कल्पना त्यांच्यासारख्या स्थितींतल्या माणसासच होणार आहे. द्रुपदभार्येच्या विनंतीवरून द्रोणांनीं द्रुपदास जीवदान दिलें; पण त्यास याद राखून राहण्यास बजावलें. असो. याप्रमाणें मानधन द्रोणाचार्यांनीं आपल्या अपमानाचा पुरा सूड उगवून घेतला! पण तत्पूर्वीच वर उल्लेखिलेल्या कौरवपांडवांमधील द्वेषाग्नीची एक भयंकर ज्वाला भडकली व त्यांत तेव्हांच शंभर कौरवांची आहुति पडतें कीं काय असा प्रसंग येऊन ठेपला. ती हकीकत अशी कीं, आपण तयार केलेल्या शिष्यांची शस्त्रास्त्रविद्येंतील पारंगतता एकदां भीष्माचार्यादि महर्षींच्या दृष्टिपथाखालून न्यावी ह्या हेतूनें द्रोणाचार्यांनीं एक मोठा विस्तीर्ण मंडप उभारला व त्यांत चित्रविचित्र सिंहासनें—जणूं भूतलावर आलेलीं स्वर्गींचीं विमानेंच—ठेवून भीष्माचार्य, कृपाचार्य, इ. थोरथोर आचार्यांस आणून बसवून त्यांस आपलें मनोगत सांगितलें. सर्व सभागृह उत्तमोत्तम व खानदानीच्या नरनारीरत्नांनीं फुलून गेलें होतें. लवकरच खेळास प्रारंभ झाला. होतां होतां बारक्या सारक्या शिष्यांचे खेळ झाल्यावर भीम व दुर्योधन या दुकलीचें चुरशीचें गदायुद्ध झालें. पण तें अतिरेकास जाण्यापूर्वींच सूज्ञपणें थांबविण्यांत आलें. नतर अर्जुनाच्या वाटेकडे सर्वांचे डोळे लागून राहिले आहेत तोंच मूर्तिमान् धनुर्वेदच असा अर्जुन तेथें प्रविष्ट झाला व त्यानें असे कांहीं बहारीचे खेळ केले कीं. प्रेक्षक मंडळी आश्चर्यानें नुसती थक्क होऊन गेली. एखादा पारधी ज्याप्रमाणें आपल्या मंजुळ संगीतानें हरिणांचें भान हरपून टाकतो त्याप्रमाणें अर्जुनानें सर्व प्रेक्षकांचीं चित्तें आपल्याकडे आकर्षित करून घेतलीं. तो क्षणांत अदृश्य तर क्षणांत प्रगट, क्षणांत सूक्ष्म तर क्षणांत पर्वताकार होई; आगीच्या लोटानें प्रेक्षकांना भिववी व

दुसऱ्याच क्षणास पर्जन्यास्त्रानें तो अग्नि शांत करी; सूक्ष्म आणि कठीण अशा वस्तूंचा भेद धांवत्या रथांतून करून प्रेक्षकांची वाहवा मिळवी. अशा तऱ्हेनें शेंकडो चमत्कार दाखवून सर्व लोकांस त्यानें अगदीं थक्क करून सोडलें! "धन्य अर्जुन! धन्य द्रोणाचार्य!" असें धन्योद्गार सभेंतून निघत आहेत तोंच काड् काड् दंड थोपटीत प्रतिसूर्यच कीं काय असा तेजःपुंज कर्ण तेथें प्राप्त झाला. त्यावेळेस अर्जुनाच्या लीलांनीं मनांत जळफळणाऱ्या दुर्योनास व त्याच्या भावांस फार आनंद झाला व "आपलें कौशल्य प्रगट करून अर्जुनाची घमेंड एकदां जिरीव" असें ते त्यास सांगूं लागले. कर्णानेंही द्रोणाचार्यांस नमन केलें, व तो अर्जुनास म्हणाला, "अर्जुना! फार गर्व करूं नकोस. तुझ्यापेक्षां दसपट चमत्कार करून दाखवितों, बघ आतां. तूं कोणत्या भ्रमांत आहेस?" अर्जुन कांहीं उत्तर देणार होता. पण द्रोणच म्हणाले, "हं कर्णा, आतां ही बडबड पुरे. तुला काय दाखवयाचें असेल तें करून दाखव." त्यावर कर्णानेंही पण अर्जुनाप्रमाणेंच बहार करून तोंडीस तोंड केली, व सर्वांकडून धन्य म्हणवून घेतलें—प्रत्यक्ष देवांनींही आनंदानें त्या प्रसंगीं माना डोलविल्या. त्यावेळेस दुर्योधनादि त्याच्या मित्रांनीं कर्णास कडकडून आलिंगन दिलें व त्याची फार वाहवा केली—आनंदानें त्याची पाठ थोपटली. परंतु अर्जुनाची खुमखुम जिरवावी—त्याच्याशीं एकदां दोन हात करून—समोरासमोर लढून त्याची रग जिरवावी असें कर्णाच्या मनांत फार होतें. व तसा प्रसंग येण्याची तो एका पायावर वाट पहात होता. दुर्योधनासही त्यानें ही आपली इच्छा बोलून दाखविली. त्याचीही त्यास सम्मति मिळाली. परंतु एखाद्या वीराप्रमाणें कर्णास तोंड देण्यास—त्याच्याशीं दोन हात करण्यास तयार व्हायचे सोडून अर्जुनजी उद्गारले, "कर्णा, तुला इथें आधीं बोलावलेंच होतें कोणी? न बोलावतां जाणारा व न सांगतां बडबडणारा मनुष्य इरसाल मूर्खाचा कांदाच होय! काय तुझी रीत! आणि काय तूं! बऱ्याबोलानें सावध हो नाहीं तर फुकट प्राणास मुकशील!" "अरे जारे!" कर्णही खवळून म्हणाला, "तुझ्या बापानेंच बांधला असेल हा मंडप; नाहीं? फाजील बडबड करशील तर एका बाणानेंच तुझें डोकें उडवीन; समजलास! तुझ्यासारख्या

डुकरानें माझा काय पराभव करावा ? तोंड पहा जीव घेणाराचें ! " डुकराची अत्यंत चीड आणणारी उपमा घेतल्याबरोबर मात्र अर्जुनानें गुरुजींच्या आज्ञेनें ताबडतोब आपलें दिव्य धनुष्य सरसावलें. पांची पांडव लढायला उभे राहिले, शंभर कौरवांनींही आपल्या कमरा कसल्या व हां हां म्हणतां द्वंद्वयुद्धाचा रंग येऊन ठेपला. " हाय ! हाय ! कोण हा प्रसंग ! " असें साधुवृत्तीच्या भीष्मादिकांच्या तोंडून उद्गार निघाले. " अगबाई ! माझ्या बाळांचें आतां कसें होणार ? ईश्वरा, आतां तूंच त्यांचा त्राता ! " चिकाच्या पडद्याआडून हा खेळ पाहणाऱ्या राजस्त्रियांतून कुंतीच्या तोंडून उद्गार निघाले ! द्रोण, कृपाचार्य व भीष्म मनांतून पांडवांचें कल्याण चिंतूं लागले. कारण पांडवांचा सर्व विश्वास—सर्व मदार—अशा संतांच्या आशीर्वादावर होती. अस्त्रांच्या फेंकाफेंकीस सुरवात होते न होते तोंच आकाशांत इंद्र व सूर्य आपापल्या मुलांची—अर्जुनाची व कर्णाची—कड घेऊन भांडूं लागले ! असा एकच हलकल्लोळ उडाला, व लवकरच ही दंगल हातघाईवर येणार, तोंच " सबूर ! " म्हणून कृपाचार्य ओरडले, व त्यांनीं कर्णास एक व्याख्यान झोडलें. " कर्णा, निलाजऱ्या, या राजबिंड्या अर्जुनाबरोबर युद्ध करायला तुला लाज नाहीं रे वाटत ? अरे, गंगापयाप्रमाणें शुद्ध निर्मल कीर्तीच्या राजवंशांत जन्मलेला हा अर्जुन कुठें व तूं कुठें ! अरे, ज्यांचें वर्णन करतां करतां सरस्वति देवीनेंही थकून जावें अशा कीर्तीच्या राजांच्या घराण्यांतील हा राजबिंडा कुठें व तूं कुठें ! कुठें तो हिरा व कुठें तूं हीर ! कुठें तो मणी व कुठें तूं कांच ! कशास कांहीं मेळ तरी ? आपल्या बरोबरीचा पाहून युद्ध करावें हा द्वंद्वयुद्धांतील साधा नियमही तुला ठाऊक नसावा यावरून तुझ्या अकलेचें खोबरें झालें असावें असें मला वाटतें ! एवढा जो तूं या अर्जुनाबरोबर लढायला निघालास तो सांग पाहूं अशा कोणच्या उच्च कुळाचा तूं दीपक आहेस तो ? कोण तुझे आईबाप आहेत तें कळूं देच एकदा आम्हाला ! " हाय ! हाय ! त्याच वर्मावर घाव ! कृपाचार्यांच्या ह्या हृदयभेदी वाग्बाणांनीं मानी कर्णाचें तोंड खरकन् उतरलें ! " दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषं " असें उत्तर एके प्रसंगीं कर्णानें खडखडीतपणें दिलेलें आहे. पण जाणून बुजून जिथें डोळ्यावर कातडी ओढून

घेण्याचा प्रयत्न होतो तेथें तो तरी जास्त काय बोलणार ? पण दुर्योधनास–जिवास जीव देणाऱ्या त्याच्या मित्रास–गप्प कसें बसवेल ? तो तावडतोब मध्यें पडून म्हणाला, " गुरुजी, आपण असे कितीही शब्दांच्या घणांचें घांव घातलेत तरी त्याखालीं पिचून जाईल इतका कमकुवत आमचा कर्ण नाहीं, समजलेत ? तो खराखुरा हिराच आहे. तुमच्या सारख्यांचे आघात सोसणारा तो संत आहे. जननिंदेच्या अग्नींत घातलें तरी तावून सुलाखून निघणारें तें अस्सल सुवर्ण आहे. बोला; तुम्हास लागेल तितकें बोलून घ्या. अरेरे ! केवळ तो एक राजा नाहीं, प्रत्यक्ष राजमुकुट त्याच्या डोक्यावर नाहीं. एवढ्या क्षुल्लक सबबीवरच तुमचा भागुबाई अर्जुन माघार घेत असेल व तेवढ्या दोषामुळेंच तुमच्या आंधळ्या दृष्टीला कर्णाचे खरे गुण–खरें क्षात्रतेज दिसत नसेल तर हें पहा, आतांच्या आतां ह्या कर्णास मी अंगदेशचा राजा करतों. मग तर झालें ना ? " असें म्हणून दुर्योधनानें खरोखरच तिथल्या तिथें कर्णास राज्याभिषेक केला ! या प्रेमळ व निस्वार्थ मदतीनें गहिंवरून येऊन कर्ण म्हणाला, " मित्रा दुर्योधना ! काय हे तुझे उपकार ? यांची फेड तरी मी कशी करूं ? " त्यावर " यावज्जीव तुझी अखंड मैत्री असली म्हणजे मला सर्व पावलें " असा दुर्योधनानेंही जबाब दिला. कर्णानें आपल्या अखंड मैत्रीच्या दानाचें उदक तत्काळ दुर्योधनाच्या हातावर सोडलें व तें आमरणांत पाळलें. तें कसें तें आपण पुढें पाहूंच. असो; पण इतक्यांत एक 'माशी शिंकली.' त्यानें सर्व घात झाला–आंधळ्या पांडवांना व तत्पक्षीय काकांना चोंच मारायला उघड उघड व्रण सांपडलें प्रत्यक्ष कर्णाचा बाप–अधिरथ सूतच–तिथें प्राप्त झाला व कर्णानें–पितृप्रेमी, पितृवत्सल, कर्णानें–परिणामाचा यत्किंचितही विचार न करतां–तावडतोब त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें ! त्याबरोबर एखादी वीज कडकडावी त्याप्रमाणें वलवान् भीम गर्जून म्हणाला, " आहा ! अरे नीच कुळींच्या कर्णा, स्वर्गाचें द्वार तुझ्यासारख्या हीन कुलीनानाहीं आंत घेईल इतकें सताड उघडें नाहीं; समजलास ! अरे, चाबूक घेऊन घोडे हांकायचे सोडून तुला ही कुठली दुर्बुद्धि आठवली ? अरे नीचा, त्या अंगदेशच्या सिंहासनावर अजूनही निर्लज्जपणें बसायला तुला लाज तरी कशी

वाटत नाहींरे ! उतर, उतर त्या सिंहासनावरून ! अरे, यज्ञाचा हविर्भाग एखाद्या कुतरड्याला मिळत नसतो; समजलास ! राजवाड्याच्या गच्चीवर जाऊन बसला म्हणून कावळा कांहीं गरुड होत नाहीं ! " हाय ! हाय ! वज्राघातच झाला ! " हाय, बाबा ! " कर्ण आकाशांतील सूर्याकडे पाहात स्वतःशींच म्हणाला, " ह्या आपल्या पोराला—पदोपदीं अपमान सहन कराव्या लागणाऱ्या पोराला—आपण जन्माला तरी कशाला घातलेंत ! " काय करतो बिचारा ! शंकराची सहनशीलता धारण करणें त्यास भागच होतें. पण राजा दुर्योधन मधें पडून त्यानें तोंडीस तोंड उत्तर ठेवून दिलें. इतकेंच नव्हे तर सूक्ष्म व उदारपणें विचार करणाऱ्या महात्म्यांस प्रस्तुत वादांत त्याचेंच म्हणणें बरोबर आहे असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. तो म्हणाला, " अरे, कितीरे तुम्ही आंधळे आहांत ! क्षत्रियाची व्याख्या तरी तुम्ही काय करतां कोण जाणे ! हरहर ! एखाद्या भागुबाई भित्री अशा मनुष्याला केवळ क्षत्रिय कुलोत्पन्न म्हणून तुम्ही आनंदानें कवटाळाल; पण तेंच केवळ एखादा जातीनें—कुळानें—जन्मानें क्षत्रिय नाहीं—हलका आहे—याच केवळ एका सबबीवर तुम्ही खऱ्या रणशूर बच्चाचा—वीराचा—धिःकार कराल ! त्याला तुम्ही जवळ देखील उभे करणार नाहीं. वाहवा ! काय ही तुमची नीति ! अरे, खरे शूरवीरमर्द हे कुळाची वगैरे चौकशी करीत न बसतां तो खरा बहाद्दर आहे कीं नाहीं—शत्रुसैन्याची अथांग फळी आपल्या बिजलीसारख्या तळपणाऱ्या समशेरीनें फोडणारा आहे कीं नाहीं एवढेंच पाहतात. शेवरीचें झाड मोठें असतें. पण केवळ त्याच्या मोठेपणास घेऊन काय चाटायचें आहे ? गुणहीन अशा त्या वृक्षापेक्षां बिचारें तुळशीचें लहान रोपडेंही साधुसंतांस व प्रत्यक्ष भगवंतांसही प्रिय होतें. तेव्हां जन्मावरून जात किंवा योग्यता ठरविण्यापेक्षां ती गुणावरून ठरविणेंच उचित नव्हे काय ? ह्याच्या हलक्या कुळास—हलक्या जन्मास—पाहूनच तुम्हांस नाकें मुरडाविशीं वाटतात. पण मी असें विचारतों कीं, प्रसंगीं सर्व जगाचाही ग्रास करणारा, सर्वभक्षक व तेजःपुंज अग्नि हा क्षुद्र जलापासूनच झालाना ? कार्तिकस्वामीसारखा शौर्याचा पुतळा सहा कृत्तिकांच्या—सामान्य स्त्रियांच्या—ठायींच निर्माण झाला ना ? सर्व राक्ष-

क्षांना चळचळां कांपायला लावणारें वज्र एका ऋषीच्या हाडकांपासूनच निर्माण झालेंना ? ज्याच्या कीर्तिजलानें सर्व जग पावन होत आहे असा विश्वामित्रासारखा तपोनिधी शेवटीं एक क्षत्रियपुत्रच होताना ? गौतमासारखे मुनी किंवा द्रोणांसारखे धनुर्धारी वीर व अस्त्रविद्येंत कुशल योद्धे शेवटीं गवताच्या पुंजक्यावर व द्रोणकलश नांवाच्या यज्ञ पात्रांतच झालेना ? सर्व समुद्राला एका आचमनांतच आटपणारे अगस्ति ऋषी मातीच्या मडक्यांत—डेऱ्यांतच जन्मलेना ? अरे, तुमची तरी उत्पत्ति किती शुद्ध आहे तें आम्हाला ठाऊक आहे. पण भीमा, कुळाच्या दोषानें आजपर्यंत कोणच्या तेजस्व्याची किंवा वरील मंडळींपैकीं कुणाची कमी योग्यता झाली आहे सांग बरें ? अरे, ह्या कर्णासारखा असामान्य, सुंदर, कवच-कुंडलांनीं शोभिवंत व जातिवंत मोहरा—वीर—दुसरा एक तरी दाखवून दे आणि मग तरी त्याला नांवें ठेव. घटकाभर तुझें म्हणणें वादासाठीं खरें धरलें तरी मला सांग, याच्यासारख्या असामान्य वीराला जन्म देणारी स्त्री एखाद्या हलक्या कुळींची सामान्य स्त्री असेल ही गोष्ट विचाराला—युक्तिजुक्तीस तरी पटते काय ? अरे, हरिणीपासून कधीं वाघ झाला आहे काय ? उकिरड्यांत कधीं हिरे पिकले आहेत काय ? कावळ्याच्या येथें वाढला-'परभृत'—झाला म्हणून अस्सल—जातिवंत कोकिळ हा कधीं कावळा झाला आहे काय ? अरे, ह्या क्षुद्र अंगदेशच्या राज्याची ती काय किंमत ? हा कर्ण खरोखर त्याहून शतपट मोठें असें सार्वभौमपद भोगण्याच्याच लायकीचा आहे असें मला ह्याचें भावी भाग्य दिसतें. ज्यांना हें माझें बोलणें पसंत नसेल त्यांनीं घनघोर प्रतिज्ञा करावी व ताबडतोब युद्धास सज्ज होऊन ती पुरीही पण करून दाखवावी. मग आम्ही मरू किंवा ते मरोत." हे दुर्योधनाचे शब्द ऐकून सर्वत्र एकच हाहाःकार उडाला, व पुन्हा लढाईची वेळ येऊन ठेपून धुमश्चक्री माजते कीं काय असें वाटलें. पण इतक्यांत रागानें लालबुंद होऊन एकमेकांकडे आरक्त नयनांनीं पहाणाऱ्या वीरांच्या नयनांत आपली सायंकालीन रक्तिमा मिसळून देऊन भगवान् साधु सविता आपले लोक'मित्र'त्वास—लोकबंधुत्वास—बाट लागूं नये म्हणून अस्तास गेला, व तो प्रसंग कसाबसा टळला !

वरील प्रसंग इतका विस्तारानें रेखाटण्याचें कारण कौरवपांडवामधील द्वेषाग्नि किती तीव्रपण धुमसत होता हें वाचकांस बरोबर पटावें. तसेंच पांडवांपैकीं भीम व गुरूंपैकीं कृपाचार्य यांच्या भाषणांवरून राष्ट्रघातकी जातिभेदाचीं बंधनें आमच्या समाजांत किती करकचून बांधलीं गेलीं होतीं व त्यामुळें सत्याची देखील भूल पडून कर्णासारख्या अलौकिक वीरांचा जागोजाग किती पाणउतारा होत होता हेंही वाचकांस दिसून यावें. वास्तविक जातीवरून पारख न करतां ती गुणावरून झाली पाहिजे हें, " ममवर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः " म्हणणाऱ्या श्रीकृष्णांनीं—प्रत्यक्ष परमेश्वरांनींसुद्धां आपल्या प्रत्येक अवतारांत सिद्ध करून दिलें आहे–नव्हे, त्यांचें तें अखंड ब्रीदच आहे. त्यांनीं भिल्लीणीचीं बोरें खाल्लीं, चोखामेळा महाराबरोबर आनंदानें भोजन केलें; फार काय भक्तिगुणांनीं नटलेला कोणच्याही जातीचा भक्त मला सारखाच प्रिय आहे–"भक्ति गा एथ सरे ! जाति अप्रमाण"–हें दाखविण्यासाठींच कीं काय त्यांनीं अठरापगडजातींतून एक एक भक्त निर्माण केला; देव, दानव, वृक्ष, पशु, पक्षी, व मानव व त्यांच्या हजारों जाति इतके सर्व भेद असूनही ' भक्ति गुणांच्या नटनाचांत ते सर्व विरून जातात ! या ईश्वराच्या उदारचरितवृत्तावरून मानवांनीं कांहींच बोध घेऊं नये काय ? नाथासारख्या ईश्वराच्या प्रेमळ भक्ताची वागणूकही आपणास हेंच तत्व शिकविते. 'वंशभेदाच्या नरकमूलक अभिमाना'वर कुठार घालणाऱ्या बुद्धाला ' अवतार ' म्हणून डोक्यावर घेऊन नाचणाऱ्या हिंदुधर्माभिमान्यांनीं त्याच्या शिकवणीचा कांहींच विचार करूं नयें काय ? अस्तु. याप्रमाणें भावी भारतीय युद्धाच्या नाटकाची 'नांदीच ' असा वरील खटक्याचा प्रसंग कसाबसा टळला हें वर आम्ही सांगितलेंच आहे. परंतु भीष्माचार्य आजोबानां जरा सारवासारव करून हा कलहाग्नि शमविण्याचा प्रयत्न केला तरी तो समूळ कधींच विझला नाही–तर त्याच्या ज्वाला आंतल्या आंत धुमसतच राहिल्या व पुढें होणाऱ्या एक एक गोष्टीची इंधनासारखी स्यांत भरच पडून तो अनिवार भडकला व त्यांत १८ अक्षौहिणी सैन्याची व दोन्ही पक्षांकडील बिनमोल योद्धयांची प्राणाहुति पडली ! तो कथाभाग हळुहळु पुढें येणारच आहे.

युधिष्ठिराचा जन्म दुर्योधनाचे आधीं झाला यांतच विधात्यानें भावी भांडणाचा पाया घालून ठेवला असें आम्हीं वर म्हटलेलें वाचकांस स्मरत असेलच. किंबहुना, त्याच्याही पलीकडे जाऊन धृतराष्ट्राचें अंधत्व हेंच ह्या सर्व अनर्थाला एके प्रकारें मूळ झालें असें आम्ही म्हणतों. कारण धृतराष्ट्र आंधळा नसता तर त्यास वडील बंधु म्हणून विचित्रवीर्याचें पश्चात् हस्तिनापुरची गादी मिळाली असती. परंतु तो आंधळा असल्यामुळें व विदुर दासीपुत्र असल्यामुळें साहजीकच पांडु राजा झाला व त्याच्याच थोरल्या मुलाकडे–युधिष्ठिर धर्माकडे–त्याची गादी ओघानेंच आली; व झालें तें विधात्याच्या योजने-प्रमाणेंच झालें व म्हणून योग्यच झालें! पण असें समाधान कोण मानून घेणार? वरील प्रश्नास व भांडणाच्या सुटकेस दुसरीही एक बाजू होती व दुर्योधनाची 'खल'प्रकृति आड न येती तर त्याचा निकालही कदाचित् समाधानकारक लागला असता. कारण धृतराष्ट्र आंधळा झाला तरी तो पंडूचा वडील भाऊ होता व सोयीसाठीं 'पांडु' राजा झाला तरी धृतराष्ट्राचा राज्यावरील हक्क किंवा वारसा अजिबात उडाला होता असें नव्हे. तेव्हां पितृपरंपरागत राज्याचे कौरवपांडव समान अधिकारी म्हणून दोघांनींही त्याची समसमान वांटणी करून घ्यावी हें न्याय्य होतें. परंतु दुर्योधनासारख्या खलाला सर्वच उपटायला पाहिजे होतें. कारण पुढें अशा तऱ्हेची वांटणी झाल्याचें व वनवासानंतर तर अवघीं पांच गांवें धर्मानीं मागितल्याचें आपणास दिसणारच आहे. पण त्या वेळेस दुर्योधनादिकांचा दुष्ट स्वभाव कसा आड आला हें आपण पुढें पाहणारच आहोंत. तोच दुष्ट स्वभाव प्रस्तुत प्रसंगींही उद्भ-वला. किंबहुना त्याच्या लोभी बापासही त्याचा दुष्ट विचार पसंत पडला असें स्पष्ट म्हणावयास हरकत नाहीं. कारण वरील द्रुपदाचा सूड उगवण्याची द्रोणाचार्यांची प्रतिज्ञा व 'चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले' इ. प्रकार पुरे झाल्यास एक वर्ष लोटलें नाहीं तोंच लौकिकाकरितां जरी त्या धूर्त म्हाताऱ्यानें युधिष्ठिरास यौवराज्याभिषेक केला तरी त्यानंतर सर्व पांडवांनीं दशदिशांच्या राजांस जिंकून–दिग्विजय करून–जो बहुमोल करभार आणला व शौर्यसाहसपराक्रमादिगुणांत आपला वरचढपणा

प्रस्थापित केला, तसेंच धर्मांनीं आपल्या दयाळू न्यायबुद्धीनें व भीमार्जुनांनीं आपल्या पराक्रमानें सर्वत्र वाहवा व कीर्ति मिळवून 'धर्मच आपला राजा व्हावा' असें जे सर्व पौरजनांच्या तोंडून उद्गार काढले त्यांनीं लोभी धृतराष्ट्र व त्याचा दुष्ट मुलगा दुर्योधन हे सारखेच अस्वस्थ झाले! धृतराष्ट्रानें कणिकनीतिचा पाठ ऐकला, व दुर्योधनानें त्याच्या कानास लागून सुचविलेला उपाय म्हाताऱ्यास पसंत पडून " वारणावत नगरांत महादेवाचा मोठा उत्सव होणार आहे; तो देश व तें नगर पाहण्यासारखे आहे, तेव्हां तो उत्सव पाहण्यास तुम्ही कुंतीमातेसह जावें " असें त्यानें—म्हाताऱ्यानें—पांडवांस सांगितलें. 'यांत कांहीं तरी खास दगा आहे' असा संशय युधिष्ठिरास आल्यावांचून राहिला नाहीं. परंतु केवळ वडिलांची आज्ञा म्हणून धर्मराज आपल्या चारी भावांसह व कुंतीमातेसह भीष्मादिकांचा आशीर्वाद घेऊन वरील नगरास जाण्यास निघाले!

महाभारताकडे कादंबरीच्या दृष्टीनें पाहिल्यास व्यासांचा नंबर खरोखर फारच उच्च दर्जाचा लागेल यांत शंका नाहीं. धीरोदात्त नायकवीर निर्माण करून त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांच्या दुष्ट स्वभावानें त्यांच्यावर संकटें आणून आधीच लोकप्रिय—लोकमान्य—झालेल्या नायकवीरांच्या लोकप्रियतेंत अधिकच भर घालणें; संकटांतून सुटका होऊन विवाह झाल्यावर अधिकच संकटांची गर्दी त्या नायकनायिकांवर करून त्यांचें शुद्ध सत्वसुवर्ण कसास लावून उज्ज्वल करणें व शेवटीं दुष्टांचें पारिपत्य करून सर्वत्र आनंदीआनंद पसरविणें, इत्यादि कुशल कादंबरीकाराची हृदय हलवून सोडणारी हातोटी व्यासांना फारच उत्कृष्ट साधली आहे ह्यांत शंका नाहीं. वरील आमच्या विधानाची प्रतीति प्रस्तुत कथानकाचा एक एक भाग वाचकांपुढें जसजसा उलगडला जाईल तसतशी त्यांसही येईल अशी आम्हास खात्री आहे. असो.

धर्मराज वारणावतींत जाऊन राहतात तों त्यांच्यासाठीं दुर्योधनानें—आनंदित झालेल्या ' सुर्योधनानें ! '— आधींच एक संकटाचा खड्डा खणून ठेवला होता. आपल्या विश्वासू मंत्री पुरोचनाकडून एक लाक्षागृह—लाखेचें घर—निर्माण करून युक्तीनें घुलवून त्यांना त्यांत त्यानें उतरविलें होतें व संधी साधून एके दिवशीं रात्रीं त्या घरास आग

लावून त्यांना त्यांत नाहींसे करण्याचा त्यानें घाट घातला. परंतु सत्पक्षाचा साहाय्यक ईश्वर असतो व दुष्टांच्या पापांची सव्याज फेड करण्यास तो सज्जनांना अशाही संकटांतून सुरक्षित राखीत असतो हें खुळ्या दुर्योधनास कोठून ठाऊक असणार ? विदुराला दुर्योधनाचा हा बेत आधींच कळला होता व त्यांनीं धर्मास तशी इशारतही देऊन ठेविली होती. इतकेंच नव्हे तर आपले विश्वासू खनक पाठवून त्यांनीं त्या घरांतून अरण्यांत निघणारें एक गुप्त भुयारही तयार करून ठेवलें होतें. एके दिवशीं तो दुष्ट पुरोचन मंत्री व एक भिल्लीण आपल्या पांच मुलांसह त्याच वाड्यांत रात्रौ आनंदानें गुप्तपणें निजलीं असतां आमच्या भीमदादानें आपण होऊनच त्या घरास बत्ती लावून दिली व कुंतीमातेसह आपल्या चारी भावांस घेऊन त्या भुयारमार्गे अरण्यांत प्रवेश केला. इकडे आगीचा डोंब उसळून त्यांत तें लाक्षागृह व त्यांत निजलेली मंडळी जळून मेली. भिल्लीणीचें व तिच्या पांच मुलांचीं प्रेतें पाहून धांवून आलेल्या सर्व लोकांस ती कुंतीपांडवांचींच आहेत असें वाटून फार वाईट वाटलें. कावेबाज बापलेकांनीं—धृतराष्ट्रदुर्योधनांनीं—हा त्यांचा समज कायम ठेवण्याची योग्य ती खबरदारी घेतली ! परंतु सत्य हें कधींही लपून राहत नाहीं; तें कधीं ना कधीं तरी बाहेर पडतेंच पडतें. ते कसें बाहेर पडलें तें आपणास पुढें दिसणारच आहे. आधींच धृतराष्ट्राच्या दुष्टपणाविषयीं साशंकित झालेल्या लोकांची पांडवांच्या प्रत्यक्ष राहत्या वाड्यास आग लागलेली पाहून व त्यांच्या समजुतीप्रमाणें त्यांत कुंती पांडवांचीं प्रेतें पाहून तर धृतराष्ट्रादिकांच्या दुष्टपणाविषयीं पुरी खात्रीच झाली ! गुंतागुंतीचा धागा वाढत चालला ! असो.

त्यानंतर पांडवांनीं कुंतीमातेसह अरण्यांतून प्रवास करण्यास प्रारंभ केला असतां एके दिवशीं कुंतीस फार तहान लागली म्हणून पाणी आणण्यास गेलेल्या भीमानें हिडिंब नांवाच्या एका क्रूर नरमांसभक्षक राक्षसास ठार करून अशा सत्कार्याचा ' ओनामा ' घातला व त्याच्या मायावी सौंदर्यमयी भगिनी—हिडिंबे—ची त्यावर फार प्रीति बसल्यामुळें कुंतीमातेच्या आज्ञेनें तिच्याबरोबर तो दिवसा त्या वनांतील रम्य स्थानीं जाऊं लागला. कांहीं दिवसांनीं त्यांना ' घटोत्कच ' या नांवाचा

मुलगा झाला. नंतर पांडवांनीं आपला वेष बदलून तपस्व्याचा वेष घेतला व ते पांचाल देशांतील 'एकचक्रा' नांवाच्या नगरींत एका ब्राह्मणाचे घरीं जाऊन राहिले. ते ज्या गांवांत उतरले होते त्या गांवाला 'बकासुर' ह्या नांवाच्या राक्षसानें त्यांतील माणसें मारून फारच सतावून सोडलें होतें. त्यावेळेस सर्व गांवकऱ्यांनीं एक सभा भरवून—" सिंह व कोल्हा " या गोष्टीतल्याप्रमाणें—हात जोडून त्या बकासुरास प्रार्थना केली कीं " महाराज !—( करतां काय ? " सुसरीबाई तुझी पाठ मऊ ! " असें कधीं कधीं म्हणावेंच लागतें ! )—आपण असा आमचा फन्ना उडवल्यास आमची सर्वांची दोन दिसांतच चटणी उडेल. यासाठीं आमची अशीं सर्वांची नम्र प्रार्थना आहे कीं आम्ही आमच्या पैकीं दररोज कोणीतरी एक माणूस व गाडा-भर अन्न आपल्याला धाडून देत जाऊं, त्यांत चूक करणार नाहीं. तेवढ्यावर आपण संतुष्ट राहिल्यास आपलाही उदरनिर्वाह बरेच दिवस चालेल व आम्हीही चार दिवस जास्त जगूं. " ही गोष्ट त्या दुष्टाला—राक्षसाला मानवलीशी दिसली, व तो गांवाबाहेर जाऊन राहिला. व रोज मिळणाऱ्या त्या भोजनावर संतुष्ट राहूं लागला. वरील नियमाप्रमाणें आज त्या ब्राह्मणाच्या घरांतून कोणीतरी माणूस धाडण्याची पाळी होती. आमचे पांडव नुकतेच त्या घरीं येऊन उतरलें होते म्हणून ही गोष्ट त्यांस ठाऊक नव्हती. कुंती व भीम घरींच होते. बाकीचे पांडव गांवांत भिक्षा मागण्यास गेले होते. इतक्यांत त्या घरांत रडारड सुरूं झाली ! जो तो प्रेमानें " मी जातों, तुम्ही रहा " असें दुसऱ्यास म्हणे. त्यांची एक लग्नाची मुलगी होती. पण लग्नाची मुलगी—'उपवर दुहिता'—ही त्यावेळेससुद्धां " दारिका हृदयदारिका पितुः " होती असें दिसतें. कारण पंतांनीं त्या प्रसंगाचें वर्णन करतांना तिच्या तोंडीं घातलेल्या भाषेंत ती असें म्हणते कीं, " कन्या चिंताचि सर्व काळ, जिला। प्रसवोनि वाहति मनीं श्रीमंतहि पितर सर्व का० जिला।." आतां कदाचित् पंतांनीं आपल्या वेळच्या परिस्थितीचें चित्रही यारूपानें रेखाटलें नसेल असें नाहीं. तसें असण्याचा संभव आहे. तथापि ही उपवर दुहितेची चिंताहि फार पुरातनकालापासून चालत आलेली आहे हीही गोष्ट तित-

कीच खरी आहे. कारण वेदकालीन प्रार्थनेंतसुद्धां "आम्हांला मुलगा दे, मुलगी देऊं नको. तिला पाहिजे तर दुसरीकडे दे. पण इथें देऊं नको. इथें मुलगा दे" अशी देवाजवळ प्रार्थना केलेली आहे. त्यांतील बीज हेंच आहें. तेव्हां ब्राह्मणाच्या लेकीनें वरीलप्रमाणें उद्गार काढावेत हें पूर्ण संभवनीय आहे. व त्यामुळें जतांजातां एका प्रश्नावर सहज प्रकाश पडतो. पण तो आपण हिंदुस्थानच्या सामाजिक इतिहासाचें अवलोकन करतांना जास्त विस्तारानें पाहूं. अस्तु.

बालिकेनें स्वतांला—मूर्तिमंत काळजीला—जाऊंद्या अशी प्रार्थना केली ती ऐकून मातापित्यांचें व त्या पांथस्थांचें—कुंतीभीमांचेही हृदय हालून गेलें! "ऐसें वदोनि कन्या रडवूनि रडे" असें पंतांनींही त्या प्रसंगाचें सहृदय वर्णन केलें आहे! पण इतक्यांत ह्या शोकसागराच्या भरतीला खुदकन् हंसण्याचा प्रसंग आणून त्या ब्राह्मणाच्या लहान बालकानें एकंदर परिस्थितीच्या शोकपूर्ण देखाव्यास जास्तच भरती आणली. हातांत गवताची काडी तरवारीसारखी धरून ती परजीत बालक त्यांची समजूत करीत आहे तो देखावा कसा सुखदुःखांनीं भरलेला आहे—रडणाऱ्या वदनावरही त्यानें हास्याची लकेर कशी क्षणैक पसरविली त्याचें पंत वर्णन करतात, "समजावुनि त्यांसि म्हणें 'ऐसें लात्तिंचलासि मालीन। का ललता आलतता पलतां मी सागलांत तालीन'॥ हांसविली हर्षविली व्यसनार्त तिघेहि बाळ—शब्दानें।" परंतु लवकरच त्या बालकास—अनागस बालकास—मातृपितृ किंवा भगिनीवियोग होणार त्याची बिचाऱ्यास काय कल्पना! हा विचार मनांत येऊन तें तोंडावर आलेलें हंसू कुठच्या कुठें पार पळालें, व पुन्हां शोकाचे अभ्रखंडांनीं तिघांचीही वदनें भरून गेलीं! बालिकेची हृदयस्पर्शी प्रार्थना ऐकून त्या सहृदय व उदारधी पित्यानें उत्तर दिलें,— "पुत्रचि अधिक न कन्या—अन्यांस गमे; मला न लोभ्याला." पाषाणासही पाझरविणारा हा देखावा पाहून कुंतीमातेचें हृदय कळवळलें! "अरेरे! काय ही तुमची स्थिती!" ती म्हणाली, "परंतु कांहीं काळजी करूं नका. मला पांच मुलें आहेत. त्यांतून मी ह्या भीमाला अन्न घेऊन त्यच्याकडें धाडते." परंतु आलेल्या पांथस्थाला राक्षसाच्या

तोंडी बळी देणें–'पाहुण्याकडून साप मारण्याची' तऱ्हा त्यावेळीं नसल्या-मुळें–त्या ब्राम्हणांस सर्वथा अयोग्य वाटून तो म्हणतो, "छे! छे! महाराज, आपण आमच्या येथें पाहुणे आलांत–अतिथि आहांत. आप-णांस आम्ही धाडून आणखी कोणच्या पापाचें धनी व्हावें?" तथापि, "माझा मुलगा भीम हा महान् पराक्रमी आहे, त्याच्या अंगांत दहा-हजार हत्तींचे बळ आहे, तो तेव्हांच त्या राक्षसाला ठार मारील" इत्यादि कुंतीनें त्याचें समाधान करून त्याचे कसेंबसें मन वळविलें; व त्याचें व सर्व गांवचें संकट टाळण्यासाठीं म्हणून त्या अन्नाच्या गाड्यावर भीमास बसवून त्यास त्या राक्षसाकडे रवाना केलें. भीमदादास तर काय? त्या राक्षसाची रग जिरविण्याची ही अपूर्व पर्वणी आलेली पाहून तो आनंदानें नाचूं लागला. एखाद्या कसलेल्या तालीमबाजाप्रमाणें सदा कुस्तीची खुमखुम असलेल्या भीमास कांहीं दिवस आपल्या शक्तीची करामत दाखवण्यास मिळालें नव्हतें. तेव्हां अनायासें चालून आलेली ही संधी तो थोडीच फुकट दवडणार? तो मोठ्या आनंदानें त्या अन्नाच्या गाड्यावर बसून निघाला. व कधीं एकदां तो राक्षस दृष्टीस पडतो व कधीं एकदां त्या दुष्टाची हाडें मी पिचून टाकतो असें त्यास झालें. म्हणून तो बैल पिटाळीतच गेला. "कारे मानवाच्या कारट्या! तुला वेळेवर गाडा घेऊन येतां येत नव्हतें का?" भीमास पाहतांच राक्षस ओरडून म्हणाला. पण भीमाच्या पुष्ट देहाकडे पाहून 'आज बरा हा माजलेला रेडा खायला मिळेल' ह्या आनंदाच्या विचारानें तो थोडासा शांत झाला. इकडे आमच्या भीमदादानें कांहींच उत्तर न देतां मुका-ट्यानें खालीं उतरून त्या अन्नावर यथास्थित ताव मारण्यास सुरवात केली! त्यानें तो जास्तच खवळून दोघांचीही लवकरच झोंबी सुरू झाली! त्याचें वर्णन किती करावें? त्यांनीं मोठमोठे वृक्षसुद्धां सहज लीलेनें उप-टून एकमेकांवर प्रहार केला. मुष्टियुद्धाचें प्रसंगीं हजारों गुद्दे आणि ठोसे एकमेकांच्या मर्मस्थानीं मारले. कसलेल्या मल्लाप्रमाणें त्यांनीं एकमेकांस पेंच घालून पाडण्याचा व दमांत उखडण्याचा प्रयत्न केला. पण भीम-दादानें अशा रितीनें फार वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं असें पाहून त्या राक्षसास थोडावेळ लीलेनें खेळविल्यावर एका झटक्यास त्यास पालथा

घातला व बुक्क्यांचा इतका बेदम मार दिला कीं, त्यासरशीं रक्ताची गुळणी येऊन तो राक्षस ठार झाला. त्यानें त्याला गुद्यांचा जो विलक्षण प्रसाद दिला त्याचें वर्णन पुढें येणाऱ्या जयद्रथकृत द्रौपदीहरण प्रसंगातल्याप्रमाणेंच इथेंही होईल; व ते म्हणजे, "बुकली भीम बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो!" या ठिकाणीं पंतानीं घेतलेली बोकडास बुकलण्याची उपमा सहृदय वाचकांच्या अंगावर खरोखर शहारे आणणारी आहे. व ती वाचून, "यज्ञासारख्या प्रसंगीं झालें म्हणून काय झालें? बोकडासारख्या गरीब प्राण्यास बुकलून बुकलून ठार मारणें किती निर्दयपणा! देवाला प्रसन्न करण्यासाठीं अशा गरीब प्राण्यांचा अशा निर्घृणपणें वध करायचा असेल तर आग लागो तसल्या यज्ञकर्मास व धिःकार असो तसल्या देवतांस!; व केवळ स्वताचें जिव्हालौल्य शमविण्यार्थच जर ही हत्या होत असेल तर मग त्या स्वार्थी निर्दयतेला जगांत दुसरी तोडच नाहीं असें म्हणावें लागेल! मग देवीला बोकड बळी देणाऱ्या खालच्या जातींस कशाला नांवें ठेवावयास हवींत? त्यांना उपदेश करायला जाण्यापूर्वी महात्मा बुद्धानें प्रतिपादिलेल्या अहिंसेच्या तत्वाप्रमाणें आपण असल्या यज्ञांतल्या सुद्धा गरीब व निरपराध प्राण्यांच्या हिंसेचा तीव्र निषेधच करावयास पाहिजे." इत्यादि विचार मनामध्यें उत्पन्न झाल्यावांचून राहात नाहींत. असो.

याप्रमाणें बकासुराचा वध करून त्या सर्व गांवाला त्याच्या त्रासापासून मुक्त करण्याचें क्षत्रियोचित कर्म केल्यावर लवकरच एका पांथस्थाकडून पांचालदेशची राजकन्या द्रौपदी हिचें स्वयंवर होणार आहे असें पांडवांस समजलें. तेव्हां कुंतीमातेसह–पांचालदेशास जाणाऱ्या ब्राह्मणांबरोबर ब्राह्मणवेषधारी पांडवही जाऊं लागले व लवकरच द्रुपदराजधानीस पोंचून एका कुंभाराचें घरीं आपलें बिऱ्हाड ठेवून भिक्षावृत्तीनें राहूं लागले. द्रुपदानें मांडलेल्या आपल्या मुलीच्या स्वयंवरांत "फिरत्या यंत्राचे छिद्रांतून पांच बाण घालवून त्यावर टांगलेल्या मत्स्याचा माशाचा-भेद करून त्यास खालीं पाडील त्यासच आपली पोर द्यायची" असा पण लावला होता. स्वयंवराची वार्ता जाहीर झाल्यावर देशोदेशींचे राजे, महाराजे गोळा झाले. त्यांत ब्राह्मणवेषांत पांच पांडव व कौरवांकडील

दुर्योधनकर्णादि मंडळीही हजर होती. द्रुपदराजानें, स्वयंवरमंडप शेकडों राजांनीं चिकार भरला आहे असें पाहून, पुन्हा एकदां आपला 'पण' धृष्टद्युम्नाकडून—आपल्या मुलाकडून—जाहीर केला. तेव्हां पुष्कळ राजांच्या तोंडास पाणी सुटलें; पण नुसत्या गुळचट मनोराज्यानें द्रौपदीची थोडीच प्राप्ति होणार होती! तिथें अस्सल धनुर्धारी वीरच पाहिजे होता, व असे अलौकिक धनुर्धारी वीर त्या सभामंडपांत दोनच होते. एक आमचा हतभागी कर्ण! व दुसरा धनुर्धारी पार्थ. अभागी कर्णाचें दुर्दैव येथेंही उभें राहिलें. कारण तो उज्ज्वल वीर उठून बाण लावणार तोंच, "सूतमहं जातु चेन्नवरयामि" "मी सूत पुत्रास वरणार नाहीं" असें द्रौपदी म्हणाली. दुर्दैवी कर्णास मुकाट्यानें विषण्ण चित्तानें खालीं बसावें लागलें. त्यानंतर बहाद्दर व शुद्धकुलीन अशा अर्जुनानें मत्स्यवेध केला व द्रौपदीनें आनंदानें वरमाला त्याच्या गळ्यांत घातली. त्यानंतर लवकरच तापसवेषधारी पांडवांचें खरें स्वरूप द्रुपदास कळून लग्नसमारंभ मोठ्या थाटानें व कडाक्यानें झाला! व अशा रितीनें द्रौपदी पांची पांडवांची भार्या झाली. पंडुराजा मागेंच मरून गेलेला होता. वैधव्यावस्थेंत काळ कंठणाऱ्या कुंतीच्या जिवाभावाचे आधार आतां पांच पांडवच होते. द्रौपदीला पणांत जिंकून विजयोत्साहानें वाजत गाजत झालेला तो लग्नसमारंभ पाहून "ह्या सुखाचा अनुभव घेण्यास आज नाथ जिवंत असते तर किती बहार होती" असा विचार कुंतीच्या मनांत आल्यावांचून राहिला नसेल. तथापि 'विधिघटना बलीयसी' असें म्हणून दुःखाचा एक तीव्र सुस्कारा सोडून स्वस्थ बसण्यावांचून तिच्यातरी हातीं काय होतें!

या ठिकाणीं द्रौपदी पांच पांडवांची भार्या कशी झाली? असा प्रश्न उद्भवतो. एका स्त्रीस अनेक पती करणें ही लोकविरुद्ध व वेदविरुद्ध गोष्ट करण्यास द्रुपदराजा मुळींच तयार नव्हता. द्रौपदी ही खरोखरी आधीं 'भिक्षा' नव्हती तर हक्कानें मिळवलेली—स्वयंवराच्या पणांत जिंकलेली चालती बोलती राजकन्या होती. अर्थात्, "आजची भिक्षा आणली आहे" ह्या पांडवांच्या थट्टेच्या बोलावर 'सर्वे समेत्य भुंक्त' हें कुंतीमातेचें अज्ञात स्थितींतील उत्तरही तितक्याच किंमतीचें ठरतें. किंबहुना "अर्जुनानेंच

तीस वरावें " असें धर्मराजांचें प्रथम मत पडलें होतें हें लक्षांत ठेवण्या-सारखें आहे. बरें, इतर ' रत्नें ' आणि ' कन्यारत्न ' हीं सारखींच काय? मग " इतर रत्नांप्रमाणेंच हें कन्यारत्नही आम्हीं सर्वांनीं सारखेंच उप-भोगावें " ह्या धर्माच्या म्हणण्यांत काय अर्थ राहिला ? कन्येला 'रत्ना'ची केवळ उपमा आहे एवढी साधी गोष्टही त्यांस समजत नव्हती काय ? ' वदनकमल ' सुंदर आहे म्हणून कमलासारखेंच जर तें गळ्याच्या देंठापासून खुडून कोणी त्याचा वास घेऊं लागला तर तें शहाणपण होईल काय ? बरें, प्रत्यक्ष वेदोव्यास तेथें अवतरून त्यांनीं द्रुपदाची एकांतीं समजूत घालण्याचा जा प्रयत्न केला आहे त्यानें द्रुपदाचें समाधान झालें असो बापडें ! पण विसाव्या शतकांतल्या कोणाही समंजस मनुष्याचें त्यानें समाधान होणार नाहीं. " ही स्वर्गांतलीं पूर्वींच उपभोगिलेली ' स्वर्गश्री ' आहे " इत्यादि समाधान म्हणजे कृष्णाच्या रासक्रीडेचें–" गोपी ह्या वेदांच्या ऋचा आहेत" इत्यादि प्रकारें समाधान करण्याचीच तऱ्हा होय. पूर्वींचें तुम्ही कोणीही असाल; प्रस्तुत जन्मांत आल्यानंतर तुमची वाग-णूक कशी काय आहे हेंच सर्व जग पाहणार ! नाहींतर वरीलसारख्या सबबीवर वाटेल तसें सामाजिक व नैतिक अनर्थ ओढवण्याचा संभव आहे. उद्यां आपला एखादा मनुष्य उठला व एखादी सुंदर स्त्री पाहून ' तूं माझी पूर्वजन्मीची भार्या आहेस ' असें म्हणत सुटला तर तें बरो-बर होईल काय ? त्याचप्रमाणें " पतिं देहि " ची गोष्ट तर अत्यंत हास्यास्पद आहे! शंकराला एवढीही अक्कल नव्हती काय कीं, "पतिं देहि" " पतिं देहि " असें पांच वेळां म्हणणारी बालिका एकच पति मनांतून इच्छित आहे एवढेंही त्यांस समजूं नये ? " आई, मला लाडू दे, दे लाडू, दे नाग लाडू " असें एखादा बालक हट्ट घेऊन आईस म्हणाला तर त्याची आई त्याला एकच लाडू देते कीं तीन ? त्याला एकच लाडू हवा आहे, त्यानें तो तिनदां जरी मागितलान् तरी त्याला एकच लाडू हवा आहे–ही गोष्ट साध्याभोळया आईला सुद्धां कळते ! मग शंकरा-सारख्या सर्वज्ञ महादेवास वरील गोष्ट कळूं नये काय ? निदान अशा प्रका-रच्या खुळेपणाची गोष्ट मुळांत नसावी असें आम्हांस इतके दिवस वाटत होतें. असो. पण मग ह्याचा उलगडा कसा करायचा ? कुंतीनें त्याना पर-

वानगी कशी दिली ? अज्ञातपणें निघालेल्या शब्दांची सत्यता खरी करण्यास ती लोकविरुद्ध व वेदविरुद्ध गोष्ट करायला सांगायला कशी तयार झाली ? सर्वांचेच प्रेम द्रौपदीवर बसलें होतें, तेव्हां एकट्या अर्जुनाशींच तिचा विवाह झाल्यास त्यांच्यांत तिच्या प्रेमापायीं भांडणें लागून 'सुंदोपसुंदा'सारखी त्यांची स्थिति होईल, अशी तिला भीति वाटली काय ? पण मग आपल्या नायकांच्या आतांपर्यंतच्या धीरोदात्त वर्तनावर, मातेची व वडिलांची आज्ञा शिरसामान्य करण्याच्या गुणावर, त्यानें विरजण पडत नाहीं काय ? अमेरिकेचे हॉप्किन्स साहेब म्हणतात कीं ' ही चाल हिंदुस्थानांतील आर्यांची नसून ती बाहेरून आंत आली असावी. " ह्या त्यांच्या म्हणण्यांत कांहींसा अर्थ आहे हें खरें; पण पांडवांखेरीज अशा प्रकारच्या विवाहाचें दुसरें उदाहरण सबंध भारतांत दुसरें एकही सांपडत नाहीं हें कसें ? तेव्हां आम्हास तर वाटतें कीं, यांत व्यासांचा हेतु लोकविलक्षण अशा गोष्टीनें थरारून सोडणाऱ्या व गुंतागुंतीच्या कथानकांत अधिकच रंग भरावा एवढाच असावा. कारण ह्याच्याचमुळें पुढें द्रौपदी " जिता कीं अजिता " ह्या वादास व इतरही कथानकास जास्त रंग चढला आहे. शिवाय दुसरी गोष्ट जी व्यासांच्या मनांत कादंबरीकार ह्या नात्यानें उभी राहिली असावी असें आम्हास वाटतें ती कथानकाच्या धाग्यांचे–चित्तास वेधून घेणाऱ्या सूत्रांचें–एकाच मध्यवर्ती पण मनोवेधक मुद्याभोंवतीं–गोष्टी भोवतीं–परिभ्रमण व्हावें हीं होय. कदाचित् पांच पांडव निर्माण न करतां एकच लोकविलक्षण नायक निर्माण करून त्याची भार्या द्रौपदीस करून नीतिमत्तेच्या सामान्य कल्पनेस त्यांस सांभाळतां आलें नसतेंच असें नाहीं; पण स्वभाववैचित्र्यानें–विशेषतः नायकांच्या स्वभाववैचित्र्यानें–होणारा रसपरिपोष त्यांत कदाचित् साधला नसता. विविध प्रकारचीं कार्यें करण्याची धमक एकाचेच अंगीं त्यांस कृत्रिमपणानें ठेवावी लागली असती. कदाचित् पांच पांडवांच्या निर्माणानंतर-प्रथम त्यांस पांच भार्या वेगळाल्या देण्याचा कदाचित् मानस असून–मागाहून वरील मध्यवर्ती गोष्टीवर लक्ष्य वेधण्याची कल्पना त्यांस सुचली असावी. व अर्थात् सामान्य नीतितत्वांच्या कल्पनेस धक्का लावूनसुद्धां त्याचें कसेंबसें समाधान करीत त्यांस आपला हेतु

पुरा करण्यासाठीं राहिलेली एकच तोड—म्हणजे द्रौपदी पांचांची भार्या करणें— ही त्यांनीं अमलांत आणली असावी पण "जयोनामेतिहासोयम्" ह्या त्यांच्याच वचनाप्रमाणें हा जर प्रत्यक्षच इतिहास असेल—व तो तसा आहेच—तर मग प्रत्यक्ष झालेल्या गोष्टींचें वर्णन करणें ह्याहून त्यांच्या हातीं तरी दुसरें काय होतें ? व वस्तुस्थितीचें दिग्दर्शन मात्र त्यांनीं फारच बहरीनें केलें आहे हें आतांपर्यंतच्या व पुढील वृत्तांतावरून वाचकांच्या निदर्शनास येणार आहे. असो.



# भाग २ रा.



मागील भागांत वर्णन केल्याप्रमाणें पांडव हे लाक्षागृहांतून जिवंत सुटले; एवढेंच नव्हे तर त्यांनीं द्रौपदीस्वयंवरांत पण जिंकून द्रौपदीसारखें राजकन्यारत्नही प्राप्त करून घेतलें इत्यादि हकीकत ऐकून ते वारणावतास जळून मेले असतील, ह्या समजुतीच्या भ्रमाच्या आनंदात असणाऱ्या दुर्योधनास व त्याच्या आंधळ्या बापास किती वाईट वाटलें असेल याची त्यांच्यासारख्या लोकांनाच कल्पना होणार आहे. वरकरणी मात्र ह्मातान्यानें आनंद दाखवला. दुर्योधनाचा मात्र दुःखानें व द्वेषानें संताप झाला. दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनी ही चांडाळचौकडी पांडवांच्या निःपाताबद्दल पुष्कळ बेत करूं लागली;—डोकें खाजवून युक्त्या शोधण्यांत दंग झाली. पण इकडे म्हाताऱ्या धृतराष्ट्रानें भीष्माचार्यांस "पुढें काय करावें ?" असा अभिप्राय विचारला असतां त्यांनीं झालेल्या निंद्य प्रकाराबद्दल धृतराष्ट्रास सणसणीत दोष दिला व नंतर स्पष्ट सांगितलें कीं, " यदि धर्मस्त्वया कार्यो यदिकार्यं प्रियंचमे । क्षेमंच यदि कर्तव्यं तेषामर्धं प्रदीयताम्॥." दुर्योधनादिकांनीं ह्याविरुद्ध पुष्कळ सांगून पाहिलें पण म्हाताऱ्याला ह्या वेळेस सद्बुद्धि सुचली असल्यामुळें कोणाचेंच कांहीं चालेना, व " राज्यार्धपांडवा दे " ह्या भीष्मांच्या उपदेशाप्रमाणें त्यानें खरोखरच पांडवास ' यमुनेच्या पश्चिमेकडील अर्ध्या देशावरील राज्य ' दिलें. व त्याप्रमाणें ' इंद्रप्रस्थ ' नगर वसवून धर्मानीं गादी स्थापिली व तो धर्मानें व न्यायानें प्रजेचें पालन करूं लागला. हां हां म्हणतां ' इंद्रप्रस्थ ' खरोखरच ' इंद्रप्रस्थ ' झाले ! कारागीर, व्यापारी ब्राम्हण तेथें येऊन राहिलें; मोठमोठ्या हवेल्या उठल्या व बाग बगीचे झाले, व सर्व नगरास रम्य शोभा आली !

नंतर पांच पांडवामध्यें द्रौपदीनिमित्त कलह होऊं नये म्हणून एकदां प्रत्यक्ष नारदमुनींची स्वारी तेथें आली व त्यांनीं प्रत्येकास " कीं, मास-द्वय बारा रजनी " अशी वांटणी करून दिली. दोघांच्या एकांताचा भंग ज्याचे हातून होईल त्यानें " बारा (महिने ?) वरुषें गृह वर्जावें " व त्या काळांत तीर्थयात्रा करीत हिंडावें असाही निर्बंध त्यांनीं घालून दिला. ह्याचें पालन बिचाऱ्या अर्जुनासच करण्याचा एकदां प्रसंग आला. कारण एके दिवशीं " चोरांनीं निजधेनु चोरिल्या धांवा धांवा ऐसे। शद्ब करित ते ब्राम्हण आले माझ्या द्वारासरिसे " असें अर्जुनच आपणास सांगत आहे. दुःखितांचें दुःख हरण करणें हें तर क्षत्रियांचें ब्रीदच असल्यामुळें अर्जुन तसाच बेभान स्थितींत शस्त्रागारांत धांवला. पण यावेळीं धर्म व द्रौपदी तेथें एकांतांत होतीं ! अर्थात् बिचाऱ्या अर्जुनाच्या नशींबीं बारा वर्षें ब्रह्मचर्यांत तीर्थयात्रा करीत फिरणें आलेंच. ब्राम्हणांच्या गाई त्यांस मिळवून देऊन व नारदांच्या नियमांस मान वांकवून धर्मराज नको नको म्हणत असतांही अर्जुन तीर्थयात्रेस निघाला. पण ही तीर्थयात्रा त्याच्या चांगलीच पथ्यावर पडली. कारण " तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला। आप्तमुखें निज मातुल–कुल–वृत्तांतासि ऐकता झाला " व तिथें त्याला आपल्या सुभद्रेचें लग्न दुर्योधनाशीं ठरलें आहे–"तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे" अशी त्यास वार्ता कळली. वास्तविक द्वारकेस असतांना व अगदीं लहानपणापासून अर्जुन–सुभद्रेचें हें भावी युगुल प्रेमानें एकत्र हंसलें–खेळलें होतें, एकत्र वाढलें होतें; अर्थात् प्रेमरज्जूनें एकत्र बद्ध झालें होतें. अलौकिक रीत्या त्यांचें लग्न केव्हांच होऊन चुकलें होते, हें आपणास " मीं कुमार तीही कुमारी, " " होतों द्वारका भुवनीं " इत्यादि अर्जुनाच्या उद्गारांवरून ठाऊकच आहे. पण याची पारख घसाळ अशा बळरामदादांस काय असणार ? त्यांनीं मारे धूमधडाक लग्नाची जारीनें तयारी केली व दुर्योधनास वर ' नेमस्त ' केलें. बिचाऱ्या सुभद्रेची स्थिति मात्र यावेळीं केंविलवाणी झाली. " हरिची भगिनी म्हणे सुभद्रा रुक्मिणिवहिनी दया करा। दादांना तुम्हि कळवुनि वळवुनि अर्जुनजींचा शोध करा ॥ " असें गयावया करून ती सांगत होती. अर्जुनालाही वरील वर्तमान ऐकून

फार वाईट वाटलें. कारण सुभद्रा अर्जुनास द्यायची असें ठरलें असून त्याचा असा शेवट व्हावा ही किती दुःखदायक गोष्ट आहे याची कल्पना तसा अनुभव ज्यास असेल त्यासच होणार आहे. प्रीतितरूला विविध निरागस थट्टांचें जल घालून तो फोंफावल्यावर त्याच्या मुळावरच कुठार घातलीं असतांना त्याला किती वेदना होतात तें प्रेमशास्त्रांतील एखाद्या जगदीशचंद्र बोसाशिवाय इतरांस कळणें कठिण आहे. असो. परंतु आतां याला इलाज काय ? द्वारकापुरींत लग्नाच्या तयारीची तर मारे धांदल उडाली आहे. " न मिळे अशी मौज पुन्हां पाहण्या नरा " असें नारदमुनी म्हणत आहेत. " हाय ! हाय ! " अर्जुनाच्या मनांत सुखदुःखाचे विचारतरंग उठूं लागले, " मला तीर्थयात्रेस निघून पुरे सहा महिनेही झाले नाहींत तोंच हें विपरीत वर्तमान ऐकण्याचा प्रसंग मज अभाग्याच्या नशिबीं यावाना ? आमच्या सुखानें सुखी होणाऱ्या व दुःखानें दुःख पावणाऱ्या श्रीकृष्णपरमात्म्यास आमचें प्रेम ठाऊक असून तोही या कार्यास अनुकूल झाला काय ? प्राणापेक्षां प्रिय मानलेल्या माझी त्यानीं शेवटीं अशी उपेक्षा केलीना? हाय ! हाय ! श्रीकृष्णदेवानेंच जर माझा त्याग केला असेल तर मी त्रिखंड हिंडलों तरी मला आतां सुखाची प्राप्ती कोठून होणार ? पण असें असेल काय ? श्रीकृष्णांनीं माझा खराच त्याग केला असेल काय ? ते मला प्रतिकूळ खरोखरच वागत असतील काय? छे ! माझी मनोदेवता मला खास सांगते कीं, एक वेळ बळरामदादा उलट जातील पण माझा सखा कृष्ण मला कधींच अंतर देणार नाहीं ! पण सुभद्राच दुर्योधनाच्या वेगडी वैभवास भुलून या विवाहास तयार झाली असली तर ? पण छे! गंगा नदी समुद्रास मिळायची सोडून एखाद्या कूपाकडे धांव घेणें जितपत शक्य तितकेंच हें शक्य आहे; " इत्यादि सुखदुःखात्मक विचारतरंगांच्या हिंदोळ्यावर अर्जुनाचें मन हेलकावे खात होतें ! इकडे सुभद्रेचीही पण तीच स्थिति झाली होती. तिला अन्नपाणी गोड लागेना किंवा कोणच्याही करमणुकीच्या गोष्टींत तिचें चित्त रमेना. सदा उदासवाणें व चिंतातुर अशी बसून ती स्वतांच्या मनाशींच म्हणे, " बलसागर वीरशिरोमणी पार्थराज, तुम्ही या वेळीं कुठें हो गेलां आहांत ? ह्या दासीची तुम्हाला कांहींच

कींव येत नाहीं काय? जिला प्रेमाचें आश्वासन दिलें तिला शेवटीं विसरून गेलांत काय? पांडुकुमार, पार्थराज, आपणास माझी स्मृति असो वा नसो, आपण वचन पाळा किंवा न पाळा, माझा मात्र आपणासच वरण्याचा ठाम निश्चय आहे. या कामीं माझा कंठनाल जरी कोणी चिरला तरी मी माझ्या निश्चयापासून रतिमात्र ढळणार नाहीं." दोन्हीकडे दोन प्रेमबद्ध-जीवांची तळमळ चालू आहे. प्रसंग मोठा अद्भुत, रमणीय, चित्त हेलावणारा आहे, व परिस्थितीच्या जालांतून सुटका होऊन यांचें मीलन कसें होणार हा मोठाच प्रश्न आहे. पण सर्व संसारजालाची गुंतीही सहज लीलामात्रें उलगडणारा चतुर जादुगार–श्रीकृष्ण–जातीनें त्या कामीं हजर असल्यावर त्यास उशीर तो किती लागणार? हां हां म्हणतां त्यानीं मोठ्या खुबीदार व बहारीच्या प्रसंगानें ही परिस्थितीच्या जाळ्याची गुंतागुंत सोडविली व अर्जुनास सुभद्रा मिळवून दिली. ती अशी कीं, अर्जुनाला 'त्रिदंडी' संन्यास देऊन त्यास रैवतक पर्वतावर "नारायण" करीत बसण्यास सांगितलें व इकडे बळरामदादांच्या कानांवर युक्तिप्रयुक्तिनें ह्या यतिमहाराजांची थोरवी जाईल अशी व्यवस्था केली. झालें! बळरामदादाच ते! असा असा थोर संन्यासी आणि तोहि आपल्या नगरासन्निध पवतावर येऊन उतरला आहे असें कळल्यावर त्यांच्या साधुसत्कारशील स्वभावास गप्प कसें बसवणार? त्यांना तसें थोडेंच राहवतें? लगेच यतिमहाराजांना आणून त्यांच्या सेवेला सुभद्रा अर्पण करायची असें त्यांनीं ठरविलं. कृष्णांनीं–हालवून खुंटा बळकट करून घेण्याच्या हेतूनें– बळरामदादांस मुद्दाम वरकरणी जागृत करण्याचा आव आणला.–"दादा, पाहाहो! या गोसावड्यांचा कांहीं विश्वास सांगवत नाहीं. अन् त्यांत सुभद्रेला तुम्हीं त्याच्या तैनातीस देणार म्हणता म्हणून म्हटलें. अहो, विश्वामित्र, पराशर, वशिष्ठ यांच्यासारख्यांची जिथें गाळण उडाली तिथें ह्या उपऱ्या संन्याशास तुम्ही आणून खुशाल सुभद्रेच्या अंतरमहालांत स्थापणार म्हणजे काय? पहा बोवा! मला कांहीं हें ठीक दिसत नाहीं. हो, कांहीं भलतें सलतें झालें, (आणि करणार होता हाच साऱ्या मुलखाचा लबाड!) तर उगीच माझ्यावर नको मग! मी आपला आधींच सुचवितों आहे." त्यावर बळरामही त्यास थोडेसे रागावून म्हणाले, 'पुरेरे

कृष्णा! तुझें सदा असेंच! तूं स्वतां कपटी म्हणून तुला सगळीकडे कपटच भरलेंलें दिसतें आहे! पण ज्याला भेदभाव उरला नाहीं अशा ह्या संन्याशासारख्या महात्म्यापासून–ते केवढ्याहीं रतींच्या समाजांत विहरले तरी–अशा रतींना काय भीति? याचीही उदाहरणें नाहींत असें तुला वाटतें काय? अरे, बलभीम मारुतिराय, शुकाचार्य इत्यादिकांनीं नाहींका पुरें ब्रह्मचर्य पाळलें? आणि आजमितिला प्रत्यक्ष भीष्मगुरु माझ्या म्हणण्याची साक्ष द्यायला मूर्तिमंत जिवंत आहेतना? छे, छे! कृष्णा तूं फारच शंकेखोर बुवा!" "बरें बुवा, मी चुकलों. हे तुमचे पाय धरतों, मग तर झालेना?" असें म्हणून त्या कपटनायक कृष्णानें खरोखरच दादांचे पाय धरले! तेव्हां दादांचा राग पार कोठच्या कोठे पळाला व कृष्णाला वर उठवीत ते म्हणाले, "छे, छे! कृष्णा, अरे पाय नको कांहीं धरायला अगदीं. पण साधुसंतांच्या बाबतीत जरा जपून बोलत असावें. समजलें ना बाळ?" असें म्हणून प्रेमानें त्यांनीं त्याच्या मुखावरून हात फिरविला! भक्तासाठीं सर्व जग ज्याच्या पायावर लोळण घेत आहे अशा परमात्म्यानें बळरामासारख्या व्यक्तीचें प्रसंगीं पाय धरण्यासही तयार व्हावें हें दृश्य किती मजेदार आहे? ह्यावरून त्या दयाघनाची भक्तवत्सलता व भक्तप्रेम किती अगाध आहे याची चांगलीच कल्पना होते. अस्तु.

वरीलप्रमाणें बेत ठरून यतिमहाराजांची–अर्जुनाची–स्वारी सुभद्रेच्या सेवेचें अहर्निश सुख भोगण्यास भोळ्याभाबड्या पण सरळवृत्तीच्या बळरामदादांच्या येथें येऊन तर पोंचली. श्रीकृष्णांनीं रचलेल्या पायावर इमारतीचा उठाव इथवर तर ठीक झाला. पुढील मजले चढविणारही तोच कुशल सूत्रधार असल्यावर काळजीचें कांहींच कारण नव्हतें. पण अर्जुनाची सुभद्रेच्या सांनिध्यानें आपला यतिवेष सांवरता सांवरता जी तिरपीट उडाली आहे ती कांहीं पुसूंच नये. हातांतली गोमुखी वारंवार गळून पडली, आशीर्वाद देतांना जिव्हा अडखळूं लागली, व निर्लज्जपणें सुभद्रेचा वदनेंदु टकमक पाहण्याचें त्याच्या नयनचकोरांचें कामच होऊन बसलें. भोजनप्रसंगींहीं, " घाली सारें मीठ तुपांताचि दुग्धीं लिंबू पिळिलें " असाच थाट उडे. त्याचे पंतानींही, " यतिदर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ। न बळ प्रेक्षी परि यतिहस्तींचा पाहतां गळे

कवळ ॥ " असें बहारीनें वर्णन केलें आहे. होतां होतां लवकरच असणाऱ्या एका पर्वाच्या निमित्तानें सर्व मंडळी एकदां पर्वस्नानास जाण्यास निघाली. कृष्णांनीं अर्जुनाची आधींच पुढील सर्व जय्यत तयारी ठेविली होती. त्या वेळेस मात्र अर्जुनास धीर आला व तो स्वतांशींच म्हणाला, "मोडुनि दंडा फेंकुन देइन भिकार भगवीं वस्त्रें । मशकांपरि तीं उडविन सारीं यादवचमुशस्त्रास्त्रें ॥ " झाले, व खरोखरीच तसें झालें. सर्व मंडळी स्नानांत गुंतली आहेत असें पाहून अर्जुनानें सुभद्रेस रथांत घेऊन यादवांचे लोक झोडपींत जो रथ दामटला तो पार हां हां म्हणतां दिसेनासा झाला! बळरामदादांस हें वर्तमान कळतांच मग काय विचारतां ? शीघ्रकोपीच ते ! प्रसन्न झाले तर ढुंगणाचें सोडून द्यायचे अन् रागावले कीं मुसळाखालीं टाळकें सडकायचे ! त्यांच्या ह्या शीघ्रकोपी, धांदल्या पण कळकळीच्या वृत्तीच्या स्वभावाचें चित्र मोरोपंतांनीं दोन चार आर्यांत फारच बहारीनें रेखाटलें आहे. यावेळेस दादांची धांदल कशी उडाली तें पंत सांगतातः—" कोठे रथ ? मुसळ पुरे ! कवच कशाला ? धनुष्य राहोंद्या " इ. काय धांदल ही ! " कुठाय कुठाय तो हरामखोर ! " दादा खवळून बोलत होते, " जातो कुठें गुलाम. कुठायरे माझा नांगर अन् मुसळ ! कुठें त्रिखंडांत गेला असला तरी तेथून धुंडून काढून त्याचें टाळकें सडकलें नाहीं तर नांवाचा दादाच "—" हां हां दादा, पण झालें काय एवढें रागवायला ? " पाळतीवर असणारा कृष्ण लगेच पुढें येऊन म्हणतो. " अरे व्हायचें काय ? " दादाही त्या रागांतल्या त्रासिक स्वरानें म्हणाले, " त्या लफंग्यानें आपली कारटी पळवलीन् ना ?" " पहा, तरी मी आधीं म्हणत होतों ! " कृष्ण तशाही स्थितींत विनोद करीत म्हणाले. " बरेरे. मला तर वाटतें कृष्णा, कीं यांत तुझेंच कांहीं तरी अंग असलें पाहिजे. " " काय माझें अंग ? " अत्यंत आश्चर्य दाखवीत व आपण जणूं काय त्या गांवचेच नव्हत असा आंव आणीत कृष्ण म्हणाले, "मग निकालच लागला म्हणायचा. चोर सोडून संन्याशाला फांशी देण्यांतलाच हा प्रकार म्हणायचा ( आणि होता खरोखरी हाच चोर ! ) " नंतर बळरामदादा अगदीं फारच निकरावर आलेले पाहून कृष्णानें हळूच खरी गोष्ट त्यांच्या कानांवर घातली. त्या वेळेस दादांस आनंद होऊन

अर्जुनाचा आदरसत्कार करण्यासाठीं जी त्यांची धांदल उडाली आहे त्याचें कोठवर वर्णन करावें ? " जा, जा. त्याला एकदां लवकर घेऊन या " आनल्या नोकरास–सेवकास आज्ञा करीत ते म्हणाले, " अन् कृष्णा, तूं कसा मजजवळ मग कांहींच बोलला नाहींसरे या बाबतींत ? बरें तर चला; त्याला घेऊन या लवकर, आणि हें पहा"–जाण्यास निघालेल्या सेवकास तसेंच थांबवून दादा उतावळीनें पुढे म्हणतात, " तो जर आला नाहीं कि नाहीं तर माझ्या पायाची शपथ आहे म्हणावं " सेवक निघून गेल्यावर दादा स्वतांशींच म्हणतात, " गुलाम ! तसाच पोरीला घेऊन चालला होता ! " असें म्हणून सरलहृदयाच्या दादांनीं मंद हास्य केलें ! पंतानीं दादांच्या ह्यावरील धांदलीचेंही, " जा जा उठा ! मुलीला पाहों; वाटों वरा, घरा आणा । प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा ॥ " असेंच वर्णन केलें आहे. असो. याप्रमाणें अर्जुनास सुभद्राप्राप्ति झाली. थोरांच्या–राजघराण्यांतील–लग्नाचा थाट किती असतो त्याचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. अशाच थाटांत सुभद्रेची वरमाला अर्जुनाच्या गळयांत पडली एवढें सांगितलें म्हणजे बस्स आहे.

सुभद्रेच्या पाणिग्रहणापूर्वींच आमचे अर्जुनजी तीर्थयात्रा करतां करतां गंगाद्वारास गंगेमध्यें स्नानास उतरलें असतां ' उलुपी ' नांवाच्या नागकन्येकडून नागलोकीं ओढले गेले होते व तिच्या विनंतिवरून तेथें एक रात्र राहून मग बाहेर पडले होते. तसेंच पूर्वेकडील समुद्रकिनाऱ्यावर असणाऱ्या मणिपुरच्या राजकन्येवर–चित्रांगदेवरहि ते फिदा होण्यास चुकले नाहींत. आणि तरी सुद्धा ब्रह्मचर्यव्रतानें राहण्याचा नारदांनीं नियम घातला होता ! एवढी एकच गोष्ट–एकच विसंगत विधान किंवा विधानाची विसंगति–" महाभारत हें निरनिराळया लेखकांच्या हातांतून गेलें असलें पाहिजे " ह्या हॉप्किन्सप्रभृति परिक्षकांच्या म्हणण्याची साक्ष पटवून देण्यास बस्स आहे असें आम्हास वाटतें. असो. पण याचा अधिक सविस्तर विचार ह्या पुढील खंडांत– म्हणजे " भारतवर्षाच्या धार्मिक व वाङ्मयात्मक इतिहासां"त करूं.

सुभद्रेचा स्वभाव मोठा मर्यादशील व गोड होता व द्रौपदीची

आपण धाकटी सवत होणार ही गोष्टही ती विसरली नव्हती. म्हणून इतर वडील स्त्रियांबरोबर द्रौपदीसही नमस्कार करून "या दासीला पदरांत घ्यावी," असें म्हणण्यास ती चुकली नाहीं. व पुढें लवकरच आपल्या गोड स्वभावानें केवळ द्रौपदीचेंच काय पण सर्वांचेंच प्रेम तिनें संपादन केलें. कांहीं वर्षांनीं सुभद्रेला श्रीकृष्णाचा पंचीप्यारा असा बाळ अभिमन्यू झाला. याची गम्मत अशी सांगतात कीं हा पोटांत असतांना सुभद्रा व श्रीकृष्ण एकदां एकत्र आनंदांत गप्पागोष्टी करीत बसले असतां चक्रव्यूह कसा भेदून जावा याची हकीकत श्रीकृष्ण सुभद्रेस सांगत होते. सुभद्रा "हुं"कार देत होती, पण कांहीं वेळानें पडल्यापडल्या सुभद्रेचा डोळा लागला. तथापि "हुं"कार चालूच असल्यानें श्रीकृष्ण ती हकीकत तशीच पुढें सांगत होते. सांगतां सांगतां चक्रव्यूह भेदून आंत कसें जावें येथवर सांगणें झालें; व त्याचवेळीं श्रीकृष्णांची सहज आपल्या "भगिनी" कडे नजर गेली तों तिचा तर डोळा लागला आहे! आणि "हुं"कार तर येतोच आहे. तेव्हां विनोद करावा असें वाटून त्या जगन्नायकानें सुभद्रेस जागृत केलें व "वा! ताई, चांगली गोष्ट ऐकते आहेस हं! तूं तर पार झोपींच गेलीस! हो पण खरेंच. तुझे कान उघडे होते नाहीं कां? मी विसरलोंच!" असें म्हणून परमात्मा हंसूं लागले! सुभद्रेनेंही जागृत व लज्जित होऊन मंदस्मित केलें. "बाकी उदरस्थ वीर पुढें चांगलाच पराक्रमी होणार बरं कां! तो आतांपासूनच शौर्याच्या कथा ऐकून "हुं"कार देतो आहे" देवांनीं आणखी थट्टा करून सुभद्रेस अधिकच लाजविलें. पण याच वेळीं श्रीकृष्णास दुसरें कांहीं काम निघून ते दुसरीकडे गेले व त्या चक्रव्यूहाची—चक्रव्यूह भेदाची—हकीकत तितकीच अर्धवट राहिली ती शेवटपर्यंत तशीच अर्धवट राहिली. सुभद्रेच्या उदरस्थ गर्भाला—भावी अभिमन्यूला—बिचाऱ्याला चक्रव्यूह भेदून आंत कसें जावें एवढेंच ज्ञान मिळालें! हाय! ह्याच अर्धवट ज्ञानानें पुढें त्यांस किती गोत्यांत आणलें—त्याच्या प्रत्यक्ष जिवावर कशी येऊन बेतली व त्यांतच त्याचा कसा अंत झाला इत्यादि हृदयविदारक हकीकत पुढें युद्धाचें वर्णनप्रसंगीं येणारच आहे. खरोखर विधिघटना विचित्र खरीच! पण श्रीकृष्ण परमात्म्याच्या हें लक्षांत येऊं नये काय?

कोणी सांगावें ? त्यांत त्या जगन्नियंत्याचा तसाच कांहीं हेतू असण्याचा– अभिमन्यूच्या वधानें दुर्योधनादि दुष्टांच्या पापांच्या घड्यांत अगदीं शेवटच्या घटकेस, प्रत्यक्ष रणांगणावरही भर घालून तो अधिकच तिरस्करणीय करण्याचा त्यांचा विचार असून त्यासाठीं मुद्दामच त्या सर्वज्ञानें आपली हकीकत पुन्हां पुढें सांगितली नाहीं–शेवटास नेली नाहीं–असेंही असण्याचा संभव आहे. अस्तु. तसेंच वरील अभिमन्यूच्या "हुं"कारावरून व त्याच्या भावी चरित्रावरून एवढें निश्चित होतें कीं, उदरस्थ गर्भावर जसे संस्कार करावेत तसें बिचारें तें पोर निपजतें. वीरांच्या, साधूंच्या, कथा त्यास ऐकविल्या तर तें पराक्रमी, साधुवृत्ति निपजेल; छानछोकीच्या व विलासाच्या गोष्टी त्याजवळ केल्यात तर त्याचीहीं आवड तशीच होईल हें काय सांगावयास पाहिजे? तसेंच नेहेमीं भांडण-तंटे, व शिव्यागाळी त्यास ऐकविली तर तो पोर तसाच इरसाल कोपिष्ट बनेल हेंही उघड आहे. पण याचा विचार आमच्यांतील किती अंतर्वत्नी-गर्भिणी–स्त्रिया करीत असतील ? किती पुरुषांना या गोष्टीपासून बोध घेण्याची इच्छा होत असेल ? असो.

यानंतर यमुनातीरीं असणारें खांडववन जाळण्यास श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं अग्नीस मदत केली. त्या कामीं जरूर म्हणून अग्नीनेंही श्रीकृष्णास सुदर्शनचक्र व अर्जुनास गांडीव धनुष्य व बाणांनीं भरलेला एक अक्षय्य भाता दिला. या खांडववनांतून–जळणाऱ्या अरण्यांतून–महत्त्वाच्या अशा दोन व्यक्ति वांचल्या. एक तक्षकासह त्याचा पुत्र अश्वसेन सर्प, व दुसरा मयासुर राक्षस. अश्वसेनानें अर्जुनाचा सूड कसा उगवण्याचा प्रयत्न केला तें पुढें आपण भारतीय युद्ध प्रसंगीं पाहूं. मयासुर हा अर्जुनास शरण आल्यामुळें वांचला होता. हा शिल्पशास्त्रांत मोठा प्रवीण असल्यामुळें त्यानें आपल्या जीवनदात्या अर्जुनाच्या उपकारांची फेड श्रीकृष्णप्रभूच्या–भावी गोष्टींच्या भवितव्यतेची जुळवाजुळव करणाऱ्या परमात्म्याच्या–सांगण्यावरून युधिष्ठिराकरतां एक अत्यंत रम्य व मनोहर सभागृह बांधून केली. सोन्याचे खांब व रत्नांचे दरवाजे, सभागृहास शोभा आणीत होते. मध्यभागीं विलसणाऱ्या, खऱ्यासही मागें टाकणाऱ्या कृत्रिम सरोवराची शोभा तर कांहीं अपूर्वच होती. पण याच मयसभेच्या

मायावी बाजारानें पुढें केवढा अनर्थ ओढवला हें आपणास लवकरच कळणार आहे. धाग्यांची बहारीची गुंतागुंत उर्फ सांखळी वाढत चालली आहे ! वाचकांनीं जरा दमानें घ्यावें अशी त्यांस नम्र विनंति आहे. या सभेसाठीं हिमालयावरील कैलासाजवळील बिंदुसरोवराचे प्रांतांतून आणलेल्या सामानांत आणलेली दिव्य गदा मयासुरानें भीमास दिली व देवदत्त शंख अर्जुनास अर्पण केला. भावी युद्धाच्या सामुग्रीची तयारी कशी सूक्ष्मपणें चालली आहे हें वाचकांनीं नीट लक्ष देऊन पाहावें ! असो; त्यानंतर 'कच्चित्'प्रश्नरूपानें धर्मराजास याच वेळी राजनीतीचा बिनमोल पाठ शिकविण्यास आलेल्या नारदमुनींनीं राजसूययज्ञानें राजा हरिश्चंद्रास इंद्रसभेंत कसें स्थान मिळालें तें, व त्यामुळें स्वर्गवासी पांडुराजाची आपल्या जेष्ठपुत्रानेंही–राजा धर्मानेंही–तसाच यज्ञ करावा अशी असलेली इच्छाही त्यास निवेदन केली. त्यामुळें साहजीकच तो यज्ञ करावा अशी धर्मराजास उत्कट इच्छा झाली व त्यासाठीं त्यांनीं द्वारकेहून श्रीकृष्णस बोलावून घेतलें. श्रीकृष्णांनीं त्या कामीं असणारा मगध देशच्या राजा जरासंधाचा जबरदस्त अडथळा त्यास सांगितला. बालपणीं कंसास मारून श्रीकृष्णानीं ह्याच्या भगिनीस–कंसभार्येस–विधवा केले होते व ही भयंकर स्वारी ज्या वेळेस मथुरेवर चालून आली त्या वेळेस श्रीकृष्णांसुद्धां सर्व यादव याच्या भयानें द्वारकेस जाऊन राहिले होते इत्यादि प्रकार सांगून श्रीकृष्ण पुढें म्हणाले, "धर्मा, असें हें जबरदस्त प्रकरण आहे समजलास. अरे, यानें ८६ राजे तुरुंगात घातले असून त्यांची संख्या १०० झाली कीं हा दुष्ट त्या सर्वांस महादेवास बळी देणार आहे ! तेव्हां याचा कांटा एकदा काढल्याशिवाय तुझे सार्वभोमत्वही सिद्ध होणार नाहीं व तुझा यज्ञही सुखरूपपणें तडीस जाणार नाहीं. तेव्हां मी, भीम व अर्जुन असे तिघे जाऊन याचा कांटा काढून येतों" असें म्हणून या जबरदस्त धेंडापुढें यांचा कसा काय टिकाव लागेल ह्या काळजीनें त्यांना नको नको म्हणणाऱ्या धर्माचें योग्य शब्दांत समाधान करून, ते तिघे निघालेच ! जरासंधाच्या दोन माता होत्या व प्रत्येकीस अर्धा अशी ही स्वारी–अर्थात् मृतावस्थेंत–झाली होती. पण चव्हाट्यावर टाकलेल्या त्या छकलांना ' जरा ' राक्षसीनें सांधलें ( व त्यांत जीव आला )

म्हणून याचें नांव 'जरासंध' असें ठेविलें होतें. बिचाऱ्या जरेस काय कल्पना कीं, आपण जसा याला जोडला किंवा सांधला तसाच हा पुढें भीमाच्या हातून फाडला जाणार आहे! पण हें बालक पुढें फार दिवटें निघालें व प्रभूला–अनाथांच्या व गरिबांच्या रक्षणासाठीं अवतार घेणाऱ्या श्रीकृष्णाला–भीमाकरवीं तें तसेंच फाडावें लागलें; स्वतांच्या पापाचीं फळें स्वतः भोगावीं लागतात. त्याला कोण काय करणार? लवकरच आमचे तिघेही वीर–योद्धे मगधदेशच्या 'राजगृह' राजधानीस पोंचले व तेथील राजवाड्यांत शिरून त्याला कृतकर्माची आठवण देऊन–कारण आपण ह्यांत कांहीं पाप करीत आहोंत असें सुद्धां न वाटतां उलट आपण हें एक शतकृत्यच करीत आहोंत असें वाटण्याइतका त्या बिचाऱ्याचा अधःपात झाला होता; तेव्हां–त्याला नीट जागे करून त्याच्या भयंकर पापाचें हिडिस चित्र त्याच्यापुढें उभें करून श्रीकृष्णांनीं प्रत्यक्ष रावणमहाराजांच्या ह्या छोट्या अवतारास तिघांतून कोणाशींही द्वंद्वयुद्ध करण्यास आव्हान केलें. जरासंध शुद्धीवर आला, पण तो अशा–त्याच्या कल्पनेप्रमाणें असणाऱ्या–डुरकवण्यांनीं भिणारा नव्हता. त्यानें ताबडतोब भीमास युद्धास हटकलें व मग त्यांची जी कांहीं जुंपली आहे त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. तो प्रचंड सामना अद्वितीय झाला. दोघेही प्रचंड व कसलेले वीर होते व त्यांची झटापट मोठी प्रेक्षणीय झाली. भीम एवढा प्रबळ पण त्यालाही जरासंध लवकर दाद देईना. शेवटीं श्रीकृष्णांच्या इशारतीप्रमाणें जरासंध थोडासा दमलेला पाहून भीमानें चपळाईनें लगट केली व गरगर फिरवून त्यानें त्यास जमिनीवर आपटलें. नंतर त्याचा एक पाय दाबून धरून दुसरा अशा कचक्यानें ओढला कीं, जरासंध बरोबर मध्यें फाडला गेला! अशा रितीनें गरीबांना सलणारा हा पृथ्वीवरील कांटा उपटला गेला व धरणी मातेला हायसें वाटलें! बंदिवास भोगणाऱ्या दुर्दैवी राजांची बंदिवासांतून मुक्तता झाली!

जरासंधवध करून आमचे तिघे वीर लवकरच परत आले. त्यानंतर राजसूय यज्ञासाठीं भीमार्जुनादि धर्मराजाच्या चार भावांनीं चारी दिशांस दिग्विजय करून अपार करभार आणला व राजा धर्माचें सार्वभौमत्व सिद्ध केल्यावर मग मात्र राजसूय यज्ञास सुरवात झाली. पण

अजून एक संकट टळायचें होतें. 'अग्रपूजे'चा मान कोणास द्यावा याबद्दल शिशुपालानें–श्रीकृष्णाच्या कट्टया वैऱ्यानें–सभेंत बखेडा माजवला, व भीष्माचार्यांसारख्या वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध तपस्व्यांनीं "हा मान श्रीकृष्णासच द्यावा" असा आपला अभिप्राय दिला असतां शिशुपाल श्रीकृष्णाला अद्वातद्वा शिव्या देऊं लागला! चेदिदेशचा हा बलाढ्य राजा जन्मतःच तीन डोळे व चार हात अशी कुरूप मूर्ति झाली होती. त्याची आई ही श्रीकृष्णाची आत्या होती. श्रीकृष्णाच्या मांडीवर ठेवलेल्या ह्या बालकाचें श्रीकृष्णाच्या कृपेनें वरील कुरूपत्व नाहींसें झालें होतें. पण श्रीकृष्णच त्याचा शत्रु हीही गोष्ट त्यावेळेस उघड झाली. कारण इतरांकडून हें कुरूपत्व जाणार नव्हतें. तेव्हां त्या मातेच्या–आपल्या आतेच्या प्रार्थनेवरून त्याच्या "शंभर अपराधांची" क्षमा करण्याचें श्रीकृष्णांनीं तिला वचन दिलें होतें. त्याप्रमाणें त्याचे शंभर अपराध आतां भरत आले होते. तेव्हां यज्ञास विघ्न करण्यास सज्ज झालेल्या शिशुपालाचा कसा बंदोबस्त करावा याची धर्मास पंचाईत पडली. कारण शिशुपालास साह्य करणारे कांहीं नराधमही तेथें होतेच. भीष्मांचीसुद्धां 'क्लीबत्वा'दि नीच आरोपांनीं निंदा करणाऱ्या शिशुपालाच्या अंगावर भीमसेन गदा घेऊन धांवून गेला. पण भीष्मांनीं त्याचें निवारण केलें व ज्या राजांच्या जोरावर शिशुपाल बडबडत होता त्यांस मी करंटासमान लेखतों असें वृद्ध पण तेजस्वी भीष्माचार्य म्हणाले. सर्व राजांनीं नुसती कोल्हेकुई केली! पण एकाही राजाची छातीठोक उभ्या राहिलेल्या भीष्मांना हात लावण्याची माय व्यायली नाहीं! इतक्यांत नुसत्या दृष्टीच्या पातानेही सर्व ब्रह्मांड जाळण्याची ताकद असणाऱ्या श्रीकृष्णाचें सुदर्शनचक्र गरगर फिरत गेलें व क्षणार्धात् शिशुपालाचा तिथें मुडदा पडला! त्याबरोबर मात्र बाकीचे कोल्हे घाबरले व प्रत्यक्ष श्रीकृष्णाच्या रक्षणाखालीं पुढें मात्र मग हा यज्ञ एकदाचा सुखरूपपणें पार पडला!

वास्तविक ज्या यज्ञांत प्रत्यक्ष वेदोव्यास 'ब्रह्मा' होते व जो यज्ञ-समारंभ मयासुरासारख्या अप्रतीम शिल्पकारानें निर्मिलेल्या अद्वितीय सभागृहांत झाला त्या यज्ञांत असें विघ्न यायला नको होते; पण होणाऱ्या गोष्टीस कोण काय करणार? ही मयसभाच पांडवाना, वरून कितीही

दिखाऊ व सुंदर असली तरी, एके प्रकारें नाठाळ लागली असें म्हणावें लागते. कारण वरील यज्ञाचा शेवट होतो न होतो तोंच तिनें पुढील संकटाचाही पाया तिथेंच घातला असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण यज्ञसमारंभासाठीं आलेल्या दुर्योधनाच्या याच सभेंत मागाहून झालेल्या फजितीनें आधींच पांडवांच्या द्वेषानें जळणाऱ्या त्याच्या हृदयांत आगीचा चांगलाच भडका उडाला; व त्यांत त्याला हंसणाऱ्या पांची पांडवांच्या व द्रौपदीच्या मानाची व अब्रूची आहुति पडून त्यांच्या छलाची व विटंबनेची–विशेषतः द्रौपदीच्या विटंबनेची–परमावधि झाली. मागील छलावें उट्टे फेडून घेण्यासाठीं पांडव व द्रौपदी त्याला हंसलीं असतील; पण त्याचा किती भयंकर परिणाम झाला ते आपणास लवकरच कळणार आहे. मयसभेची रचनाच अशी कांहीं चमत्कारिक होती कीं, जिथें जें असेल त्याच्या उलट मनुष्याला वाटावें व तो फसून त्याची त्यांत फजिती व्हावी. ही अलौकिक शोभा व मौज खरी; पण ती ज्याचें आपलें नीट आहे–बरोबरीच्या नात्यानें व मनमोकळेपणानें जो आपणाशीं वागत आहे, अशा मित्रांची घटकाभर मौज करण्यास ठीक आहे. पण दुर्योधनासारख्या आधींच पांडवांचा द्वेष करणाऱ्या खलाची तेथें फजिति म्हणजे जाणून बुजून वस्त्रांत अग्नि बांधून घेणें होतें. पण असा प्रकार झाला खरा! मयसभेची शोभा पहात हिंडत असतां स्फटिकाच्या फरशीला पाणी समजून दुर्योधनानें आपलीं वस्त्रें वर धरलीं, व पाण्यालाच स्फटिक समजून तो त्यांत पडला; बंद केलेल्या स्फटिकद्वारास उघडें समजून दुर्योधनानें त्यावर आपलें डोकें आपटून घेतलें, व उघड्या द्वारास बंद समजून तें उघडण्यास जातांच विचारा तोंडघशी पडला! "अंधपुत्रच ना!" भीम म्हणाला, "अंधळ्या बापाचा मुलगाही अंधळाच! त्याला कुठलें दिसायला!" ह्या भीमाच्या कोटीनें सगळीकडे हंशाच हंशा पिकला व आधींच फजीत पावलेल्या दुर्योधनास मेल्याहूनही मेल्यासारखें झालें. त्यांतल्यात्यांत द्रोपदीसारख्या राजस्त्रियाही त्यांस हंसल्या तें पाहून तर त्याच्या अंगाचा भडकाच उडाला–त्याच्या तळपायाची आग मस्तकास जाऊन पोचली. दुर्योधन किती झाला तरी मानी राजा होता. त्याला द्रौपदीसारख्या स्त्रियांनीं व पांडवांच्या नोकराचाकरां-

नींही हंसावें ही गोष्ट त्यास सहन होणें शक्यच नव्हतें. तेव्हां साहजीकच दुर्योधनास चीड आली व इतक्या दिवस धुमसत असलेला वैराग्नि आतां उघडपणें बाहेर पडला. पण शकुनिमानानें—गांधारीच्या भावानें—'राजमंदिरीं शिरलेल्या कवड्यानें '—एक अजब क्लृप्ति किंवा योजना या कामीं सुचविल्यामुळें दुर्योधनानें आपला तो राग आवरता घेतला व मामांच्या योजनेंप्रमाणें डाव टाकण्याचें—फांसा टाकण्याचें ठरले !

आणि खरोखरच लवकरच फाशांचा खेळ सुरूं झाला. जसें कांहीं दोघांमध्यें कांहींच द्वेषभाव नाहीं असें दाखवून शकुनिमामांच्या प्रेरणेनें व थोडेसे आढेवेढे घेऊन कां होईना पण मिळविलेल्या म्हाताऱ्याच्या—लोभी धृतराष्ट्राच्या—संमतीनें दुर्योधनानें धर्मराजास द्यूतास—फांसे खेळण्यास—बोलावलें आणि धर्मराजासही त्या वेळच्या समजुतीप्रमाणें तें बोलावणें नाकारतां येईना ! आणि हां हां म्हणतां दुर्योधनानें ह्या गोष्टीचा फायदा घेऊन धर्मराजास ह्या फाशांच्या फासांत चांगलेंच जखडून टाकलें; तें इतकें कीं, त्यामुळें अधोवदन होऊन गुलामाप्रमाणें स्वस्त्रीच्या अब्रूचा होणारा भर दरबारांतील लिलांव उघड्या डोळ्यांनीं त्यांस आपल्या सर्व बंधूंसह पहावा लागला व सर्व घरादारास व राज्यास मुकून १२ वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास आपल्या सर्व बंधूंसह केला तेव्हां कुठें त्या फांसातून त्यांची सुटका झाली. ती हकीकत पुढें येणारच आहे. इतक्या करकचून टाकणाऱ्या फांसाच्या वरच्या दृश्य स्वरूपाची—फांशांच्या खुळखुळाटाची—मोहनी मात्र विलक्षण होती व त्याच मोहनींत गुरफटून धर्मराज कंगाल बनले व स्वस्त्रीची अब्रू जाण्याचा दुर्धर प्रसंग त्यांनीं आपणावर ओढवून घेतला. धर्मराजासारखा इतर सर्व गोष्टींत सत्वशील सज्जनही ह्या फाशांच्या फासांत राजीखुषीनें—आनंदानें—गुरफटला जावा यावरून ह्या द्यूताची—जुगारीची—मोहिनी केवढी अजब आहे व तिच्यापायीं शेंकडों लोक कसे धुळीस मिळत आहेत याचा चांगलाच उलगडा होतो. पण थोरांचें झालें म्हणून व्यसन कांहीं सद्गुण होत नाहीं. व्यसन तें व्यसनच, व जरी अशा थोरांसही तें भोंवतें यावरून त्याच्या विलक्षण शक्तीचें—मोहनीचें क्षणभर आश्चर्य केलें तरी शेवटीं त्याचा त्यागच करावयास पाहिजे. वास्तविक परस्त्री, मद्य, द्यूत आणि मृगया

हीं चार किंवा निदान पहिलीं तीन तरी राजांस किंवा श्रीमंत थोरांस सर्वनाशाच्या खड्ड्यांत नेऊन सोडणारीं मोहक व्यसनें आहेत–या चार अजब मोहिनी आहेत–व त्यांपासून राजासारख्यांनीं नेहमीं दूर असावें हें धर्मराजास ठाऊक नव्हतें किंवा नसावें असेंही नाहीं. पण ज्याप्रमाणें कामुकाला सुंदर स्त्रीच्या दर्शनाबरोबर अनावर लोभ सुटतो, पक्क्या दारुबाजाला वारुणीची बाटली दिसली कीं, तो तिच्याकडे आकर्षिला जातो त्याचप्रमाणें तो फांशांचा खुळखुळाट व छक्छक् असा आवाज कानीं पडल्याबरोबर धर्मराजाची सारासार बुद्धि विलयास गेली व एखाद्या झपाटलेल्या मनुष्याप्रमाणें अवश होऊन तो त्यांत खेंचला गेला! परस्त्रीच्यापायीं चौदा चौकड्याचा राजा रावणसुद्धां कसा धुळीस मिळाला हें आपण रामायणांत पाहिलेंच आहे. द्यूताच्या पायीं नलराजासही—पुण्यश्लोक नलराजासही–कसें स्वराज्यास मुकावें लागलें याचा इतिहासही असाच बोधप्रद आहे, व परस्त्रीच्या व वारुणीच्या–मद्याच्या–धुंदींत संभाजी संगमेश्वरीं कसा गिरफदार झाला याचाही अशाच तऱ्हेचा उपदेशपर वृत्तांत "हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाचें" अवलोकन करतांना पुढें आपणास तृतीय खंडांत कळून येणारच आहे. तेव्हां अशा सर्वनाशी व्यसनत्रयींपैकीं एकाच्या आधीन धर्मराज झाले; ते इतके कीं, त्यापुढें स्वस्त्रीची अब्रू-नव्हे, पातिव्रत्यही जवळजवळ उघडें केलें जाण्याचें पाप पदरीं घेण्यासही तें कचरले नाहींत. हरहर! व्यसनाधीन मनुष्य काय काय करील तें कांहीं सांगवत नाहीं. प्राणी एकदां व्यसनाधीन झाला म्हणजे मग तो राजा असो, पंडित असो, बृहस्पति असो किंवा वाचस्पति असो; सर्वांना तें अगदीं नादान व कुचकामाचें बनवतें हेंच खरें. मद्याच्या पायीं शुक्राचार्यांसारखा तपस्वी पण त्याची कोण दुर्दशा उडण्याची वेळ आली! तेव्हां ह्या व्यसनाच्या झपाट्यापासून जो दूर असेल तो खरा सुखी होय! परंतु आमच्या धर्मास सध्यां त्याचें काय होय? एखाद्या पतंगाप्रमाणें द्यूताच्या झगझगीत फाशाच्या दीपावर त्यांनीं उडी घातली व त्यांत स्वतांची, स्वतांच्या बंधूंची व सर्वांच्या भार्येच्या अब्रूची राखरांगोळी करून टाकली.

डाव अगदीं रंगांत आला होता. शकुनि व धर्म दोघेही अक्षविद्येंत

कुशल होते. पण शकुनि धर्मापेक्षां शतपट जास्त कुशल होता. पण ह्याची जाणीव वेड्या धर्मास कुठें होती ? त्यांतच पुढील गोष्टीची भर पडली. शकुनीजवळ दुर्योधनादि व धर्माजवळ भीमादि मंडळी बसलेली असत, व असें सांगतात कीं, प्रथम प्रथम प्रत्येक डाव शकुनीच्या आंगलट येऊं लागला. कारण ते फांसे होते जरासंधाच्या हाडाचे व त्या जरासंधास भीमानें ठार मारलें असल्यामुळें, जरी पुढें भीमाच्या पश्चात् त्यांनीं आपला भीमावरचा सूड उगवून घेतला तरी, त्या कर्दनकाळ भीमाची भीति त्या जरासंधाच्या मृत हाडांतून देखील संचरून राहिली होती. व ही गोष्ट अगदींच अशक्य आहे असें आपणास म्हणतां येणार नाहीं. उंदीर चावल्याजागीं मांजराचें हाड लावावें इत्यादि गोष्टी आपण ऐकतों याचा तरी अर्थ काय ? हाच कीं, कर्दनकाळ शत्रूची भीति प्राण्यांच्या हाडाहाडांतुन देखील शिरलेली असते. शकुनीनें फाशांचा डाव टाकावा, धर्मानें उलट टाकावा असे हात सुरू होते. पण प्रत्येक खेपेस भीमदादा एकदां गर्जून ओरडले कीं, शकुनीचे फांसे विसकटून जावेत व धर्माचे हवेत तसें पडावेत असा प्रकार होऊं लागला. तेव्हां शकुनिमामांनीं—त्या धूर्त कावळ्यानें—पाहिलें कीं, अशानें हें प्रकरण निभायचें नाहीं. हा भीम जोंवर इथें बसतो आहे तोंवर कांहीं आपल्यास जय येणार नाहीं—आपले कपटी फांसे उलट आपल्याच गळ्यास फांस लावतील. तेव्हां त्यानें 'गडबड होते, त्रास होतो ' इत्यादि सबबी सांगून धर्मराजांकडून तो पुन्हां तिथें न येईल असें करविलें. बिचाऱ्या धर्मास ह्यांतील खरें इंगित माहीत नव्हतें. म्हणून त्यानें सरळ भावानें शकुनीचें म्हणणें मान्य केलें. व शकुनीच्या मार्गांतील ह्या " आडदांड " भीमाचा कांटा सहज निघाला. त्यामुळें हर्षनिर्भर होऊन शकुनि आनंदानें नाचूं लागला. " दुर्योधना ! " शकुनी आनंदानें दुर्योधनाच्या हातावर टाळी देत म्हणाला, " उद्यां सर्व पांडवांना गुलाम करून द्रौपदी तुझ्या मांडीवर बसवीन तरच नांवाचा शकुनि ! " आणि शकुनीनें—त्या कपटपटु मामानें—खरोखरच बोलल्याप्रमाणें सर्व रंग जमवून आणला. " घटिंगण " भीमाची भयंकर भीति दूर झाल्यामुळें त्या कपटी फांशांच्या जोरावर उद्यां आपणास जय येणार ही शकुनीची खात्रीच होती.

दुसऱ्या दिवशीं पुन्हां डाव सुरू झाला. व्यसनाचें–जुगारीसारख्या व्यसनाचें– मोहन मोठें दांडगें असतें. कांहीं वेळ अनुकूळ डाव पडत गेले कीं, तोंडाला अनावर पाणी सुटतें व मग जरी प्रतिकूळ डावाच्या थपडा एकामागून एक बसूं लागल्या तरी, ' हा नाहीं पुढचा डाव जिंकीन ' अशा आशेच्या चुरशीवर मनुष्य विवेकविचारहीन बनतो व सर्वस्वी नागवला जातो. आमच्या धर्माचीही तीच गत झाली. आदल्या दिवशींच्या अनुकूल दानानें धर्मास स्वर्ग दोन बोटें उरल्यासारखें झालें. पण भीमाचा कांटा अज्ञात उचलून भावी अधःपाताचा खोलच खोल खड्डा आपणांसाठीं आज मामांनीं तयार करून ठेवला आहे व त्यांत ते आपणांस आज सपशेल गाडणार आहेत याची बिचाऱ्यास कल्पनाही नव्हती. "यांवें, यांवें धर्मराज !" धर्मराज द्यूतगृहांत–दिवाणखान्यांत आल्याबरोबर आपल्या दंतपंक्तीचें प्रदर्शन करीत धर्मास उत्थापन देत मामा म्हणाले, "काल तर तुम्ही खूप मात केलीत बोवा !" स्तुति कोणास वश करीत नाहीं ? स्तुतीच्या मधुर जाळ्यांत कोण सांपडत नाहीं ? "सीझ-रला आपली स्तुति आवडत नाहीं" ह्या वाक्यानें खरोखरच आत्मस्तुति न आवडणाऱ्या ' सीझर ' बादशहास सुद्धां स्तुतीनें आत्मसात् केलें– गुर-फटून टाकलें ! आमच्या धर्माचीही तीच स्थिति झाली. आधींच द्यूताचें व्यसन, त्यांत आदल्या दिवशींचा उल्हासकारी जय व त्यावर मामांची मिष्ठान्न स्तुति ! मग काय विचारतां ? धर्मराजाचा विवेक नार ह्या वरीलत्रयीच्या खोलच खोल डोहांत बुडाला व धर्मराज फुरफुरून जाऊन विलक्षण चुरशीस पेटले !

डावाची फेंक सुरू झाली. फांसे छक्छक् करीत खालीं अंथरलेल्या गालीच्यावर लोळण घेऊं लागले. धर्मराज डावामागून डाव हरूं लागले. पण त्यांना त्याचें भानच नाहींसें दिसत होतें. कालची धुंदी अजून त्यांच्या डोळ्यांवरून उतरली नव्हती. शेवटीं सर्व राज्य संपत्ती जाऊन पांची पांडव गुलाम झाले तरीही ती त्यांची धुंदी साफ उतरेना व उरल्या सुरल्या धुंदीच्या कैफांत–शकुनीमामांच्या सूचनेंप्रमाणें–" एवढ्या एकच प्याल्या"प्रमाणें–भयंकर चुरशीनें पेटून हाय ! हाय ! शेवटीं त्यांनीं आपल्या बायकोसही–द्रौपदीसही–पणास लाविलें ! विवेकहीनतेचा

कळस झाला ! विचारसूर्य अस्तास गेला ! " काय द्रौपदीसही आपण पणास लावतां ? " मामाही आश्चर्यचकित होऊन विचारतात. आपण सुचविलें म्हणून काय झालें ? प्रत्यक्षतः द्रौपदीलाही पणास लावण्याइतका नादान धर्म बनला असेल अशी मामांची खरोखरच कल्पना नव्हती. पेशवे सरकार सर्व राज्याचें उदक आपल्या हातावर सोडण्याइतके नादान झाले असतील अशी अलपिष्टन साहेबांचीही खरोखरच कल्पना नव्हती. पण अलपिष्टन साहेबांच्या कल्पनेबाहेर जसा तो प्रकार झाला तसाच ह्याही दिवाणखान्यांत झाला. " हो, हो; काय हरकत आहे लावायला " धर्मराजानेंही जुगारीच्याकैफींत उत्तर दिलें. व ताबडतोब द्रौपदीला पणास लावून डाव फेकला, तोंच "जितं" म्हणून शकुनी ओरडला! डाव धर्माच्या उलट पडला. शकुनीनें डाव जिंकला. दुष्टांच्या चांडाळ चौकडीत हर्षाची एकच टाळी उडाली! भीष्माचार्य, विदुर इत्यादि साधु जनांला फार वाईट वाटलें. अंधळा धृतराष्ट्र मात्र कांहींशा आनंदानें " किं जितं " " किं जितं " म्हणून चौकशी करू लागला ! द्रौपदी कौरवांची—दुर्योधनाची बटीक झाली. " कोण आहेरे तिकडे ! " दुर्योधन आनंदानें गर्जून म्हणतो, " जा, आतांच्या आतां जाऊन तिला—त्या बटकीला—घेऊन या. तिला आज नागवी उघडी करून माझ्या मांडीवर बसवून घेण्याची हौस मी आज फेडून घेणार ! " ' प्रतिकामीं ' सारथी ताबडतोब द्रौपदीकडे निघाला. तो गेल्यावर दुर्योधन स्वताशींच म्हणतो, " हांसत होतीस नाहीं कां मला मयसभेंत फार ? हांस म्हणावे आतां कशी हंसतेस तो !" खरोखर केवढा हा दुर्धर प्रसंग ! मोरोपंत म्हणतात, " हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं " तें कांहीं खोटें नाहीं ! पूर्वीच्या हास्याची भरपाई आतां रडत करणें द्रौपदीस भागच होतें.

दूतानें जाऊन द्रौपदीस वर्तमान सांगितलें व चलण्याविषयीं विनंति केली. द्रौपदीचा प्रथम तर त्यावर विश्वासच बसेना. शिवाय ती त्यावेळेस बाहेरची—एकवस्त्रा—असल्यामुळें तिला तशा स्थितींत जाणें केवळ अशक्य होतें. म्हणून तिनें त्याच्या हातीं तसा निरोप धाडला. " अशानें नाहीं हें प्रकरण निभावयाचें ! " तें ऐकून

दुर्योधन गर्जून म्हणतो, " जारे दुःशासना, तूं स्वतांच जा. आणि ती जसी असेल तश्शी तिला फरफटत घेऊन ये ! रांड कुठची; बटीक होऊनच्या होऊन वर तोरा किती ! म्हणे मी एकवस्त्रा असल्यामुळें मला दरबारांत येता येत नाहीं ! काय हा उर्मट निरोप ! तें कांही नाहीं. दुःशासना, तूं जाच, अन् कसें येता येत नाहीं तें तिला एकदां दाखवच !" म्हणतात ना 'आधीच उल्हास अन् त्यांत फाल्गुनमास !' आमचा दुःशासन आपल्या वडील बंधूची आज्ञा झाल्याबरोबर धांवतच निघाला. अन्यायी वडिल बंधूची—रावणाची—बाजू सोडून त्याच्याशीं सडेतोड असहकारिता करणारा बिभीषण कुठें, आणि एका सतीची अब्रू घेण्यास उतावीळ झालेल्या आपल्या बंधूचे चोज पुरविण्यास धांवणारा दुरात्मा दुःशासन कुठें !

दुःशासनानें जाऊन द्रौपदीस मुकाट्यानें चलण्यास सांगितलें. तिनें त्यालाही हातां पायां पडून आपली अडचण सांगितली. पण त्या दुष्टाला त्याचें काय होय ? त्याला कुठला दम निघायला ? कपटाच्या अन्यायी जयावर उन्मत्तपणें नाचणाऱ्या दुर्योधनाचाच भाऊ तो ! " तूं एकवस्त्रच काय पण अजिबात विवस्त्र असलीस तरी सुद्धां मी तुला सभेंत नेणार ! दासीला कसली आली आहे लाज ! " अशी तिच्या कोमल हृदयावर डागणी देऊन त्यानें; खस्दिशीं तिच्या वेणीस हात घातला व तो तिला फरफटीत ओढून नेऊं लागला ! हाय ! हाय ! किती तो करुण देखावा ! देवी द्रौपदी म्हणाली, " हें अनार्य दुःशासना, तुझ्या मनांत पापाची कांहींच भीति वाटत नाहीं काय ? अरे, असा मला फरफटत ओढूं नकोसरे. खांद्याखालीं गळलेला हा पदर तरी मला सांवरून घेऊन देरे. " " देवी म्हणे अनार्या नाहीं तुझिया मनांत पापदर। ओढूं नको फरफरां घेऊं दे सावरोनि हा पदर " असें पंतानींही त्या प्रसंगाचें हृदयद्रावक चित्र रेखाटलें आहे. पण भारतकालीन त्या डायरला—दुःशासनाला—त्याचें काय ? त्याचा आपला दणका सुरूच होता. " रांडे, आम्हांला हंसत होतील नाहीं कां ? चल आतां दादा तुझी चांगलीच शोभा करतो आहे ती पहा. चल. " असें म्हणत तो नीच खाटीक तिला खेचीतच होता. अशा रितीनें द्रौपदीस यातना देत व त्या करुण

रडत्यानें आजुबाजूच्या निसर्गास व प्रेक्षकांसही रडवीत तो दुष्ट तिच्यासह भर दरबारांत जाऊन उभा राहिला!

दरबारांत गेल्यावर करुणापूर्ण दृष्टीनें द्रौपदीनें चौफेर नजर फेंकली तों तिला काय दिसलें? आपले पांचही पती कौरवांचे पणांत जिंकलेले दास–गुलाम–होऊन अधोवदन असे एका बाजूस बसले आहेत. भीष्माचार्य, कृपाचार्य, द्रोणाचार्य, अशीं बडींबडीं धेंडें मोठमोठ्या आसनांवरून विराजमान झालीं आहेत. आणि दुष्ट दुरात्मा दुर्योधन कामुक नयनानें आपल्याकडे पाहात आहे! "काय? या सभेंत माझा कोणीच वाली नाहीं काय? भीष्माचार्यांसारख्या पितामहांना आज एका कुलीन स्त्रीचा होणारा उपमर्द उघड्या डोळ्यांनीं पाहवतो काय? येथें असलेल्या सर्व सभासदांत असा एकही महात्मा नाहीं काय कीं, ज्याला माझी कींव येत असेल? मी कौरवांची दासी झाले ही गोष्ट खरी व न्यायसंमत आहे काय?" द्रौपदी करुण वाणीनें म्हणाली. "द्रौपदी!" मदानें धुंद झालेला दुर्योधन बोलला, "तूं आमची दासी–बटीक–रखेली झाली आहेस, ही गोष्ट खरी आहे कीं नाहीं हें तुझ्याच पूर्वीच्या नवऱ्याला–आमच्या गुलामाला–धर्माला विचार पाहिजे तर! ये ये" आपली डावी मांडी भरसभेंत निर्लज्जपणें उघडी करून त्यावर थाप मारीत तो नरपशु पुढे म्हणतो, "कृष्णा दासी, ये, या मांडीवर बसून एकदां मला आनंद दे! असें वेड्यासारखें करूं नकोस!" हलकट पणाचा कळस झाला! द्रौपदीला ती विटंबना पाहवेना. "हाय! हाय!" ती म्हणाली, "आज माझे पांचीही पति इथें जिवंत असून त्यांच्यानें हा त्यांच्या भार्येचा छळ–अपमान–पाहवतो ना? पुरुषासारखे पुरुष असून आज त्यांनीं बांगड्या तर भरल्या नाहींत ना? काय! या सभेंत कुणालाच माझी कींव येत नाहीं?" भीमाचें रक्त सळसळून गेलें! द्रौपदीचा विलाप त्याच्यानें ऐकवेना! दुर्योधनानें मांडी उघडी टाकून द्रौपदीस पाचारण केल्याबरोबर तो खाड्दिशी उभा राहिला, "श्री बुडविली महेंद्रश्रीतुल्या मज नसे तिची परवा। पर वामलोचनेच्या ऐको न शकेचि या विलापरवां" असें म्हणून रागाच्या सपाट्यांत धर्मास त्याच्या मूर्खपणाबद्दल खूप झाडून त्याचे हात सुद्धां–ज्या दुष्ट हातानें तें स्वस्त्रीच्या अब्रूवर निखारा

ठेवणारें दान दिलें ते हात सुद्धां—जाळून टाकण्यास तो तयार झाला, व दुर्योधनास उद्देशून मोठ्यानें गर्जून प्रतिज्ञा करीत करकर दांत खाऊन म्हणाला, " दुष्टा, तुझ्या मांडीवर द्रौपदी बसायची राहोच. पण तुझा जीव घ्यायला ताहानेलेली ही माझी गदा लवकरच त्या मांडीवर बसेल हें तूं खूप समजून रहा!" पण दासांच्या—गुलामांच्या—बडबडीकडे कोण लक्ष देतो ? विकर्ण या नांवाचा दुर्योधनाचा एक भाऊ होता हें आम्हीं मागेंच सांगितलें आहे. त्याला सत्यासत्याची व न्यायान्यायाची आपल्या सर्व बंधूंपेक्षां अधिक ओळख होती-कोळशांच्या खाणीतलें तें एक माणीकच होतें म्हणायचें. तो करुण देखावा पाहून-द्रौपदीच्या केसांची दुःशासनाकडून चाललेली ती निर्दय हिसकाहिसक व विटंबना पाहून व "दासी दासी" असें त्या नरपशूंचे प्रलाप ऐकून, " अन्याय ! अन्याय ! " करीत तो उभा राहिला. पण "बस खालीं ! तुला पोराला काय कळतंय त्यांत" असें म्हणून क्षणैक दचकलेल्या इतर कावळ्यांनीं प्रसंगावधान राखून त्याला खालीं बसवला ! विकर्णाचें व कर्णाचें म्हणणें काय झालें तें आम्ही लवकरच सांगणार आहोंत, तेव्हां वाचकांनीं जरा सबूर करावें. असो; शेवटीं नाइलाज जाणून द्रौपदीनें भीष्माचार्यांकडे शेवटचें 'अपील' नेलें व " मी खरोखरच दासी झाले काय ? " असा सडेतोड व निर्वाणीचा प्रश्न टाकला. पुन्हा तोच प्रश्न आला. प्रश्न मोठा गहन होता. उत्तरही अर्थात् तितकेंच कठिण होतें. तेव्हां 'ह'कारार्थी उत्तर न देतां, " धर्म परम सूक्ष्म असें धर्मात्मा धर्म नृप नसे चुकला " असें उत्तर देऊन त्यांनीं वेळ मारून नेली. पण तेवढें उत्तर दुर्योधनासारख्या दुरात्म्याच्या पाजीपणास ऊत आणण्यास बस् होतें. आणि त्या मदांधपणाच्या धुंदींत त्यानें दुःशासनास तिचें लुगडें फेडून तिला भर दरबारांत नागडी करण्याचा हुकूम दिला ! पापकर्मास सरावलेला व फुरफुरणारा दुःशासनाचा हात द्रौपदीच्या निऱ्यांस घातला गेला ! हाय ! कोण तो हृदयद्रावक प्रसंग ! सर्व सभा शोकानें व्याकुळ झाली, सर्व पृथ्वी विलापानें हदरून गेली ! डाव्या हातानें द्रौपदीचा उजवा हात वर खेंचून कशाबशा निऱ्या सांवरण्यासाठीं पुढें झालेल्या तिच्या डाव्या हाताच्या यत्नास फोल

करीत तिचें लुगडें फेडण्यास तयार झालेल्या दुरात्म्या दुःशासना-पासून तिचें कोणी रक्षण करील काय ? भीमसेनाचें रक्त पुन्हा सळसळून गेलें ! " काय करूं रे ! " तो स्वतांशींच दांत ओंठ खात म्हणतो, " दुष्टा ! तुझ्या नरडीचा घोट घेऊन तुझें रक्त प्राशन न करीन तर नांवाचा भीमच नाहीं ! " असें म्हणून ही आपली प्रतिज्ञा त्यानें भरसभेंत सुद्धां जळणाऱ्या नेत्रांनीं अग्निवर्षाव करीत बोलून दाखविली. पण दासांच्या प्रतिज्ञांची बडबड कोण मनावर घेणार ? कौरवांचे गुलाम बनल्यामुळें वास्तविक त्यांचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य स्वतःच्या मन-गटांत पूर्ण असूनही भीमासारखा अतुल बलाचा व तेजस्वी पुरुषही तिथें निरुपयोगी झाला-उघड्या डोळयांनीं आपल्या इतर बंधूंसह त्याला आपल्या बायकोची बेअब्रू भरदरबारांत बसून पाहावी लागली ! पण इकडे द्रौपदीची काय स्थिति झाली असेल बरें ? त्या सभेंत आपला कोणीही वाली नाहीं-प्रत्यक्षतः आपलें कोणीही या संकटापासून रक्षण करूं शकत नाहीं असें पाहून निराश व भयभीत झालेल्या त्या अबलेनें-थर थर कांपणाऱ्या त्या दीन गायीनें-कोणाच्या नांवानें बरें हंबरडा फोडला असेल ? दुसऱ्या कोणाच्या असणार ? सर्व गरीबांचा-अनाथांचा वाली व भक्तांचा कैवारी गोपालकृष्ण याच्यावांचून ती कोणास हांक मारणार ? " नारायणा, गोपालकृष्णा, आज मला तुझ्यावांचून कोणीही-प्रत्यक्ष भ्रतारही-त्राता नाहीं रे ! कृष्णा, मला तूं आपली बहीण म्हणवतोस ना ? मग आज तुझ्या ह्या कृष्णा भगिनीची अब्रू भर चव्हाट्यावर उघडी केली जात असतांना तूं कुठे बरें गेलास ? तुला झोंप लागली काय ? कृष्णा, धांवरे ! धांव ! एका क्षणाचाही विलंब लावूं नकोस. तुझ्या बहिणीची अब्रू राखणें, नारायणा, आतां सर्वस्वी तुझ्या हातांत आहे !" अत्यंत करुण वाणीनें मनोमय केलेला चित्त हेलावणारा हा धांवा त्या भक्तवत्सल प्रभूच्या कानीं गेल्यावांचून कसा राहिला असेल ? श्रीकृष्णपरमात्मा-" द्वारकेंत गहिंवरला "-व ते धांवतच निघाले. व त्यांनीं द्रौपदीची-आपल्या भगिनीची-लाज राखली. त्या नरपशूच्या मनगटांत असा किती जोर असेल ? लुगड्यामागून लुगडें निघूं लागलें. लुगड्यांचा-हरतऱ्हेच्या बिनमोल बहुमोल लुगड्यांचा ढीगच ढीग पडला !

पण द्रौपदीचें नखही उघडें झालें नाहीं ! हा चमत्कार पाहून सर्व सभा तटस्थ झाली–चित्रासारखी स्तब्ध झाली. सदयहृदय भगवान्—तो 'दयालु गडी'–दयेनें तिला लुगडीं पुरवीत असतांचें व वेडावलेल्या दुःशासनाचें पंतही मोठ्या बहारीनें वर्णन करतातः–"शेले, शालू, साड्या, क्षीरोदक, लांबरुंद पाटावें। झाला अनंत वस्त्रें, कीं तीस अनाथसें न वाटावें!॥ तो शतशः पट झटझट फेडुनि भागे, सभेंत वेडावें। किति खळबळ ? जळनिधिचें कीं दुस्तरतर तरंग फेडावे ! ॥" पण इतकेंही होऊन दुर्योधनाला कसचें राहवतें ? पुन्हां एकदां शेवटचा यत्न म्हणून त्यानें दुःशासनास पुन्हां आज्ञा केली. दुःशासन पुन्हा त्या एकच लुगड्यास–झगझगीत तेजोमय लुगड्यास हात घालणार तोंच त्या सभागृहांत भयंकर वीज चमकली, व " दुष्टा ! त्या लुगड्यास हात तर घाल कीं जळून खाक झालासच ! " अशी खणखणीत आकाशवाणी झाली ! त्याबरोबर त्या भ्याडाचा हात लुलाच पडला ! दुर्योधनानेंही झाला इतका प्रकार बस् झाला याहून अधिक करूं गेल्यास भलताच प्रसंग ओढवायचा असा दूरवर विचार करून त्यानें तें वस्त्रहरणाचें प्रकरण तितकेंच आटोपतें घेतलें. व अशा रीतीनें सती द्रौपदीची लाज त्या दयाघन प्रभूनें राखली. ईश्वराचें दहा अवतार तर प्रसिद्धच आहेत. पण द्रौपदीच्या लज्जारक्षणार्थ तिच्या वस्त्रहरणप्रसंगीं, पंतांनीं म्हटल्याप्रमाणें, त्या भक्तवत्सल प्रभूनें हा अकरावा 'अंबरावतार'च घेतला होता कीं काय असें भाविक हृदयास वाटल्यावांचून रहात नाहीं. आणि तसें वाटणें किती साहजिक आहे बरें ! कारण त्या प्रभूची वत्सलताच तशी आहे ! असो.

अंधळा धृतराष्ट्रही या एकंदर छळाचा अनिष्ट परिणाम होऊं नये म्हणून मध्यें पडला, व " कृष्णा दासीस आंत घेऊन जा " म्हणणाऱ्या दुर्योधनादिकांस दाबून द्रौपदीचें सांत्वन करून म्हाताऱ्यानें तिला वर देऊं केला. म्हाताऱ्याच्या मनावर मधून मधून अशी सद्बुद्धीची लाट उसळत होती हें मागेंही अशाच एक दोन प्रसंगीं आपण पाहिलें आहे. पण ती चिरस्थायी नसे व तो तितकाच लोभी व कमकुवत मनाचा असल्यामुळें आपल्या दुष्टबुद्धी पुत्राच्या–दुर्योधनाच्या–भाषणास बळी पडून–कबूल होऊन तो आपल्या सद्बुद्धीच्या परिणामांचे कधीं कधीं तर

मातेरेंही करून टाकी. इथेंही तसेंच झालें. द्रौपदीस दोन वर देऊन त्यानें तिच्या पांची भ्रतारांस रथासह व शस्त्रास्त्रांसह दास्यांतून मुक्त करून, त्यांची–त्या पांच पांडवांची त्यांच्या व द्रौपदीच्या छलाबद्दल व विडंबनेबद्दल आपल्या मुलांच्यासाठीं क्षमासुद्धां मागितली; व "इंद्रप्रस्थास जाऊन आनंदानें राज्य करा" असेंही त्यास सांगितलें व त्यांस वाटेस लावलें. इथपर्यंत ठीक झालें. पण लगेच एवढ्या विलक्षण कपटानें व एकहि बाण न टाकतां मिळालेली गडगंज संपत्ति, अपार राज्य, हीं ह्या थेरड्यानें घालवलीं म्हणून संतापलेल्या दुर्योधनानें वरून कांहींशा शांतपणें म्हाताऱ्याच्या कानास लागून, "आपण त्यास आधींच डिंवचून ठेवलें आहे, त्याचा ते पुरा सूड घेतल्यावांचून राहणार नाहींत; तेव्हां पुन्हां एकदां द्यूताचा डाव होऊन त्यांना आपण देशोधडीस लावूं या" इत्यादि केलेला उपदेश अंधळ्यास मानवला! द्यूताच्या पणांत त्यांस पुन्हा जिंकून १२ वर्षें वनवास व १ वर्ष अज्ञातवास त्यांना करावयाला लावण्यांत त्याचा–दुर्योधनाचा–अंतस्थ हेतु असा होता कीं, त्या अवधींत १३ वर्षें राज्याचा खच्चून उपभोग घ्यावा व ते परत येईपर्यंत राज्याची पाळेंमुळें खोल नेऊन वहिवाटीच्या हक्काच्या, आपल्या बलाढ्य पक्षाच्या, व मनगटाच्या जोरावर पांडवांना उडवून द्यावें. मग ते आपलें काय करणार आहेत? हा दुर्योधनाचा अंतस्थ विचार म्हाताऱ्यास चांगलाच मानवला, व त्यानें अर्ध्या वाटेवरूनच धर्मादिकांस–सुटकेच्या आनंदानें द्रौपदीसह घरीं जाणाऱ्या–क्षणापूर्वीच्या त्या गुलामांस–परत बोलाविलें, व पुन्हा द्यूत खेळण्याची वरील बेताप्रमाणें व अटीप्रमाणें त्यानीं धर्मास विनंति केली. क्षणैक आनंदाचा उपभोग घेणारा धर्म पुन्हा द्यूताच्या सपाट्यांत सांपडला. शकुनि डाव जिंकणार ही दुर्योधनाची खात्रीच होती. एवढी मोठी थप्पड खाऊनही धर्म शुद्धीवर आला नाहीं. द्यूताचें नांव काढतांच तो पुन्हां त्यास तयार झाला. सर्वनाशी दारूनें धुळधाण उडवलेली पाहून, "आतां मीं दारू सोडली" म्हणून पुन्हा दारूच्या "एकच प्याल्यांत" बुडून जाणाऱ्या 'सुधाकरा'प्रमाणें द्यूताचें–अनार्य व्यसनाचें भयंकर स्वरूप अनुभवूनही धर्मराज पुन्हां त्याच फाशांच्या मधुर (!) जालांत सांपडले. अर्धवट अंग भाजून तडफडणारा पतंग त्याच रूपज्योतीवर उडी घेऊन विमूढपणें

प्रांणास मुकतो तशी आमच्या धर्माची स्थिति झाली. हाय ! हाय ! व्यसनाचा कोण हा दारुण प्रताप ! मद्यच काय पण कोणच्याही भयंकर व्यसनाशीं खेळूं जाणाऱ्या मानवाला एकदां त्याचा पाय त्यांत घसरला कीं तें अधःपाताच्या खोल दरींत पुरें नेऊन सोडतें ! स्वर्गाहून सुटलेल्या गंगेचा जसा उत्तरोत्तर अधिकाधिक " अधःपात " होत जातो त्याप्रमाणें ज्याचा विवेक भ्रष्ट झाला—व्यसनाच्या गुंगीनें गुंगून व झिंगून ज्याची बुद्धी काम करीनाशी झाली—त्याचा अधःपात हजार दिशांनीं होत असतो! " विवेक भ्रष्टांनां भवति विनिपातः शतमुखः " असें जें भर्तृहरींनीं म्हटलें आहे तें अक्षरशः खरें आहे ! असो. वरीलप्रमाणें वेडा धर्म तें द्यूत खेळला व डाव हरल्यामुळें १२ वर्षांचा वनवास व १ वर्ष अज्ञातवास त्यानें आपल्या सर्व बंधूंसह व भार्येसह आपणावर ओढून आणला. " परत आल्यावर ज्याचें राज्य त्याला द्यावें " असें जरी स्पष्ट कलम त्यावेळीं त्यांत घातलें होतें तरी दुर्योधनादिकांनीं तें पुढें कितपत मानलें हें आपणास पुढें कळणारच आहे. प्रस्तुत आपणांस पांडवांबरोबर वनवासास जाण्याची तयारी केली पाहिजे. तथापि, प्रिय वाचक ! त्यांच्याप्रमाणेंच श्रीकृष्ण परमात्मा आपलाही पाठिराखा असल्यामुळें भिण्याचें कांहींच कारण नाहीं. वाचकांनीं खुशाल बिनघोक आमच्या पाठोपाठ यावें अशी त्यांस नम्र विनंति करून व आणखी एका प्रश्नावर थोडा विचार करून आम्ही हा भाग संपवितों.

तो प्रश्न म्हणजे द्रौपदी " जिता कीं अजिता ? " पहिल्या द्यूताचें वेळीं हा प्रश्न तिनें सडेतोडपणें सभेपुढें टाकलेला आपणांस ठाऊकच आहे. त्यावर भीष्मपितामहांनीं खरोखरच त्यावेळेस, " एका अर्थानें—भर्त्याच्या स्थितीप्रमाणें स्त्रीची स्थिति ह्या शास्त्रवचनाप्रमाणें—ती दासी होते व उलटपक्षीं धर्म स्वतःच दास झाल्यामुळें त्याचा स्वस्त्रीरूपधनावर कांहींच हक्क राहात नाहीं तेव्हां ती अजिता असेंही म्हणता येईल " अशा तऱ्हेचें पळवाटिचें उत्तर दिलें होतें. तथापि हक्क, कायदा, झगडा इत्यादि ऐहिक कोर्टाच्या दृष्टीपेक्षां कदाचित् शास्त्रवचनाची किंमत ते जास्त समजत असल्यामुळें त्यांनीं, "धर्माची गुंतागुंत फार कठीण आहे, पण "धर्मात्मा धर्म नृप नसे चुकला" असा आपला अभिप्राय

देऊन ती जिताच आहे असेंच ध्वनित केलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. खुद्द धर्मराज ह्या प्रश्नावर मुग्ध बसले होते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. राहतां राहिले सज्जनांपैकीं विदुर व विकर्ण. पैकीं विदुरांचा अभिप्राय, "धर्म आधीं हरल्यामुळें त्याला तिला पणास लावण्याचा अधिकारच नव्हता" असा आहे. विदुरांचा अधिकारही धर्मज्ञ या नात्यानें कमी नव्हता हें विसरून चालणार नाहीं. तिसरा विकर्ण. याचें म्हणणें मनाला विशेष पटण्यासारखें आहे—निदान समंजसपणाच्या ऐहिक दृष्टीला तर खास पटेलच. तो म्हणतो कीं, " व्यसनासक्त मनुष्यानें केलेलें कृत्य जमेस धरतां येत नाहीं. व शिवाय द्रौपदी ही पांचांची भार्या असल्यामुळें एकट्या युधिष्ठिरास तिला पणास लावण्याचा अधिकार नव्हता." यावरील कर्णाची, " सर्वस्वांत स्त्रीही येत नाहीं काय ? " ही कोटी निव्वळ कायदेबाजास शोभणारी असल्यामुळें ती आपण घटकाभर बाजूस ठेवूं.१ बाकीचे वरील तिघेही गृहस्थ धर्म आणि व्यवहार यांची सांगड घालणारे होते हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. स्वतः आधीं दास बनून अधिकार गमावणें, द्रौपदीचा केवळ एक पति या नात्यानेंही सर्व अधिकार नसणें, व द्यूतासक्तींत कृत्य करणें, ह्या तिन्हीही गोष्टी "द्रौपदी जिता " ह्या विधानाच्या उलट जातात. द्रौपदीच्या लग्नाचे व उपभोगाचे वेळीं सर्वांचे अधिकार सारखे चालतात, व त्यासाठीं धर्मराज कोण अकांडतांडव करतात, हें आपण मागें पाहिलेंच आहे. पण त्याच धर्मांना तिला पणास लावतांना इतर भावांच्या सम्मतीची आड

---

१ कारण, " गाढवावरील सर्व लाकडें विकत घेतलीं म्हणजे ज्या 'पॅकसॅडल'वर तीं घालून आणलीं त्या लाकडी 'पॅकसॅडल'सुद्धां ती लाटायची नसतात " ही गोष्ट ह्या कायदेपंडितांस ठाऊक नव्हती काय ? पण ठाऊक असूनही मुद्दामच लोभीपणानें परस्त्रीचा अपहार करण्याचें पाप त्यांच्या मनांत उभे राहिलें होतें. आणि म्हणूनच वरील कायदेबाजी आहे हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. शिवाय वरीलसारख्या धर्माधर्मांच्या सूक्ष्म प्रश्नावर मत देण्यास कर्णासारख्या नीच मनुष्यास कितपत अधिकार पोंचतो हेंहि विचारी वाचकांनीं लक्षांत घेतलें पाहिजे. असो.

वणही होत नाहीं हें आश्चर्य नव्हे काय ! पण यांत आश्चर्य तरी कसचें ! कारण व्यसनासक्त मनुष्याची सारासार–किंबहुना, विचार–शक्तीही विलयास जाते हें आपणास ठाऊक नाहीं काय ! मग दारूच्या धुंदींत एखाद्या मद्यप्याकडून दस्तऐवजावर सही करून घेणें, व द्यूतानें झिंगलेल्या धर्माला, " बायकोस पणास लाव " म्हणणें सारखेंच अन्याय्य व बेकायदा ठरत नाहीं काय ? " शकुनीमामांनींच ही गोष्ट प्रथम काढली " हें विकर्ण जें म्हणतो तें याचसाठी. कारण पुष्कळ वेळां व्यसनासक्त मनुष्य स्वतः एखादी कसलीही गोष्ट करण्यास असमर्थ असतो. त्याच्या मनावरचा–किंबहुना शरीरावरचा सुद्धां–ताबा सुटलेला असतो. असो. आतां निवळ भीष्मांनीं सांगितलेल्या शास्त्रवचनाप्रमाणेंच पहावयाचें असेल–व बहुतेक तसेंच पाहिलें गेलें, व म्हणूनच हा छळ झाला–तर मात्र मग " द्रौपदी जिता " असेंच ठरतें. पण यास वर सांगितलेल्या गोष्टी कशा आड येतात हेंही विसरून चालायचें नाहीं. कारण आपण भीष्मांच्या धोरणानेंच प्रश्न करीत जाऊं या. भार्या कोणाची ? एकाची का पांचांची ? पांचांची ना ? मग पांचीही पांडव दास झाले होते म्हणून तीही धर्मवचनाप्रमाणें दासी झाली. होयना ? पण पांची पांडव दास कसे झाले ? युधिष्ठिरानें आपण स्वतः हरल्यावर मग बाकींच्या भावांस तरी पणास कसें लावलें ? असा आमचा प्रश्न आहे. त्या भावांना वेगळें अस्तित्व नव्हतें काय ? इतर जशा धर्माच्या खजिन्यांतल्या वस्तू तसेच ते भाऊ होते काय ? मग, " द्रौपदीवर आम्हां सर्वांचा सारखाच अधिकार आहे; कोणचीही ' भिक्षा ' आम्ही सारखी वांटून घेतों " इत्यादि धर्माच्या मागल्या बडबडी फोलच झाल्या म्हणायच्या ! बाकीचे चार पांडवांना वेगळें अस्तित्व नव्हतें असाच याचा अर्थ घेऊन चालल्याशिवाय या प्रश्नाचा धर्माच्या बाजूनें उलगडाच होत नाहीं. पण तसें घेऊन चालणें युक्त होईल काय ? तीं काय जुळीं भावंडें होतीं ? कीं एकानें खाल्लें कीं सर्वांचें पोट भरायला ! वडील भाऊ म्हणून त्याच्या आज्ञेंत वागणें, किंबहुना तो करील ती पूर्वदिशा मानणें हें वेगळें–तो इतरांचा कदाचित् उदात्त भ्रातृधर्म होईल–पण म्हणून त्याचा फायदा घेऊन, त्यांच्या हक्कावर गदा आणून, ' गोड लागला

म्हणून मुळासकटच ऊंस खाणाऱ्या ' मनुष्याप्रमाणें धर्मांनीं वागावें, करावें–व आधींच अनार्य असे द्यूत खेळून, दुर्योधनाबद्दल शकुनी खेळला हें द्यूतनियमविरूद्ध आचरण मान्य करून, स्वतःवर व स्वतां-बरोबर आपल्या घरादारावर आग ओढून घ्यावी हें केव्हांही योग्य होतें काय ? व्यसनच मुळीं जर 'अनार्य' तर त्यानें ' आर्या ' द्रौपदी कशी जिता झाली ? ज्याचें मूळच खोटें त्याला खरीं फळें कशीं आलीं ? तस्मात्, हा सर्व प्रकार अथपासून इतिपर्यंत अनार्य, अन्याय्य, अयोग्य व म्हणूनच चुकीचा झाला असें आमचें स्पष्ट मत आहे. अर्थात् अशा प्रकारच्या कपटपूर्ण व अन्याय्य चुकींत स्वतःस बांधून घेऊन अधर्माच्या पायावर उभारलेल्या इमारतींतही वचनाची–सत्याची–धर्माची शोधाशोध धर्मराज करतात, व " प्राणास तुम्हासहि मी त्यजिन न धर्मास पळ न सोडीन" असें उद्गार पुढें वनांत काढतात हें आश्चर्य आहे ! पण यांत आश्चर्य नसून त्यांतलें इंगित कांहीं न्यारेंच आहे! आपण वनापर्यंत येऊन पोंचलोंच आहों. चला तर ते मी तुम्हांला वनांतच व प्रत्यक्ष धर्मांच्या तोंडूनच सांगतों.

पण पुढील भागाकडे वळण्यापूर्वी अजून एका याच प्रश्नांतील मुद्याचा वाचकांच्या परवानगीनें आम्ही विचार करतों. व तो म्हणजे भीष्मांच्या या प्रश्नावरील मनोवृत्तीचा होय. त्यांनीं, "धर्म परम सूक्ष्म असे, धर्मात्मा धर्म नृप नसे चुकला " असेंच आपलें मत दिलें आहे असें आम्ही वर सांगितलेंच आहे. त्याला वादविवादात्मक बुद्धिवाद लावतांच येत नाहीं. कारण तसा लावल्यावर भीष्मांनीं दुटप्पी उत्तर दिलेलें आहे हेंही आपणास ठाऊक आहे. पण भीष्मांच्यासुद्धां मनांत, " द्रौपदी खरोखर अजिताच होती " असेंच म्हणायाचें होतें, पण, " राज-कारणी मुत्सद्याचा दूरदर्शीपणा व धोरण लक्षांत घेऊन " त्यांनीं मौन धरिलें–" ते मौन धरिते झाले " असें रा. पांगारकर म्हण-तात × त्याचा थोडासा विचार करून त्यांतून काय निष्पन्न होतें तें आपण पाहूं. द्रौपदी अजिता आहे असें म्हणतांच, " जाळील

× " मोरोपंतांचें चरित्र आणि काव्यविवेचन "–पान ३३८ पहा.

कौरवांतें अन्यायें गांजिली सती शुद्धा" व मग, "उरतात उदंड दुष्ट यासम जे" त्यांचा नाश कसा होणार ? म्हणून भीष्म गप्प बसले, असा रा. पांगारकरांच्या म्हणण्याचा भाव. बरें, आतां कौरवांच्या बरोबरच बाकीच्या 'उदंड' दुष्टांचा नाश जर व्हावा असें भीष्मांच्या मनांत होतें तर मग कृष्णशिष्टाईच्या वेळेस किंवा पांडव वनवासांतून परत आल्यावर "युद्ध करायचें, कीं न्यायानें त्यांचें राज्य त्यांस परत द्यायचें ?" असा प्रश्न निघाला तेव्हां कुलक्षय व भयंकर मनुष्यसंहार अन्यायाच्या जोरावर होणार यासाठीं कृष्णाच्या शिष्टाईस मान देऊन व स्वतंत्रही न्यायाचा विचार करून दुर्योधनानें पांडवांशीं समेट करावा, त्यांचें राज्य त्यांस परत द्यावें इत्यादि तऱ्हेचा अट्टाहास–अर्थात् सात्विक अट्टाहास–भीष्मांनीं कां केला ? समजा, त्यांचें म्हणणें जर दुर्योधनानें ऐकलें असतें तर मग, "उरतात उदंड दुष्ट यासम जे" त्यांचा संहार कसा झाला असता ? बरें, ह्या दुष्टसंहाराची काळजी काय एकट्या भीष्मांसच होती ? प्रत्यक्ष प्रभूस ती त्यांच्याहूनही अधिक होती ही गोष्ट निस्संशय असूनही मग ते, थोड्याशा कां आशेनें होईना पण, शिष्टाईसाठीं येऊन त्यांनीं त्या कामीं आपली पराकाष्ठा कां केली ? व संजयशिष्टाईच्या वेळेस द्रौपदीच्या छळाचा कळवळा येऊन, "प्रत्यक्ष भीष्मांनीं सुद्धां द्रौपदीच्या छळाकडे डोळेझांक केली !" अशा तऱ्हेचें भीष्माचार्यांच्या वर्तनास–त्यावेळच्या वर्तनास–दोष लावणारे उद्गार प्रभूंनीं कसें काढले ? कां तेही विकर्णासारखे आमच्या पांगारकरांच्या मतानें "उदारमनस्क पण अल्लड पोरच" होते ? किंबहुना, "हें द्यूतच आधीं मीं होउन दिलें नसतें" असें देव म्हणतात तशी तरी भीष्मांनीं काय कृति केली होती ? तें कांहीं नाहीं; "अर्थस्य पुरुषो दासः" म्हणून ज्यांनीं अन्यायी पक्षाकडून लढाई केली त्यांनीं वरीलसारख्या सभेंत कांहीं तरी लटपट करून व "खळलय होणारचि मग तप बुडवावें किमर्थ सांचविलें" असल्या स्वार्थी व क्षुद्र वृत्तीनें शुद्ध सतीच्या गांजणुकीकडे सुद्धा डोळेझांक करावी हेंच त्यांच्यासारख्या "अन्यायी अन्नाच्या दासांनीं" करावें ! याहून अधिक तें काय करणार आणि कसचें करणार ? कारण आमचा असा झगझगीत सवाल आहे कीं, दुष्ट, पापी, दुरात्म्या नरपशु दुर्योधनाची बाजू घेऊन

त्यांनीं पांडवांच्या सत्पक्षाच्या बाजूनें झगडणाऱ्या एका तरी योध्याचा किंवा सैनिकाचा मुडदा कां पाडावा ? अशा ज्या हजारों लढवय्यांचे मुडदे भीष्मांनीं आपल्या दहा दिवसांच्या रणकंदनांत पाडले ते सगळे, " उरतात उदंड दुष्ट यासम जें " याच वर्गांतले होते काय ? त्यांत अर्थ इतकाच कीं, त्यांच्यासारख्यांनीं कांहीं तरी घरसोडीचें वर्तन करावें व आमच्या पांगारकर, लिमये यांसारख्या मंडळींनीं सत्यासत्याची बिलकुल छाननी न करतां त्यांची तळी उचलून धरीत असावें झालें ! चला, वाचक, हा वादविवाद बस् झाला. त्यांत जों जों अधिक शिरावें तों तों वरीलसारख्याच गोष्टी अधिकाधिक बाहेर यायच्या. शिवाय पुढेंही प्रसंगोपात आम्ही भीष्म, द्रोण, कर्ण यांसारख्या व्यक्तींच्या वागणुकीचा–त्या त्या वेळच्या वागण्याचा–त्यांच्या वर्तनाचा–विचार करणारच आहोंत. भीष्मांच्या यावेळच्या मनस्थितीचा आमच्या मतें वरीलप्रमाणें उलगडा आहे, एवढेंच शेवटीं वाचकांस सांगून त्यांस पुढील भागांत धर्माच्या मनांतलें खरें इंगित काय होतें तें सांगण्यास आतां घेऊन जातों.



# भाग ३ रा.



मागील भागांत सांगितल्याप्रमाणें धर्मराज द्यूतांत हरून त्या पापाचें प्रायश्चित्त घेण्यासाठीं म्हणून आपल्या चारी भावांसह व द्रौपदी भार्येसह वनवासास–१२ वर्षांच्या वनवासास व १ वर्षाच्या अज्ञातवासासाठीं म्हणून निघाले. त्यावेळीं सृष्टीमातेलाही अपार शोक झाला, व तो उत्पातादिकांच्या रूपान तिनें प्रगट केला ! कित्येक लोकही धर्माबरोबर राज्यत्याग करून निघाले. दुष्ट दुर्योधन राजाशीं कोणच्याही प्रकारचा संबंध ठेवणें –किंबहुना त्याच्या राज्यांत राहणें–म्हणजे शुद्ध पाप आहे असें त्यांस –महाभारतकालीन गांधीभक्तांस–वाटून ते दयाळू व न्यायप्रिय धर्मराजाच्या आश्रयास जाऊन राहिले. ह्यांना अन्न कसें पुरवूं अशी धर्मास काळजी उत्पन्न झाली तेव्हां धौम्य गुरूंनीं सुचविलेला उपाय त्यांनीं केला, व सूर्यास प्रसन्न करून घेऊन त्यापासून अक्षय्य अन्न प्रसवणारी अशी ' अन्नपूर्णा ' थाली त्यानीं मिळविली, व त्यांची ती एक काळजी दूर झाली. हीच थाली पुढें त्यांना एका मोठ्या संकटांत कशी उपयोगी पडली तें आपणास लवकरच कळणार आहे. असो. पांडव द्रौपदीसह ह्या वनवासांत मुख्यत्वेंकरून ' काम्यक ' व ' द्वैत ' वनांत राहात होते. ह्या द्वैतवनांतील वनवासास गेल्यानंतर लौकरच झालेला द्रौपदी, भीम व धर्म यांचा द्वैतात्मक संवाद–झगडा मोठा वाचण्यासारखा आहे ! तो विस्तारभयास्तव येथें आम्हांस संपूर्ण देतां येत नाहीं. पण तो अथपासून इतिपर्यंत जो लक्षपूर्वक वाचील त्यास असें दिसून येणार आहे कीं, द्रौपदीची बाजू घेऊन जेव्हां भीमानेंही धर्मावर भडिमार उडवून दिला त्या वेळेस धर्मास आपली चूक–द्यूत प्रसंगीं झालेली चूक–जवळ जवळ कबूल करणें भाग पडलें. व त्या कपटाचा सूड तत्काळ न घेतां येण्याचें

मुख्य कारण म्हणजे भीष्म, द्रोण, कर्णादि प्रबल शत्रूंस तोंड देण्यास शस्त्रास्त्रादिकांची व तपाची अपुरी सामुग्री हेंच होय, असेंच त्यांनीं सांगितलें. त्याची तयारी त्यांनीं कसकशी केली व ती चालू असतां त्यांच्यावर निरनिराळे प्रसंग कसे आले, व त्यांतून ते आपल्या विविध गुणांनीं कसे पार पडले हेंच आतां आपणांस पाहावयाचें आहे. पण आम्ही जें, "त्यांतलें खरें इंगित कांहीं न्यारेंच आहे" असें म्हणालों होतों, तें वरीलप्रमाणें होतें असें आम्ही आमच्या प्रिय वाचकास कळविण्याची परवानगी घेतों. असो.

पांडव वनवासांत राहण्याला गेल्याबरोबर त्यांच्यावर पहिलें जें संकट आलें तें किर्मीर राक्षसाचें. हा भीमानें मारलेल्या हिडिंब राक्षसाचा मित्र व बकासुराचा भाऊ होता. अर्थात् त्याच्या सूडार्थ चालून आलेल्या ह्याही राक्षसास भीमालाच सद्गति द्यावी लागली हें उघड आहे. यानंतर श्रीकृष्ण, द्रुपद, त्याचा मुलगा धृष्टद्युम्न इ. मंडळी पांडवांच्या समाचारास त्या वनांत आली असतां त्यांना पाहून द्रौपदीला किती भडभडून आलें असेल, व "द्रुपदाची लेक, धृष्टद्युम्नाची बहीण, श्रीकृष्णाची बहीण व पांडवाची भार्या, इचा त्या दुष्टांनीं छळ करून तिच्या अब्रूचे असे धिंडवडे उडवावें ना?" इ. तिनें किती करुणापूर्ण विलाप केला असेल याची कल्पना तिच्यासारख्या दुःख अनुभवलेल्या स्त्रियांलाच खरी होणार आहे. असो. "द्रौपदी, तुझी अब्रू घेतली नसून ती देवकीची घेतली असें मी समजतों" श्रीकृष्ण कळवळून म्हणाले, व तिचें योग्य शब्दांत समाधान करून आलेली मंडळी परत गेली.

त्यानंतर अर्जुनास शंकरापासून पाशुपतास्त्र मिळालें ती गोष्टही मोठी गंमतीची आहे. एकदां अर्जुन एका अरण्यांत एका रानडुकराची—वराहाची—शिकार करण्यास गेला असतां अर्जुनाचा बाण व त्याच वराहावर नेम धरलेल्या त्याच अरण्यातील दुसऱ्या एका व्याधाचा—किराताचा—बाण एकदमच—एकाच वेळीं त्या डुकराच्या—वराहाच्या शरीरांत घुसले; व तो वराह तेथें मरून पडला. त्या वेळेस तो कोणाच्या बाणानें मेला—ती शिकार कोणीं केली—याचा लढा सुरू होऊन अर्जुन व किरात दोघेही हातघाईवर आले; व प्रसिद्ध 'किरातार्जुन-युद्ध' जुंपलें. दोघेही

योद्धे कुशल होते. त्यांत एक मूर्तिमान् धनुर्वेद असा सव्यसाची धनंजय पार्थ व दुसरे साक्षात् शंकर किराताच्या रूपानें अर्जुनाच्या धनुर्विद्येची परीक्षा पाहण्याठीं आलेले ! मग त्यांचा झगडा किती दिव्य, अलौकिक व चमत्कृतिजनक झाला असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. दोघेही वीर असामान्य कोटींतले. कोणीच कोणास हार जाईना. अशा रितीनें बराच वेळ अर्जुनाचा युद्धचमत्कार पाहून व त्याचा प्रत्येक प्रयत्न विफल होत होता तरी त्याची दमदार तडफ अवलोकन करून भगवान् शंकर त्यावर फार प्रसन्न–खुष झाले व त्याला त्यांनीं आपलें "पाशुपतास्त्र" देऊन शुभाशीर्वाद दिला, व ते गुप्त झाले.

यानंतर आमच्या धनुर्धर पार्थाची स्वारी निरनिराळ्या अस्त्रांचें शिक्षण घेण्यास खुद्द आपल्या बापाच्या—इंद्राच्या—इथें स्वर्गास कांहीं दिवस जाऊन राहिली होती. अस्त्रविद्येचें शिक्षण पुरें झाल्यावर इंद्रानें त्यास आपलें प्रसिद्ध 'वज्रास्त्र'ही दिलें. तेव्हां अर्जुन परत आपल्या भावांकडे जाण्यासाठीं चुळबुळ करूं लागला. कारण आपल्या भावांनीं खालीं वनवासांत दिवस काढावेत व आपण इथें चैनींत लोळत पडावें हें त्यांस बिलकूल आवडेना. पण त्याच्या आत्मसंयमनाची इंद्रास आधीं परीक्षा पाहायची होती म्हणून त्यांनीं 'उर्वशी' नांवाच्या प्रसिद्ध अप्सरेला 'स्वर्गफला'चा आस्वाद अर्जुनास चाखवण्यासाठीं धाडून दिलें. अर्जुनाच्या सौंदर्यावर फिदा झालेली तीही मारे नटून थटून गेली ! पण धन्य त्या अर्जुनाची ! "पुरूव्यासारख्या आमच्या पूर्वजांची तूं भार्या असल्यामुळें आमची तूं माता आहेस. तेव्हां मातोश्री, मला ह्या पापकर्दमांत ढकलूं नका !" असें म्हणून त्यानें तीस हात जोडले ! पण त्याचें त्या दुष्टेस कांहींच न वाटून उलट आपला मनोभंग केला म्हणून, "तूं एक वर्ष षंढ होऊन गाणें नाचणें शिकविशील" असा तिनें त्यास शाप दिला.–भावी अज्ञातवासांतील एका गोष्टीचा पाया घातला गेला. असल्या प्रकारच्या प्रेमास काय म्हणायचें ? यावर आम्ही झणझणीत टीका शिखंडीच्या वेळेस पुढें करणारच आहोंत. अर्जुनाच्या आत्मसंयमनाची ही गोष्ट याच अर्जुनास ब्रह्मचर्यभ्रष्ट ठरविणाऱ्या उलुपी व चित्रांगदांच्या गोष्टीशीं किती विसदृश आहे, व यावरून त्या

वेळीं आम्हीं केलेल्या विधानास कशी जास्तच बळकटी येते हें सूज्ञ वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. असो. त्यानंतर अर्जुनाकडूनच निवांतकवच व कालखंज यास मारवून मग इंद्रानें त्यास जाण्यास परवानगी दिली व त्याप्रमाणें अर्जुन आपल्या भावांत येऊन पुन्हां एकदां मिसळला. पण इंद्रास कुठें तिकडे चैन पडतें आहे ? बापाला आपल्या मुलाची काळजी लागली ! भावी युद्धाची इतकी तयारी करून दिली खरी, पण कर्णाची जन्मजात कवचकुंडलें जोंवर त्याच्या अंगावर आहेत तोंवर त्याचा देह म्हणजे बाणांचीं टोकें बोथट करणारा दुर्भेद्य कोटच राहणार. कारण ती सूर्यदत्त होतीं. तेव्हां तेवढी एकदां कशी तरी काढून घेतली म्हणजे झालें, असें म्हणून एके दिवशीं संधान साधून इंद्र ब्राम्हाणाच्या रूपानें त्याजवळ गेला व तेवढीं दान मागूं लागला. कर्ण हा दाता—अलौकिक दाता—म्हणून प्रसिद्ध होताच व या गोष्टीनें तर त्याच्या कीर्तीस अधिकच बळकट केलें—नव्हे अजरामर करून सोडलें. कारण ब्राह्मणवेषधारी इंद्राची ती प्रार्थना कर्णानें ताबडतोब मान्य केली व तो उदारधी कर्ण आपल्या अंगावरचीं कवचकुंडलें काढून देण्यास तत्काळ तयार झाला. मात्र त्यामुळें आंगाचे कातडें सोललें जाऊन आपण हिडीस दिसूं नये असा एक, व दुसरा ब्राह्मणवेषधारी सूर्यानें इंद्रापूर्वींच येऊन सुचविल्याप्रमाणें, ‘ एका अमोघ शक्तिदानाचा ’ असे दोन वर त्यानें त्याजजवळून मागून घेतले. प्रत्यक्ष जिवावर जरी बेतली तरी कर्ण आपल्या औदार्यव्रतापासून—ब्राह्मणवेषधारी सूर्यानें—त्याच्या बापानें—त्याविरुद्ध त्याचें मन वळविण्याचा इतका प्रयत्न केला तरी—तिळमात्र सुद्धा ढळला नाहीं. तेव्हां धन्य आहे त्याची ! अथवा थोरांचीं अंतःकरणेंच अशीं. आपल्या मुलाविषयींची सूर्याची पुत्रवत्सलताही इथें दिसून येते. “ निदान एक अमोघ शक्ति तरी त्यापासून मागून घे. ” असें सूर्याचें त्यावेळचें सांगणें याचेंच दर्शक आहे. असो. कर्णाच्या विनंतीप्रमाणें दोन्हीही वर त्यास देऊन—कुरूप हरण करणारा व ‘ एका शत्रूला तरी निश्चयानें ठार मारण्याच्या शक्ति ’चा—असें देऊन म्हणजे त्यास सुंदर करून व ‘ शक्ति ’ देऊन इंद्र कवचकुंडलें घेऊन निघून गेला.

इकडे पांडव त्याच वनांत राहण्यास कंटाल्यामुळें—अर्जुन खेरीज करून,

कारण अर्जुन त्या वेळेस इंद्रलोकांत होता-तीर्थयात्रेस निघालें. सौगंधिक कमलपुष्करिणींतून द्रौपदीस कमलें आणून देण्यासाठीं बदरिकाश्रमाहून त्या कमलसुवासाच्या अनुरोधानें भीमदादांची स्वारी चालली असतां वाटेंत एक वृद्ध वानर आपलें पुच्छ वाटेवर लंबायमान पसरून निजलेला त्यास आढळला. भीमास तो उगीच किरकोळ वानर वाटला. पण होती खरी ती हनुमंताची-रामसेवक मारुतिरायाची-'चिरंजीव' स्वारी; तेव्हां ती काय आमच्या भीमास बधणार ? त्याचें वाटेंतलें शेपूट दूर करण्याची मारे धडपड करण्याऱ्या आमच्या भीमदादांची तिथें चांगलीच फजिती झाली! दोघेही वायुपुत्रच! पण थोरला अर्थात् अधिक बलवान् होता. लवकरच त्या 'मर्कटा'चें खरें स्वरूप भीमास कळून भावाभावांची आनंदानें भेट झाली! नंतर कमलरक्षकांशींही बोलाचाली व झटापट केल्यावर कुबेरानें त्यास-व इतर पांडवांसही तेथें राहण्यास परवानगी दिली. नंतर लवकरच गंधमादन पर्वतावर अर्जुन इंद्रलोकांतून येऊन आपल्या भावांत मिसळला.

वाचक! चला, अर्जुनाच्या भेटीच्या आनंदांत पांडव गुंतले आहेत तोंवर घटकाभर ज्यानें पांडवांस वनवासास धाडिलें त्या दुरात्म्या दुर्योधनाची थोडीशी आपण हालहवाल पाहूंया. एकही बाण न टाकतां केवळ कपटाच्या जोरावर आपण पांडवांना त्यांच्या भार्येसह देशोधडीस लावलें या आनंदानें तो दुष्ट हस्तिनापुरच्या राजवाड्यांत नुसता थय्‌थय् नाचत होता. पण दुष्टांचें समाधान एवढ्यानेंच होत नसतें! ज्या सज्जनांची संपत्ति आपण हिरावून घेतली त्यांच्याच पुढें आपल्या वैभवाच्या दिमाखाचें प्रदर्शन करण्यास ते फार उतावळे झालेले असतात. आमचे दुर्योधनमहाराजही वरील हेतूनें प्रेरित होऊन 'घोषयात्रे'स मोठ्या थाटानें निघाले. पण त्या वनाच्या मालकानें-चित्ररथ गंधर्वानें-त्यास असें झोडपलें आहे कीं, ज्याचें नांव तें! शेवटीं शंभरच्या शंभर कौरव जिंकून त्यांस रथास बांधून घेऊन तो जात असतांना पाहून भीमार्जुनादिकांना फार आनंद झाला, व "आम्हांला वांचवाहो!" म्हणून ओरडणाऱ्या कौरवांची चांगली कंबक्ती निघत आहे तेव्हां त्यांच्या मदतीस आपण जाऊं नये असें त्यांचें मत पडलें. पण धर्मानें तशाहि प्रसंगीं आपल्या भावांस

जो बिनमोल उपदेश केला आहे तो जर आजपर्यंतच्या रजपूत, मराठ्यांनीं लक्षांत ठेवला असता तर स्वातंत्र्यलक्ष्मी आज परक्यांच्या घरांत गेलीच नसती ! व अजूनही तो उपदेश जर आजचे विसाव्या शतकांतील भारत-वासी शहाणे मनांत पूर्ण ठसवून घेतील तर ती स्वराज्यलक्ष्मी त्यांची त्यांस परत मिळण्यास एका क्षणाचाही विलंब लागणार नाहीं ! असें तें बिनमोल वचन म्हणजे, "बाळांनो, आपआपसांत झगडतांना जरी आपण शंभर व पांच असलों तरी परक्यांशीं झगडतांना आपण एकशे-पांच आहोंत—"वयंपंचाधिकंशतं"—हें केव्हांही तुम्ही विसरूं नका !" किती हा उदात्त उपदेश ! पण असा उपदेश व त्याप्रमाणें भीमार्जुनांनीं केलेली कृति आदर्श म्हणून मूर्तिमंत डोळ्यापुढें उभी असूनही परक्या लोकांशीं झगडतांना आपल्या स्वार्थाचें घोडें पुढें दामटून आपापसांत फूट पाडून, "तुला नाहीं, मला नाहीं, घाल कुत्र्याला" याप्रमाणें हिंदु-स्थानचें राज्य रजपुतांनीं व मराठ्यांनीं कसें गमावलें त्याची सविस्तर हकिगत 'हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाचें' अवलोकन करतांना आपणांस दिसून येईलच. तसेंच इतिहासाच्या अध्ययनानें वेडा मानव अजूनही शहाणा बनलेला नाहीं हेंही आपणास त्यावेळीं कळून येणार आहे. कारण प्रचलित राजकारणांतही अद्याप तो शहाणपणा पुरा दिसून येत नाहीं. असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. हाय ! अभागी हिंदु-स्थाना ! तुला स्वातंत्र्याच्या सोन्याचे दिवस कधींच दिसणार नाहींत काय ? असो. धर्माच्या त्या उदात्त उपदेशाप्रमाणेंच इतर पांडव वागून त्यांनीं हां हां म्हणतां चित्ररथाचा फडशा पाडला व दुर्योधनादि कौरवांस मोकळे केलें हें काय सांगावयास पाहिजे ? पण वनवास भोगा-वयास लावून एकदां तर गुलाम बनवलेल्या धर्माच्या सांगण्यावरून—म्हणजे धर्मानेंच—आपणास आपल्या स्त्रियांसमक्ष जीवदान द्यावें ही गोष्ट त्या दुष्टाच्या —दुर्योधनाच्या—मनास फारच लागून राहिली व वास्तविक धर्माचें उपकार स्मरायचे तें सोडून तो जातिवंत सर्प उलट त्या धर्मादि पांडवांसच कसा दंश करावयास धांवला—त्यांच्यावर उलटून पडला—हें कृष्णशिष्टाईच्या प्रसंगीं व पुढें भारतीय युद्धाचे वेळीं आपणांस कळणारच आहे. असो.

यानंतरचें संकट म्हणजे दुर्वास-ऋषि-महाराजांचें ! या वेळीं पांडव

काम्यक वनांत होते. दुर्योधनाच्या सेवेनें प्रसन्न झालेली दुर्वासाची स्वारी त्याच्या सांगण्यावरून पांडवांच्या अन्नदानाची भलत्याच वेळीं परीक्षा पाहण्यास निघाली व असें सांगतात कीं, आपल्या साठ हजार शिष्यांसह ऐन मध्यरात्रींचे सुमारास त्यांच्या येथें जाऊन उतरून भोजन मागूं लागली. सूर्यानें दिलेल्या त्या थालीच्या जोरावर रोज सकाळसंध्याकाळ पांडव आपले व आपल्या परिवाराचें दिवस कसेबसे घालवींत होते. पण मध्यान्ह रात्रीं आतां अन्न कुठचें आणायचें ? असा धर्म व द्रौपदीपुढें प्रश्न येऊन पडला. तथापि द्रौपदी डगमगली नाहीं ! अतिथिसत्कारांत मुरलेल्या त्या रमणीनें, "स्नान करून या, सर्व सिद्धता आहे" असें उत्तर दिलें व ती मंडळी स्नानास गेल्यावर मात्र तिनें एकाग्र मनानें कृष्णाचा धांवा केला. कृष्णही आपल्या बहिणीचे सत्वरक्षणास हजर झाले. पण भक्तिपुरस्सर दिलेलें एखादें भाजीचें पान तरी खाल्यावांचून त्यांच्याच्यानें कसची भक्तांस मदत होते ! कारण त्यांचें तें ब्रीदच नव्हे. "पत्रं पुष्पं"च्या श्लोकाप्रमाणें आधीं कांहीं तरी अनन्यभावानें दिलें पाहिजे. मग तें ओंजळभर पाणी कां होईना—चालेल. तेव्हां "घेशी तेव्हां देशी ऐसा असशी उदार!" अशा उपरोधिक भाषेंत नामदेवांनीं गौरविलेल्या त्या उदारचरित कृष्णानें द्रौपदीजवळ आधीं स्वतांस कांहीं तरी खायला मागितलें ! " कृष्णा ! तूं आप्तकाम व सर्वतृप्त ना ? दुर्वास ऋषि सत्व घ्यायला आले म्हणून तुला बोलावलें तों तूंच आधीं सत्व घेऊं लागलास ! बाबा, देऊं तरी काय तुला मी आतां ? ती थाली नुकतीच पालथी घालून ठेवली तों दुर्वास आले." " पण त्या थालीला एक भाजीचें पान राहिलेले आहे ! " तशाही स्थितींत वैकुंठनायक थट्टा करीत म्हणाले. "कुठेरे आहे ?" द्रौपदी म्हणाली. "बघ !" कृष्णांनीं उत्तर दिलें. द्रौपदी पहाते तों खरेंच पान ! " कृष्णा, तुझी भारीच अंतर्दृष्टि बाई ! " (त्याची नाहीं तर मग कुणाची असायची ?) द्रौपदी स्मित करून म्हणते, " मग काय म्हणतोस ? " तिनें पुढें विचारलें. " तेवढें पानच मला खायला दे म्हणजे झालें ! " असें म्हणून द्रौपदीनें भक्तिभावानें अर्पिलेलें तें पान कृष्णांनीं आनंदानें खाल्लें. व हां हां म्हणता त्या जगचालकानें मायेचा बाजार उठवून देऊन दुर्वासाला त्या साठ हजार शिष्यांसह उत्त-

मोत्तम पक्वानें नदीतीरींच खाऊं घातलीं. दुर्वास संतुष्ट होऊन शुभाशीर्वाद देऊन चालते झाले. मुळांतल्या गोष्टीप्रमाणें बोलायचें, तर नदीजलांतून वर आल्याबरोबरच सर्व शिष्यांची क्षुधा नाहींशी झाल्याचें त्यांनीं दुर्वासास कळविल्याबरोबर, ' हें प्रकरण कांहीं न्यारेंच दिसते. अंबरिषाप्रमाणें हा धर्मही भगवंताचा भक्त दिसतो, तेव्हां तो आतां आपलें काय करील कोण जाणें,' या भयानें ते पळून गेले ! कसेंही घेतलें तरी अर्थ एकच–द्रौपदी सत्वास उतरली !

पुढील संकट जयद्रथाचें होय. दुर्योधनाच्या दुःशीला भगिनीचा हा दुःशील पति होता. सिंधुदेशचा हा राजा होता. तृणबिंदु ऋषींच्या आश्रमांत द्रौपदीस ठेवून पांडव मृगयेस गेले आहेत व सौंदर्यखनि द्रौपदी कदंबवृक्षाच्या डहाळीस आपल्या कोमल करपल्लवानें वांकवून आश्रमाच्या द्वारांत आपल्या लावण्याची–कोणच्याही अवस्थेंत विलसणाऱ्या लावण्याची–प्रभा फांकीत उभी आहे असें पाहून शाल्वदेशांतून ससैन्य परत जाणारा जयद्रथ कामातुर झाला व तिच्याशीं लाडीगोडीच्या गोष्टी करूं लागला. परंतु " मैवं; लज्जस्व " इत्यादि द्रौपदीनें त्याची सौम्य व सभ्य निर्भर्त्सना केली. पण तेवढ्यानें ती स्वारी कुठली उमगायला ? कारण " कामातुराणां न भयं न लज्जा !" त्यानें तिला बलात्कारानें स्वरथांत घातली व त्वरेनें रथ हांकला ! पण इतक्यांत पांडव मृगया करून आले, व 'जयद्रथकृत द्रौपदीहरण' त्यांस कळल्याबरोबर भीमार्जुनादि तिकडे धांवले ! पहिल्या सपाट्यासच भीमानें ' कोटिकास्या'चें–एका मुख्य राजपुत्राचें–शीर उडवितांच जयद्रथाचें सैन्य दशदिशा पळूं लागलें. द्रौपदीस सोडून देऊन जयद्रथानेंही तोच मार्ग स्वीकारला ! पण आमचे भीम व अर्जुन–विशेषेंकरून भीम–त्यास कसले जाऊं देतात ! त्याच्या डोक्यावर पांच पाट काढून " दासोऽहं " असे उद्गार त्यास काढावयास लावले, तेव्हां कुठें त्यांचें थोडेंसे समाधान झालें. धर्मानें त्यास उदारपणें क्षमा केली व पुन्हां असें साहस न करण्यास बजाविलें. ही गोष्ट जयद्रथाचें मनास फारच लागली व त्यानें लगेच गंगाद्वारीं जाऊन घोर तपानें शंकरास प्रसन्न करून घेऊन पांडवांना मीं एकदां तरी जिंकावें, असा वर मागितला. ' अर्जुन दुसरीकडे

असतांना त्याखेरीज इतर पांडवांस तूं एक दिवस पराभूत करशील' असा शंकरानींही त्यास वर दिला. याचा उपयोग त्या दुष्टानें अभिमन्युवधाचें वेळीं कसा केला व त्यामुळें खवळलेल्या अर्जुनाच्या कोपवन्हींत त्याची त्याच्या दुसऱ्याच दिवशीं कशी आहुति पडली, इत्यादि प्रकार पुढें येणारच आहे. पण भावी युद्धाचीं सूत्रें–कारणसूत्रें–धागे एक एक कसे ओवले जात आहेत, गुंतले व गुंफले जात आहेत हें वाचकांनीं सूक्ष्मपणें पहावें, अशी त्यांस विनंति करून आतां आम्ही 'यक्षप्रश्ना'च्या प्रसिद्ध कथेकडे वळतों.

वनवासाच्या १२ वर्षांच्या अखेरीअखेरीस एका अग्निहोत्री ब्राह्मणाची मंथा व अरणी एका हरिणाच्या शिंगाला अडकून ती त्याच्याबरोबरच नाहींशी झालीं होती. तेव्हां प्रभु रामरायाप्रमाणेंच क्षत्रियोचित कर्म करण्यास सदैव तत्पर असलेले आमचे पांडववीर त्या ब्राह्मणाच्या विनंतीवरून मृगाच्या शोधार्थ धनुष्यें सज्ज करून निघाले. पण तो हरीण त्यांस कुठेंच सांपडेना. शेवटीं तृषाक्रांत होऊन ते एका वटवृक्षाखालीं विश्रांति घेण्यास बसले असतांना नकुलानें झाडावर चढून दूरवर पाहिलें, तों त्यास एक सरोवर दिसलें. तेव्हां धर्माच्या आज्ञेप्रमाणें नकुल तें पाणी बाणांच्या भात्यांतून आणण्यास गेला. तो त्या सरोवरांतील पाण्यास तोंड लावणार–पाणी पिणार–तोंच "हां, असें साहस करूं नकोस. माझ्या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें दे व मग पाणी पी" असे इशारतीचे शब्द त्यास ऐकूं आले; पण त्यास न जुमानतां नकुल तसेंच पाणी प्याला व तत्काळ तेथें मृत होऊन पडला. त्याला पाहावयास येणाऱ्या सहदेव, अर्जुन व भीम यांची क्रमानें तीच स्थिति झाली! शेवटीं धर्मराज आश्चर्य व काळजी करीत तेथें जाऊन पोंचले तों त्यांस आपले बंधू तेथें मरून पडले आहेत असें दिसून आलें. तृषार्त धर्म जलपान करणार तोंच एक बक त्यास पुन्हां तेच शब्द बोलला व धर्मराजानें त्या गोष्टीस मान्यता दिल्यावर त्यानें यक्षरूप धारण करून त्यास एकंदर १०० हून अधिक विषयांवर प्रश्न विचारले. वास्तविक मृगरूपधारणापासून वरील सर्व माया करणारा यक्ष म्हणजे साक्षात् यमधर्म होते, व त्यांस आपल्या बालकाचें–धर्माचें शुद्ध धर्मज्ञान चोखाळून पाहावयाचें होतें, व म्हणून

त्यांनीं ही माया केली होती. अर्थात् १०० च्यावर केलेल्या धार्मिक व पारमार्थिक प्रश्नांचीं धर्मानें दिलेलीं समर्पक उत्तरें ऐकून पित्याला–यमधर्माला– फार संतोष झाला, व "तुझ्या कोणच्या भावास जिवंत करूं?" म्हणून यक्षांनीं त्यास विचारलें तेव्हां, "नकुलसहदेवांपैकीं एकास उठवा" ह्या धर्माच्या उत्तरानें मनांतल्या मनांत अधिकच गुदगुल्या होऊन यक्षानें–"आपले दोघे सख्खे भाऊ टाकून त्यासच कां उठवावयास सांगितलेस" असें पुशिलें असतां समबुद्धीचे, न्यायी व दयाळू धर्मराज म्हणतात–"कारण कीं आम्हां तिघांपैकीं मी तरी जिवंत असल्यानें कुंतीमातेस तितकें दुःख होणार नाहीं. पण कुंतीमातेइतकीच मला वंद्य असणाऱ्या व भर्त्याबरोबर सहगमन करणाऱ्या–स्वर्गवासी सती माद्रीमातेचीं दोन्हीही मुलें हरपलेलीं पाहून त्या स्वर्गस्थ देवी मातेला–तिच्या आत्म्याला किती शोक होईल बरें? व मलाही तें तसें करणें शोभेल काय?" हें सयुक्तिक व उदार भाषण ऐकून यक्षस्वरूप टाकून देऊन यमधर्म साक्षात् प्रगट झाले व त्यांनीं आपल्या प्रिय बालकास–धर्मास–प्रेमानें आलिंगन दिलें, व त्याचे चारींही भाऊ उठवून व त्या ब्राम्हणाची अरणी व मंथा–त्यांनींच तीं पळवली होतीं–धर्माच्या स्वाधीन करून, व 'अज्ञातवासांत तुम्ही विराटनगरींत रहा म्हणजे तुम्हास कोणी ओळखणार नाहीं, असें सांगून यमधर्म गुप्त झाले.

'वनवास' एकदांचा संपला! व अज्ञातवासासाठीं 'विराट राजाचे आम्ही शिकारी लोक आहों' ह्या बहाण्याखालीं आमचे पांडव द्रौपदीसह वाट चालू लागले, व लौकरच विराट नगराजवळ येऊन पोंचले. आपलीं शस्त्रास्त्रें नगराबाहेरील शमी वृक्षावर ठेवून देऊन व आपले वेष पालटून ते लवकरच क्रमाक्रमानें राजा विराटाचे दरबारांत जाऊन त्यानीं आपणांस नोकरीस ठेवण्याची प्रार्थना केली. हाय! पांडवांसारख्या महाभागांवर व द्रौपदीसारख्या पतिव्रता सतीवर शेवटीं हलक्या नोकरीसारखा दुर्धर प्रसंग यावाना? याहून खडतर दैवदुर्विलसित तें कोणचें असणार? पण सर्व संतसज्जनांना अशा खडतर दैवाच्या कसोटीस लावून पहाण्याचा जणूं काय ईश्वराचा संकल्पच असतो! प्रत्यक्ष रामप्रभूला १४ वर्षें कसा वनवास भोगावा लागला व त्याच्याबरोबर त्याच्या सुकुमार भार्येस व

प्रेमळ बंधूसही त्याचा ताप कसा सहन करावा लागला हें आपण रामायणांत पाहिलेंच आहे. तसाच प्रसंग इथेंही आला. पण अशा खडतर कसोटीच्या तपश्चर्येतूनही सज्जनांचें शुद्ध सत्वसुवर्ण जास्तच उज्वल होऊन बाहेर पडतें, व हाच–त्यांचें सुवर्ण बावन कशी आहे हें सर्व जगास दाखवणें हाच–नाहींतरी इश्वराचा देखील त्यांत हेतु असतो. तथापि, ह्या सर्व खडतर हालांचीं कारणेंच शोधूं गेल्यास, पहिलें कारण द्रौपदीचें मयसभेंतील हास्य, व दुसरें कारण धर्माची भयंकर द्यूतासक्ति व जुवेबाजी ! हींच दोन मुख्यत्वेंकरून आहेत हें आपण मागें पाहिलेंच आहे. तथापि विधिघटना मोठी बलवत्तर आहे एवढें खरें. असो; धर्मराजांनीं 'कंकभट' बनून ज्योतिष व पंचांग सांगण्याचें पत्करिलें, भीमदादा ' बल्लव ' बनून मुदपाकखान्यांत शिरले. सुंदर–सुस्वरूप अर्जुनानें आपल्या मस्तकावरील केशकलापाची बायकांप्रमाणें रचना करून दुष्ट उर्वशीच्या शापाप्रमाणें, ' बृहन्नडा ' ह्या नांवाखालीं विराटाच्या उत्तरा नांवाच्या बालीकेस नृत्यगायनादिकांचे पाठ देण्याचें पत्करिलें. नकुलसहदेवांनीं ' ग्रंथिक ' व ' तंतिपाल ' बनून वैद्यकी व अश्वशालेची व्यवस्था पत्करिली, व द्रौपदी ' सैरंध्री ' ह्या नांवानें खुद्द महाराणी ' सुदेष्णा ' इची दासी होऊन राहिली. हाय हाय ! हजारों दासी जिच्या आज्ञेची वाट पहात हात जोडून उभ्या असायच्या, तिच्याच कपाळीं स्वतः दुसऱ्याची दासी होण्याचें यावें या दैवाच्या लीलेला काय नांव द्यावें हेंच आम्हांस समजत नाहीं ! ज्या भीमदादानें हजारों शत्रूंना मुष्टिमोदक, चापटपोळ्या, धमकलाडू व भीषण गदाप्रहार चारायचे, त्याच्याच कपाळीं " पापड पोळ्या बहूत लाटाया। घाटाया प्राज्यपुरण "यावें, ह्याही दुर्दैवाचा उलगडा कोण करील ? ज्या धर्मराजानें स्वतः सिंहासनावर बसून ज्योतिषांचें सामुद्रिक व भटजींचें पंचांग श्रवण करायचें त्याच धर्माला आज स्वतः त्याच ज्योतिषांचें व भटांचें काम करावें लागत आहे, ह्या विधिघटनेची उपपत्ति तरी कशी लावणार ? ज्या बहादर ' परंतपा'नें शत्रूस कर्दनकाळ होऊन त्यांचीं हजारों मस्तकें गगनांत उडवीत समरांगणावर नाचावें त्या अर्जुनाला एखाद्या बायकी शिक्षकासारखें आज उत्तरेच्या दिवाणखान्यांत रुमझुम असा पदविन्यास घागऱ्यांच्या व पैंजणांच्या तालावर

करावा लागत आहे, ही दैवाची दारुण घटना पाहून–हें ' वीरविडंबन ' पाहून–मानवास काय वाटेल बरें ? कोणास कांहींही वाटो, कोणी कांहींही नांव देवो, अथवा कोणी कसाहि याचा उलगडा करो; सुख व दुःख, वैभव व विपत्ति, मान व अपमान इत्यादि द्वंद्वांच्या झोल्यावर जगांतील यच्चावत् मानव बसला आहे एवढें खरें ! अस्तु.

याप्रमाणें दुर्दैवाच्या खडतर तपश्चर्येचे दिवस पांडव कसेबसे कंठीत होते. अज्ञातवासाचे दहा महिनें पुरे झाले असून ह्या हाल अपेष्टांचा शेवट होण्यास सारे दोनच महिने राहिले होते. पण दैवाला तेवढेंही न बघवून त्यानें एक भयंकर संकट धाडून दिलें, तें इतकें कीं,आजपर्यंतच्या सर्व संकटांस बरे म्हणायला लावण्याइतकी त्यांत द्रौपदीच्या अब्रूवर गदा येऊन कोसळली ! सुदेष्णा महाराणीसाहेबांचा मानलेला भाऊ व विराटाच्या दरबारांतील एक अप्रतीम शूर सरदार कीचक यांची स्वारी कुठें देशांतरीं दिग्विजय गाजवण्यास गेली होती ती लवकरच परत विराट नगरींत येऊन थडकली. राजशालकाचा–राजाच्या मेहुण्याचा–मानमरातब व बडेजाव केवढा असतो हे वेगळें सांगण्याचें कारण नाहीं. त्यांतून ह्या कीचकमहाराजांचें प्रकरण म्हणजे, त्यानेंच द्रौपदीस म्हटल्याप्रमाणें–खरोखरच, " नाकापेक्षां मोती जड " अशा प्रकारचें होतें. राजा विराट म्हणजे सिंहासनावर अधिष्ठित झालेले एक कमकुवत बाहुलें असून सर्व सत्ता कीचकाची होती. तेव्हां अशा मिजासखोर कीचकाची पापी दृष्टि आमच्या गरीब बिचाऱ्या सैरंध्री–दासीवर गेली. तिला आपली " नाटकशाळा " करण्याचें त्यानें ठरविलें. "घटिंगण" 'बल्लव' भीमानें वाढलेलें अन्न त्यास चालेना. सैरंध्रीच्या खुसखुशीत गोड हातानें वाढलेल्या गोड घांसाखेरीज त्यास चैन पडेना. " उद्यांच्या उद्यां सैरंध्री माझी नाटकशाळा झालीच पाहिजे !" अशा तऱ्हेचा सक्त हुकूम करून–" कौरवेश्वरमहाराजानीं दिलेल्या छत्रचामरां "चें प्रदर्शन करणारा हा वीर (!) आपला पराक्रम एका गरीब अबलेची अब्रू घेऊन गाजविण्यास चालता झाला. हाय ! सुंदर स्त्रियांनीं या जगांत काय जन्मासच येऊं नये ? परमेश्वराच्या विविध रम्य सृष्टींत त्याही बिचाऱ्या ह्या भूतलावर अवतरतात यांत त्यांचा काय दोष ? अशीं रमणीरत्नें प्राप्त होण्यास तरी भाग्य

लागते. ज्यांच्या नशिबीं अशा युवतींचा लाभ लिहिला असेल त्यांसच त्या मिळतील. "विश्ववैभवाची वैजयंति लक्ष्मीवल्लभासारख्या लौकैक वीराच्या गळ्यांत पडलेली पाहून एखाद्या भणंगानें आपल्या भिकारी भाग्यदेवतेला पाहिजे तर दोष द्यावा. यांत त्या वैजयंतिचा काय दोष ?" केवळ भाग्याच्या किंवा पूर्व पुण्याईच्या नीतीनेंच पाहायचें तर सुंदर स्त्रियांचा सर्व मक्ता कांहीं श्रीमंतांच्या व राजांच्या राजमहालासाठींच नसतो. एखाद्या झोंपडींत राहणारा भाग्यवान् प्राणीहि तसल्या भाग्याचा अधिकारी असूं शकेल. पण आम्ही हें काय सांगत बसलों आहों ? जगांत कनक आणि कांता यांच्या अभिलाषानें कितीजणांची राखरांगोळी उडाली आहे याचा किचकासारख्या मदांधांना कुठचा विचार किंवा भान असणार ? अशा दुष्टांना असला उपदेश काय कामाचा ? योग्य समय येतांच असल्या नीचांचीं हाडेंच ठेंचलीं पाहिजेत. तशीं उन्मत्त नरपशु कीचकाचींही ठेंचलीं गेलींच; पण तत्पूर्वीं त्यानें द्रौपदीची केलेली विटंबना आपणास पाहणें भाग आहे.

"कीचकाच्या घरून मद्य घेऊन ये" असें कीचकाच्या कटकटीस कंटाळून अखेर त्याच्या कमकुवत भगिनीनें—सुदेष्णेनें त्यास वरील मिषानें त्याच्याकडे द्रौपदीस—नव्हे "सैरंध्री"स—धाडण्याचें कबूल करून सुदेष्णा सैरंध्रीस म्हणाली. 'आपणांवर पापी दृष्टि ठेवणारा कीचक आपणास कधींही तशी सुरक्षित परत येऊं देणार नाहीं' इत्यादि सैरंध्रीनें परोपरीनें सुदेष्णा महाराणीस सांगून व विनवून पाहिलें. पण कीचकाची एक प्रकारची कुंटीण बनलेल्या सुदेष्णेला तिची कुठची दया यायला ? "जाच !" सुदेष्णा तिला हुकूमवजा आज्ञा फर्मावीत म्हणाली. हरहर ! दासी झाली म्हणून तिला अब्रू व मान नाहीं काय ? पण जो परवश झाला, त्याला रौरवनरकाहूनही अधिक यातना भोगाव्या लागतात— "फारचि बरी निरय गति परवशता शतगुणें करी जाच" असें पंत म्हणतात तें किती अक्षरशः खरें आहे बरें ? ज्यानें आपलें स्वातंत्र्य एकदां दुसऱ्यास विकलें, जो दुसऱ्याचा गुलाम झाला, त्याच्या संपत्तीची, अब्रूची, किंबहुना प्राणांचीहि मुलाजा परके राखीत नसतात हें सत्य आपणास पंजाबप्रकरण व धारवाडचा गोळीबार सांगत नाहीं काय ? "वीर-

नवाली''ची अब्रू घेणारा रावळपिंडीचा गोरा चांडाळ हीच गोष्ट जगाला जाहीर करीत नाहीं काय ? बटीक–दासी–झालेल्या स्त्रीवर कोणीही हात टाकावा इतक्या त्या कवडीमोलाच्या झालेल्या असतात ! बिचाऱ्या गुलाम झालेल्या द्रौपदीवर पापी दृष्टि ठेवून चांडाळ दुर्योधनानें आपली डावी मांडी उघडी टाकून त्यावर आनंदानें थाप मारावी, दुरात्म्या दुःशासनानें तिची अब्रू घेण्यासाठीं तिला भर दरबारांत 'फरफरा' ओढीत आणून तिच्या निऱ्यांस हात घालावा, नीच जयद्रथानें तिच्याशीं पापी संभाषणें करून तिला रथांतून पळवून नेण्याचा प्रयत्न करावा, व सरते शेवटीं ह्यांही यातनांतून पार पडलेल्या त्या साध्वी सतीचा हात विराट नगरींत चांडाळ कीचकानें धरावा–व त्याला हिसका देऊन अत्यंत त्वेषानें त्याचा हात हिसडून राजा विराटाच्या सभेकडे धूम ठोकणाऱ्या त्या दीन गायीचा केशपाश खेंचून विराटाच्या भरदरबारांत– राजा विराटाचे देखत–त्या नीचानें तिच्या कमरेंत लाथ मारावी ! व ती राजा विराटानें उघड्या डोळ्यांनीं पाहून स्वस्थ बसावें–तिला लत्ताप्रहार करणारा नरराक्षस २० व्या शतकांतल्या 'डायर'प्रमाणें जिवानिशी सुटावा–त्याचें राजा विराटानें कांहींच पारिपत्य करूं नये व इतरही त्याच्या दरबारांतील आचरट सभासदांनीं तिच्या सौंदर्यादिकांवरून बाष्कळ भाषणें करीत सुटावें काय ? पण द्रौपदी ही मानी स्त्री होती ! तिच्या अंगाचा भडका झाला. अत्यंत संतापानें ती मानी द्रौपदी राजा विराटासही भरदरबारांत खूप सणसणीत बोलली. पण आठ दहा वर्षांच्या पोरांचेही मुडदे पाडणाऱ्या डायरला उलट 'पेन्शन' देऊन त्याचा गौरव करणाऱ्या इंग्रजसरकारचा विराट राजा सख्खा भाऊ शोभण्यासारखा असल्यामुळें कीचक त्या प्रसंगीं साफ सुटला ! पण प्रत्यक्ष धर्मराजानें त्या वेळीं द्रौपदीस सांगितल्याप्रमाणें आम्हीही भारतवासी जनतारूप सैरंध्रीस सांगतों कीं, " सैरंध्री, ह्यावेळीं क्रोधवश होऊन सूड उगवण्याची ही वेळ नव्हे असेंच तुझ्या गंधर्व–गांधी–पतींना वाटत असावेंसें दिसतें. पण ज्यानें तुला 'लाथ मारली,' तुझी अब्रू घेतली, त्या उन्मत्त नरपशूंचें पारिपत्य तुझें पती योग्य वेळीं करतील. " पण आपले पति 'फाजील दयाळू' असल्याचा द्रौपदीनें जाता जातां टोमणेवजा केलेला आरोपही

परवशतेंतील भीषण, व अत्यंत अपमानकारक व अत्यंत चीड आणण्याऱ्या गोष्टिही सहन करणाऱ्या हिंदवासी लोकांस किंबहुना त्यांच्या पुढाऱ्यांसही–अगदींच लागूं पडणार नाहींत असें नाहीं. अस्तु.

कीचकाच्या हातून तात्पुरती जरी सैरंध्री सुटली तरी तो जिवंत आहे तोंवर आपल्या अब्रूची धडगत नाहीं अशी तिला भीति वाटूं लागली व म्हणून त्या नीचाचें पारिपत्य करण्यास एकटे भीमच समर्थ आहेत असें जाणून ती त्यांच्याकडे गेली. त्या दुष्टाचा विराटाच्या भर दरबारांतच मुडदा पाडावा म्हणून त्याचवेळीं शस्त्ररहित असलेला बल्लव भीम–जवळचें झाड उपटून घेण्यासाठीं त्याकडे पाहूं लागला होता. पण "बल्लवा, अरे तुला सर्पणाला लांकडें कां पाहिजेत ?" इत्यादि प्रसंगावधानपूर्ण धर्माच्या सूचनेनें आमच्या भीमदादास त्यावेळीं आपलें कढकढणारें रक्त मोठ्या मुष्किलीनें शांत करून मुकाट्यानें तेथून जावें लागलें होतें ! पण त्यावेळेस द्रौपदीच्या विटंबनेनें त्याच्या मनाला किती आग लागून गेली असेल याची त्याच्यासारख्या 'बलवंतां'नाच कल्पना येणार ! ज्याच्या नसानसांतून जिवंत मर्दाचें रक्त खेळत असेल त्यासच तें खरें समजेल ! पण करतो काय बिचारा ? धर्माच्या चुकमिुळें ओढवलेल्या शोचनीय विटंबनेस त्याला मान वांकविणें भागच होतें ! एखाद्या पिंजऱ्यांत कोंडलेल्या बुभुक्षित सिंहाप्रमाणें स्वतःशींच केवळ चरफडण्यापलीकडे त्यास कांहींच करतां येऊं नये अशीच विचित्र विधिघटना होती त्याला तो तरी काय करणार ? मोठा मर्द असला तरी दैवाच्या विलक्षण तडाक्यापुढें अगदीं दीन गाय बनून जातो ! धर्मांनीं केलेल्या पापाचें प्रायश्चित्त सर्व पांडवास आपल्या भार्येसह घेणें भागच होतें, व त्याप्रमाणें तें प्रस्तुत भोगीतही होते. तथापि अशा कठिण प्रसंगींही खऱ्या तडफीच्या मर्दांचे हात शिवशिवतच असतात व एरवीं सुद्धां फारसा अपमान सहन न करणारीं त्यांचीं हृदयें त्यांतही जर कोणी दुष्ट स्वस्त्रीची अब्रू घेण्याचा यत्न करील तर त्याच्या नरडीचा घोट घेण्यास धांवल्यावांचून राहात नाहींत !

इथेंही तेंच झालें. द्रौपदीची केविलवाणी प्रार्थना ऐकून भीमाचा संताप अनावार झाला व "तूं त्याला वरवर गोड बोलून–वश झाल्यासारखें दाखवून– युक्तीनें भुलवून रात्रीं नृत्यशाळेंत तो येईल असें कर; मग मी

घेतों पाहून त्याचा समाचार !" अशी तिला युक्ति सांगून व इकडे "पण भीमा–" करणाऱ्या धर्मराजांकडून कीचकवधाची मोठ्या मुष्किलीनें परवानगी काढून–वडील बंधूच्या आज्ञेवांचून, धर्माज्ञेवांचून कांहींही करावयाचें नाहीं, ह्या भीमार्जुनादि पांडवांच्या अतुल गुणांचें– –अशा संकटांतही पालन केल्या जाणाऱ्या गुणांचें किती कौतुक करावें?– भीमानें रात्रौ द्रौपदीचा दासीवेष अंगावर घातला व सैरंध्री बनून व हातांत मद्यपात्र घेऊन कीचकास कंठस्नान घालण्यास तो जणूं काय धांवतच निघाला! कारण इतका वेळ दाबून धरलेला त्याचा संताप अनिवार झाला होता! कधीं एकदां त्या दुष्टाचीं हाडें पिचून टाकीन असें त्यास झालें होतें! तेथें गेल्यावर "सैरंध्री, चल, माझ्या रंगमहालांत चल!" असें म्हणून कामुक होऊन व सैरंध्री समजून अंगावर हात टाकणाऱ्या त्या दुष्टाचा तोच हात खेंचून तडाक्याला आधीं त्याला त्यानें पालथा घातला, व त्याच्या छाताडावर बसून भीम गर्जून म्हणाला, "कीचका, धुंगुरट्या, तुझा रंगमहाल आतां गिधाडांच्यापुढें, समजलास!" यानंतर, "माझ्याशीं गदायुद्ध खेळ" म्हणणाऱ्या त्या दुष्टाचे अंगावर ओरडून भीम म्हणतो, "अरे दुष्टा, तुझ्यासारख्या क्षुद्र धुंगुरट्याला एका चुटकीसरशीं चिरडायचें, तिथें कोण गदा आणीत बसतो? बोल?"–भीम त्यास पुढें गदगदां हालवून व एकदोन ठोसे लगावून म्हणतो, "कोणच्या जिभेनें तूं सैरंध्रीचा उच्चार केलास? कोणच्या हातानें तिला विराटदरबारांत ओढीत नेलीस? ह्याच? ह्याचं? उखडू हा हात? पण जा, मला इतका वेळ नाहीं; यासाठीं तुझा एकदमच जीव घेतों!" असें म्हणून त्याचें नरडें आपल्या मनगटानें दाबून क्षणार्धांत भीमानें त्यास ठार केलें!

कीचकाचा मुडदा त्या नृत्यशाळेंत पडला आहे व सैरंध्री तिथेंच खांबास धरून उभी आहे तेव्हां हिनेंच चेटुक करून ह्याला मारविलें– हिच्याचमुळें कीचक ठार झाला, तेव्हां हिलाच कीचकाबरोबर जाळून टाकावें, असा बेत करून कीचकाचें शंभर भाऊबंद व इतर आचरट लोक यांनीं हलक्या बुद्धीच्या राजा विराटाचीही या कामीं संमति मिळविली, व ते तिला कीचकाबरोबर बांधून घेऊन स्मशानांत निघाले. कॅलेचा वेढा उठवून इंग्रजांना 'दे माय धरणी ठाय' करायला लाव-

णाऱ्या तरुण, तेजस्वी व शूर अशा फ्रेंच शेतकऱ्याच्या पोरीस 'जोन ऑफ आर्क' हीस–चेटकी म्हणून जिवंत जाळणाऱ्या खवीसांचे भाईबंद विराट नगरींतील राजापासून सरदारापर्यंत सर्व लोक होते हें आपणास ठाऊकच आहे. तेव्हां त्यांनीं तसें करावें यांत आश्चर्य तें काय ? पण त्या प्रसंगीं होणारा द्रौपदीचा विलाप व धांवा ऐकून आमचा तेजस्वी व बलवान भीम पुन्हा तिच्या मदतीस धांवला व गुप्तपणें शहराचे तट चढून जाऊन स्मशानांतील वृक्षानें त्यानें त्या सर्व लोकांस झोडपण्यास प्रारंभ केला, व पळतां भुई थोडी झालेल्या कीचकाच्या शंभरच्या शंभर भावांस त्यानें यमसदनीं पाठविलें ! याला म्हणतात बहाद्दर वीर ! असो.

वरील कीचकवधांतूनच "उत्तर गोग्रहणा"ची गोष्ट बाहेर पडलेली आहे. ती अशी कीं, त्रिगर्त देशच्या राजा सुशर्म्याचा या कीचकांनीं कित्येकदां पराभव केला होता तेव्हां आपल्या शंभर भावांसह कीचक ठार झाला हें वर्तमान ऐकून त्यास साहजिकच आनंद होऊन विराटाच्या मत्स्यदेशावर स्वारी करण्यास ही संधी चांगली आहे असें पाहून व कौरवांशीं संगनमत करून–तो देश अर्धा अर्धा वांटून घेण्याची मसलत करून–एकाच वेळीं दोघांनीं त्या देशावर–दक्षिणेकडून सुशर्म्यानें व उत्तरेकडून कौरवांनीं–हल्ले चढवण्याचें ठरविलें; व त्याप्रमाणें सुशर्म्याची टोळधाड दक्षिणबाजूनें मत्स्यदेशावर जाऊन धडकल्याबरोबर अर्जुनाखेरीज इतर पांडवांस बरोबर घेऊन विराटानें सुशर्म्यास तोंड दिलें, व केवळ त्यांच्याच बिनमोल मदतीवर राजा विराट विजयी होऊन, कृतज्ञ हृदयानें परत आला; पण ही त्याची कृतज्ञता फार वेळ टिकली नाहीं. धर्मासुद्धा चारी पांडवांचें उपकार क्षणांत पार विसरून जाऊन 'कौरवांवर मिळविलेला जय बृहन्नडेवांचून मिळणार नाहीं' इत्यादि द्यूत खेळतां खेळतां 'बडबड'णाऱ्या कंकभटाचे तोंडावर रागानें फांसा फेकून मारून त्याच्या नाकांतून रक्त काढण्यासही त्या मूर्खानें कमी केलें नाहीं ! असो. पण कौरवांवर जय कसा मिळविला हें आपण आधीं पाहूं.

वर सांगितलेंच आहे कीं, सुशर्म्याचें व कौरवांचें संगनमत झालें होतें म्हणून. त्याप्रमाणें सुशर्म्यानें तिकडे दक्षिणेस हल्ला चढविला त्याचे दुसरेच दिवशीं इकडे कौरवांनींही उत्तरेस हल्ला चढवून उत्तरेचा गौळवाडा

लुटण्यास प्रारंभ केला. यावेळीं विराटाचें भागुबाई पोर–युवराज उत्तर– काय तें राजधानींत होतें. राजा विराट गांवीं नव्हता हें आपणास ठाऊकच आहे. किंबहुना अशी संधी साधूनच कौरवांनीं हा डाव साधावा असें ठरलें होतें. पण, "मी यंव करीन आणि त्यंव करीन" असें "बालिश बहु बायकांत बडबडणारे" "बालिश" युवराज उत्तर फार पराक्रमीच खडले कीं नाहीं ? वरील "उत्तर गोग्रहणाचे" वेळीं सर्व गौळी युवराजाकडे हांका मारीत आले असतां उसनी वीरश्री आणून तो त्या गवळ्यांस म्हणतो काय,–"काय ? हा उत्तर जिवंत असतां त्या दुष्टांनीं गौळवाडा लुटला ? जा; त्यांना म्हणावें उत्तर अजून जिवंत आहे!" ते बिचारे गौळी त्यावर काय बोलणार ? पण असल्या उसन्या वीरश्रीच्या बडबडीवर कार्यें होतीं तर आज सर्व जगावर भागुबाईचेंच साम्राज्य दृष्टीस पडलें असतें. वे बिचारे गौळी आले तसे परत गेले. गौळवाडा लुटण्याचें कार्य उत्तराच्या असल्या कोरड्या उत्तरांनीं थोडेंच थांबणार होतें ? उत्तरानें खरें खरें व सपराक्रम उत्तर दिलें असतें तर कांहीं आशा होती. उत्तरदिशेच्या गौळवाड्याची लूट खरोखर उत्तरानेंच युवराज या नात्यानें थांबवावयास हवी होती. कारण उत्तरेची लूट उत्तरेच्या भावावांचून–उत्तरावांचून खरोखरी कुणी थांबवावयाची ? व पोकळ उत्तरानें काम होत नसतें हें उत्तरानें तशीं उत्तरें करतां करतांच लक्षांत घेऊन उत्तरेच्या रक्षणाकरतां त्यानें कांहीं तरी पराक्रम गाजवावयास हवा होता. पण आमच्या भ्याड उत्तराजवळ कोरड्या उत्तरावांचून दुसरें कांहींच नसल्यामुळें पुन्हां बोंब मारीत आलेल्या गौळ्यांस त्यांनीं तेंच उत्तर केलें !–" जा; उत्तर अजून जिवंत आहे म्हणून त्यांना सांगा !" कांहीं वेळानें कौरवांच्या मारगिरीखालीं धांपा टाकीत पळणाऱ्या गौळ्यांपैकीं तिसरा गौळी हांका मारीत आला त्या वेळेस उत्तरेस (उत्तर दिशेस) रणमैदानावर नाच घालायचें सोडून उत्तरेबरोबर–आपल्या भगिनीबरोबर–बालिश नाचरंगांत रमलेला आमचा उत्तर कांहींशा–बायकी–रागानें उत्तर करतो, "काय हा पुनःपुन्हां व्यत्यय ! पुन्हां तीच ओरड ? जा, त्यांना म्हणावें उत्तर अजून जिवंत आहे !" ('वीरविडंबन' नाटकांत नरसोपंतांनीं पिकविलेला हा हास्यरस फारच बहारीचा आहे, व म्हणूनच

आम्ही त्याचा येथें अनुवाद करीत आहोंत हें चतुर वाचकांनीं जाणलेंच असेल.) बिचारा गौळी उत्तराच्या ह्या उत्तराची वीरश्री पाहून गारच झाला असेल! पण खरी मौज याहूनही पुढेंच आहे. कारण "सर्व गौळवाडा लुटला!" असा ज्या वेळेस निरोप आला–अशी ओरड ज्या वेळीं कानीं आली–त्यावेळीं उत्तर आपल्या मातोश्रीस–सुदेष्णामातेस–म्हणतो काय–"पाहिलेंस आई? आतां जाऊन तरी काय करावयाचें? मी चांगला बाबांना म्हणत होतों कीं, मला आपल्याबरोबर लढाईला न्या म्हणून! (खरेंच! म्हणजे त्यांच्या पाठीमागें दडायला सांपडून सध्याचें संकट तरी अंगावर येऊन आदळलें नसतें!) तर म्हणे तूं अजून पोरच आहेस! अस्सा माझा जिथें तिथें हिरमोड–मनोभंग–करतात! (जसें कांहीं इथें तरवार गाजवायला ह्या शेंदाडशिपायांना कोणी नकोच म्हटलें होतें!). म्हणून असें होतें!" (खरेंच! नाहीं तर मग कुठून झालें असतें? कारण मग तो प्रसंगच आला नसता!) असो. याप्रमाणें उत्तराच्या शौर्याची परीक्षा झाल्यावर—बृहन्नडारूपी अर्जुनाला अर्थात् त्या उत्तराच्या उत्तरांचें किती हंसू येत असेल व तें आवरतां आवरतां त्याला किती पुरेवाट झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी–बृहन्नडा उत्तरास म्हणते, "अहो राजपुत्र! असें काय करतां? चला, तुम्ही रथांत बसून चला तर खरे! मी तुमचा रथ हाकते व तुम्ही रथांत बसून लढा.–(नाहीं तर रडा!) कौरव म्हणजे असे काय लागून गेले आहेत?" या बृहन्नडेच्या भाषणानें भित्र्या उत्तरास जरासा धीर आला व तो लबाड ऊर्फ धूर्त पण तितकाच भ्याड उत्तर म्हणतो, "हो! हो! चला. मी कुठें नाहीं म्हणतों? माझी कुठें ना आहे? हो, म्हणजे मी काय भितों आहे काय? (आणि इकडे पाय लटलट कांपतच होते!) कौरव काय कस्पटासारखे उडवून देऊं! आहे काय त्याच्यांत? पण म्हटलें उगीच आपल्या महत्त्वाच्या नृत्यगायनशिक्षणांत व्यत्यय येतो! इतकेंच. बाकी चलाच." असें बडबडून उसन्या वीरश्रीनें सजलेली आमच्या उत्तराची स्वारी कशी तरी लाजेकाजेस्तव रथांत बसून एकदांची निघाली!

पण रणांत गेल्यावर तेथील तो देखावा पाहून त्याची जी कांहीं गाळण

उडाली आहे, ती कांहीं पुसूंच नका. विराटनगरीच्या नागरिकांपैकीं व गौळवाड्यांतील जे शूर पुरुष होते ते, त्या ठिकाणीं—त्या समरभूमीवर कौरवांकडून ‘ गोधन हरावयाला ’ आलेल्या ‘ भटांशीं ’—कौरवयोध्यांशीं निकरानें लढत होते. तथापि कौरवांच्या शिस्तीच्या व रणकुशल अशा शस्त्रास्त्रविद्याविशारद सैनिकांपुढें व विशेषेंकरून भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, कृपाचार्य, दुर्योधन इत्यादि वीरांच्या पुढें त्यांचें कांहींच चालेना. कारण वरीलपैकीं बहुतेक वीर केवढ्या दांडग्या योग्यतेचे होते व म्हणून त्यास शेवटीं ‘भारतीय युद्धां’त कपटानेंच कसें मारावें लागलें, इत्यादि हकीकत पुढें येणारच आहे. असो. परंतु समरदेवतेचें तें रौद्र-रूप पाहून आमचा गरीबबापडा “उत्तरबाळ फार गडबडला ! ”—त्याची भयानें गाळण उडाली. तरवारीच्या प्रत्येक खणखणाटाबरोबर, बाणांच्या सूं सूं अशा प्रत्येक ध्वनीबरोबर, त्याचें धाबें दणाणून जाई व तरवारींच्या खणखणाटांत बिजलीप्रमाणें जी वीज तळपे त्यानीं तर त्याचे नेत्र दिपून जाऊन तो डोळ्यांवर हातच ठेवी ! “अरे बापरे ! बृहन्नडे, केवढें ग हें रणकंदन ! ” उत्तर बडबडत होता,“ काय वेडे लोक आहेत तरी : चांगले दिवाणखान्यांत बसून—केसांचा तिरपा भांग काढून—नटत मुरडत—गायचें नाचायचें सोडून आपले लढताहेत ! त्यांना त्यांत काय मौज वाटते व भीति तरी कशी वाटत नाहीं कोण जाणे ? ” थर थर कांपत तो पुढें म्हणतो, “ म्हणजे मी कांहीं भितों असें नाहीं ! ” बिचाऱ्या अर्जुनाची हंसता हंसता मुरकुंडीच वळायची वेळ आली ! तो देखावा पाहून अर्जुनाचे हात शिवशिवूं लागले ! पण इतक्यांत प्रत्यक्ष प्रसंगाचेंच कारण पडलें. कारण कौरवांनीं उत्तरास पाहिल्यावर—कदाचित् या बाळाची कीर्ति आधींच त्यांस ठाऊक असल्यामुळें—त्यांतले कित्येक त्या बिचाऱ्यावरच घसरले ! वेडे बिचारे ! आमच्या गरीब उत्तरावांचून त्यांना काय दुसरे कोणी वीरच नव्हते लढायला ? पण ‘ देवो दुर्बल घातकः ’ म्हणतात तें असें—नव्हे, चुकलों ! त्या वेड्या योद्ध्यांनीं उत्तरासारख्या प्रतिधनुर्वेदच—(कोरडा ठणठणीत !)—अशा योद्ध्यावर स्वारी करणें म्हणजे हा त्याचा शुद्ध अपमान होय ! निदान आपल्या बरोबरीचा पाहून तरी युद्ध करायचें ? असो. पण आली खरी त्यांची टोळधाड

त्याच्यावर ! त्याला काय करणार ? पण त्यासरशी–( बिलकुल न डगमगतां !) "अरे बापरे !" म्हणून आमच्या उत्तरानें उत्तरेच्या उलट दिशेस जो " यःपलायति " करण्यास आरंभ केला आहे म्हणता तें कांहीं विचारूं नका. त्यास पळतां भुई थोडी झाली ! पण बृहन्नडा त्यास तशी थोडीच सोडणार ? तिनें तावडतोब त्यानेंच टाकून दिलेलें त्याचेंच धनुष्य त्याच्या गळ्यांत अडकवून त्यास अलीकडे खेंचला. पण त्यावेळेसही उत्तरानें मौजेचें उत्तर देण्यास कमी केलें नाहीं. तो बृहन्नडेस म्हणतो, " हं ! बृहन्नडे ! खबरदार माझ्या आड येशील तर ! संगीतशाळेमध्यें तूं कदाचित् माझी शिक्षकीण असशील; पण येथें रणविद्येचे पाठ तुलाच माझ्याकडून घेतले पाहिजेत ! (यंवरे बहाद्दर ! ) मी शिस्तीची पिछेहाट करीत असतां माझ्या आड येतेस ? मग तुला रणविद्या कांहींच ठाऊक नाहीं असें दिसतें ? याला व्यवस्थित माघार किंवा शिस्तीची पिछेहाट म्हणतात, समजलीस ? कसलेल्या सेनापतीशिवाय त्याचें मर्म इतरांस कळायचें नाहीं ! (खरेंच ! उत्तरासारख्या सेनापतीशिवाय तें दुसऱ्या कोणास कळणार ? ) हं, चल. सोड माझी वाट ! " परंतु दूधभात खाणाऱ्या त्या पोराला अर्जुन तसा थोडाच सोडणार ? त्यानें त्यास तसाच खेंचून रथांत बसवला व मग मात्र आमच्या उत्तराची उसनी गुर्मी जिरून, "पायां पडतों बृहन्नडे सोड " याप्रमाणें गयावया सुरूं झाली. कारण बंदुकीच्या प्रत्येक बाराबरोबर थरथर कांपणाऱ्या व दिव्याच्या घाटाकडे धूम ठोकणाऱ्या भ्याड पेशव्याहून–शेवटच्या बाजीरावाहूनही तो जास्त भ्याड व भागुबाई होता. त्याच्या आसपास चमकणाऱ्या तरवारी पाहून तो गर्भगळीतच झाला, व म्हणूनच त्यानें अर्जुनाची–त्याच्या बृहन्नडेची–अशी पायधरणी चालवली होती. तथापि बापू गोखल्यासारखाच शूर असणाऱ्या अर्जुनानें त्यास धीर दिला, व आपण जवळ असतां त्याच्या केसालाही धक्का लावण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं, असें त्यास आश्वासन दिलें. " तूं माझें सारथ्य कर, मी ह्या कौरवांचा समाचार घेतें " असें सांगून व त्यास रथांत घालून अर्जुनानें रथ स्मशानाकडे नेऊन तेथून आपलीं शमीवृक्षावरील शस्त्रें घेतलीं, शुभ्र पुरुषवेश धारण केला,–कारण याच वेळीं अज्ञातवासाचा शेवट झाला होता–व आपल्या गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें

व देवदत्तशंखाच्या गंभीर नादानें दशदिशा दणाणून सोडल्यावर मग मात्र त्याच्या खऱ्या पराक्रमास सुरुवात झाली! 'रणचंडीच्या नाचाचें पहिलें नमन' करण्याचा सुयोग प्राप्त झाला म्हणून त्यास फार आनंद झाला! इतक्या दिवसांच्या तपश्चर्येंत प्राप्त करून घेतलेल्या अतुल बलाची व शस्त्रास्त्रविद्येची थोडीशी चुणूक दाखवून त्यानें कौरवांच्या वर सांगितलेल्या मोठमोठ्या भटांची—भीष्माचार्यादि धेंडांचीही—त्यानें नुसती दाणादाण उडवून दिली! विराटाच्या गाई पळवून नेणाऱ्या दुर्योधनावर तो 'घसरला' असतां इतर कौरव त्यास आड आले व त्या गडबडींत गाई तुफान होऊन पळून गेल्या! अर्जुन हा कोणाही एकेकट्या वीरास आटपत नाहीं असें पाहून सर्वांनीं त्यावर एकदम गर्दी केली! पण अर्जुनानें 'संमोहनास्त्र' सोडून सर्वांना बेशुद्ध केलें व सर्वांचीं उत्तरीय वस्त्रें हिरावून घेऊन विजयी झालेला हा वीर—हा मूर्तिमान 'विजय'—आनंदानें विराट नगरीस परत आला!

यावेळीं पांडवांचा अज्ञातवास पुरा झाला होता हें आम्हीं वर सांगितलेंच आहे. अर्जुनाचा खरा पराक्रम त्यास कळल्यावर राजा विराटानें "आपल्या उत्तरेला पदरांत घेण्याची" त्यास विनंति केली. पण गुरुशिष्यांच्या नात्याच्या सबबीवर त्यानें तें नाकारून आपल्या अभिमन्यूसाठीं, सून म्हणून, त्यानें तिचा स्वीकार केला. पुढें कुरुदेशाच्या हद्दीवरील 'उपप्लव्य' नगरांत पांडव येऊन राहिल्यावर वनवासाच्या व अज्ञातवासाच्या दुःखाचा शेवट उत्तरा व अभिमन्यू यांच्या विवाहाच्या आनंदोत्सवांत त्यांनीं करून घेतला! गरीब बिचारा अभिमन्यू इतर वेड्या मानवांप्रमाणेंच आपल्या पूर्वकाळाच्या स्मृतीस विस्मृतीच्या डोहांत बुडवून व भावी चित्रपटाच्या अज्ञात अवस्थेला जवळ करून प्रस्तुत आनंदांत आपल्या सर्व आप्तेष्ट मित्रांसह दंग झाला होता! जगल्लीलेच्या चमत्काराच्या ओघास परमात्मा तरी निष्कारण अडथळा कशाला करतील? अरेरे! भावी चित्रपटाचा देखावा मानवास आधींच दिसला तर मानवाची काय स्थिति होईल बरें? "मायाविनी आशेच्या ऐंद्रजालिक दीपाचा झगझगाट विझून जाईल व भावी आयुष्याचा पडदा वर उचलल्यानें आधींच दुःखमय असलेला मानवाचा जीवनभार त्यास केवळ

असह्य होऊन ह्या जगांत त्यास कांहींच गोड वाटणार नाहीं–रहावेंसें देखील वाटणार नाहीं " हेंच याचें उत्तर नाहीं काय ? याच्याचसाठीं–सर्व जगाचा पसारा यथास्थित चालावा म्हणून चतुर परमात्म्यानें भावी गोष्टीवर अज्ञाततेचा पडदा टाकलेला असतो ! खोट्या सुखाच्या आनंदांत–भावी आशेच्या गुंगींत–सर्व जगानें व्यवहार करावा अशीच त्याची इच्छा दिसते, व मानवही पण अवशपणें तसाच वागत असतो ! षोडषवर्षांचा कुमार,बाळ अभिमन्यु,याच वर्तमान कालाच्या सुखांत रंगला होता. पण लवकरच होणारा त्याचा ऐन तारुण्यांतला भावी अंत डोळ्यापुढें उभा राहिला, उत्तरेच्या तदनंतरच्या विलापाचें चित्र डोळ्यापुढें आलें, कीं, भटजींचीं मंगलाष्टकें ऐकूं येईनाशी होतात, लग्नमंडप दृष्टीपुढून नाहींसा होतो–वितळून जातो, सर्वत्र घोर अंधार पसरतो व वरीलसारख्या विचारांच्या तारका त्यावेळीं त्या भीषण अंधारांत बुद्धीच्या आकाशांत लुकलुकूं लागतात ! पण चला, इतरांबरोबर आपणही घटकाभर भावी गोष्टींच्या स्मृतीवर विस्मृतीचा पडदा सोडून देऊन उत्तरेनें लाजत लाजत अभिमन्यूच्या गळ्यांत कशी माळ घातली, इतर आप्तेष्टांनीं त्यावर मंगल पुष्पें व मंगलाक्षता टाकून त्यांचें कसें मंगल चिंतिलें व इतरही किती अमूप मौजा झाल्या तें सर्व आपण पाहूंया. अरे, पण विवाहसमारंभ आटपल्यासारखें दिसतें. वरील विचारांत गुंतल्यामुळें आपणास येण्यास उशीर झालासा दिसतो. पण त्याला आतां कांहीं इलाज नाहीं ! असो.



# भाग ४ था.



या नंतर यापुढें काय करायचें, याची दोन्हीकडे वाटाघाट सुरू झाली. वनवासाची व अज्ञातवासाची तपस्या आचरून, द्यूताच्या पापाची निष्कृति करून, पांडव मोकळे झाले होते—सोज्वलपणें बाहेर पडून दुर्योधनापुढें उभे ठाकले होते. सर्व शस्त्रास्त्रांनीं व तपश्चर्येनें सुसज्जित व म्हणूनच आपले राज्य परत घेण्यास पूर्ण समर्थ असे पांडव एका बाजूस, तर पांडवांची संपत्ति व इंद्रप्रस्थाचें राज्य घशाखालीं घालून बसलेला व तेरा वर्षांच्या त्याच्या उपभोगानें उन्मत्त झालेला दुर्योधन दुसऱ्या बाजूस, असा हा लढा होता. वास्तविक कौरवांनीं आतांपर्यंत केलेल्या कपटांचें, अन्यायांचें, व पशुवृत्तीचें त्यांस भरपूर प्रायश्चित्त देण्यास विशेषेंकरून भीमार्जुन अगदीं उतावीळ झाले होते. दुर्योधनाच्या मांडीवर बसण्यास व दुःशासनाचा कंठनाळ चिरण्यास भीमाची गदा व तरवार उत्सुक झाली होती. तसेंच जयद्रथादि दुष्टांचें पारिपत्य करून त्यांचीं मस्तकें गगनोदरांत कधीं भिरकावून देईन असें अर्जुनासही झालें होतें. खुद्द द्रौपदीच्या भरसभेंतील विटंबनेला तर पारच नव्हता! तेव्हां अशी विटंबना करणाऱ्या दुष्टाला चांगलें शासन व्हावें असें तिलाही वाटत होतें. किंबहुना, " दुःशासनभुजं श्यामं संछिन्नं पांसुगुंठितं। यद्यहंनतु पश्यामि का शांतिर्हृदयस्य मे ॥ " हे द्रौपदीचे कृष्णशिष्टाईच्या वेळचे उद्गार तिचें हृदयसर्वस्व दाखवितात! तिच्या हृदयांतील आजपर्यंच्या अपमानाचा, विटंबनेचा, व छलाचा सूड—राग यांत तिनें ओतला आहे. हे शब्द उच्चारतांना तिचें सर्व शरीर रागानें कांपत होतें व नेत्रांतून अश्रुधारा चालल्या होत्या! " ज्या दुःशासनाच्या हातानें भरसभेंत माझ्या निऱ्या फेडून मला नागवी उघडी करण्याचा प्रयत्न केला तो दुष्ट हात छिन्न भिन्न

होऊन धुळींत लोळत पडलेला पाहीपर्यंत–हाय !–माझ्या हृदयाला कोठून शांति मिळणार ? माझ्या अंगाचा नुसता भडका उडाला आहे;– माझ्या अंगाला आग लागली आहे ! " हे द्रौपदीचे उद्गार तिचें हृदय-सर्वस्व उघडें करून दाखवीत आहेत. आमच्या भीमदादांची तीच स्थिति. त्यांनीं तर प्रतिज्ञाच केली होती कीं, ज्या दुष्ट दुःशासनानें द्रौपदीची वेणी धरून तिला भरसभेंत फरफरा ओढीत आणलें व तिची विटंबना केली, त्याचें वक्षस्थल काडकन् फोडून, त्याच्या रक्तांत हात भिजवून, त्यानें द्रौपदीची वेणी घालीन–"वेणीसंहार" करीन–तरच नांवाचा भीम ! अर्थात् ही सर्व मंडळी, कौरवादि दुष्टांच्या शासनाची वाटच पहात होती. तथापि लढाईचा प्रसंग केव्हांही वाईटच, या दृष्टीनें जर तो टळेल व सामोपचारानें काम वळेल तर तें त्यांना नको होतें असें नाहीं. जरी दुर्योधनादिकांचे अपराध अत्यंत अक्षम्य असून त्यांस घोर प्रायश्चित्तच मिळावयास पाहिजे होतें, व तशी त्यांची इच्छाही होती–तरी केवळ अंध धृतराष्ट्र आणि माता गांधारी या वृद्धांना दुःख होऊं नये यासाठीच केवळ सामानें काम झाल्यास भीमार्जुनांनीं त्या दुष्टांची गय केली असती. थोडक्यांत म्हणजे, राजनीतीच्या शास्त्रास अनुसरून, शक्य असल्यास सामोपचारानें हें प्रकरण मिटवावें, अशी सर्वांचीच इच्छा होती. पण त्याजबरोबर मागील दुःखवन्ही भीमार्जुनादिकांच्या व विशेषेंकरून द्रौपदीच्या हृदयांत अत्यंत तीव्रपणें जळत होता, व हें आपण–"हाय ! तोंवर कुठली ह्या हृदयाला शांति ?" ह्या तिच्या वरील हृदयसर्वस्वदर्शक उद्गारांवरून पाहिलेंच आहे, एवढेंच आम्हांस सांगावयाचें आहे. आणि तें भीम व द्रौपदीसारख्या तडफीच्या हृदयांचें बाबतींत किती साहजीक आहे बरें ? तरी सुद्धां साम करायचाच म्हटला तरी देखील ती गोष्ट दुर्योधनाकडून मान्य होईल याची पांडवांना व तत्पक्षीयांना–जरूर तर फारशी नव्हतीच–पण आशाही विशेषशी नव्हती. कारण सामाच्या नांवाखालीं गुळचट तत्वज्ञानाच्या गोड गोड गप्पा मारण्यास व उपदेश करण्यास–(चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात त्या ह्या अशा !)–धृतराष्ट्राकडून आलेल्या संजयास श्रीकृष्णांनीं चांगलाच फायलावर घेतल्यावर धर्मराजांनीं जो अखेरचा म्हणून उदात्त निरोप

घाडला त्याची पुढें काय वासलात लागली हें लवकरच दिसून येईल. वास्तविक तो निरोप वाचून कोणाचेंही अंतःकरण धर्माच्या थोरवीच्या विचारानें भरून आल्यावांचून राहाणार नाहीं ! कारण, "कुलाचा संहार होऊं नये यासाठीं अर्धें राज्य, एखादा प्रांत, फार तर काय, पण " इंद्रप्रस्थं वृकप्रस्थं मांकंदीं वारणावतम् । देहि मे चतुरो ग्रामान् पंचमं कंचिदेव तु ॥" म्हणजे आम्ही तुझ्या सर्व अपराधांची क्षमा करून मागील सर्व हाल, अपमान, व संकटें–तीं अक्षम्य असली तरी–आम्ही विसरण्यास तयार आहों " ह्या धर्माच्या निर्वाणीच्या खलित्यांत त्याचें अत्यंत उदार हृदय ओतलें आहे असें कोण म्हणणार नाहीं ? स्वतःच्या भार्येची इतकी विडंबना झाली असतां व सर्वांचाच इतका छल झाला असतां, आणि स्वतांच्या मालकीचें व हक्काचें अर्धें राज्य असतां, केवळ कुरुकुलसंहार टाळण्यासाठीं जो "धर्मात्मा धर्म" केवळ पांच गांवांवरही राजी राहण्यास तयार होतो, त्याच्या अलौकिक उदात्तपणाची कोण तारीफ करणार नाहीं ? धन्य, धर्मराज, धन्य ! तुम्ही खरेच धर्मात्मे व खरे धर्मराज आहांत यांत तिळमात्रही शंका नाहीं. पण या साधुवृत्तीच्या पुरुषाच्या निरोपाचा दुर्योधनाच्या सभेंत कसा आदरसत्कार झाला ? " उत्तर–गोग्रहणाच्या वेळेस कुठें तुझें शौर्य शेण खायला गेलें होतें ? " असा भीष्मांनीं झणझणीत टोमणा मारला तरी, "साम करूं नये, पांडवाना राज्य–नव्हे, पांच गांवेंही देऊं नयेत, मी एकटा तुला जय मिळवून देईन ! " इत्यादि कर्णाची दुर्योधनास –" आधींच मर्कट " अशा उन्मत्त दुर्योधनास–मद्याप्रमाणें उत्तेजनपर टुरटुर चाललीच होती. व त्याच्याच जोरावर आधीच उन्मत्त असलेला तो दुरात्मा नरपशु आतां सर्वांनाच अनावर झाला–सामाच्या गोष्टीची बात तो कोणाच्याच तोंडून ऐकेना ! द्रोण, भीष्म, कृप, यांचे किंबहुना, पांडवांच्या लढाईच्या भयंकर तयारीचें वर्णन संजयाच्या तोंडून ऐकून धाबें दणाणलेल्या लोभिष्ट पण कांहींशा धर्मज्ञ व सारासार विचारी धृतराष्ट्रानें कळवळून काढलेले, " दुर्योधना, भरतवर्षाच्या अर्ध्या राज्यानेंही तुझें समाधान होत नाहीं काय ?" हे उद्गारही दुर्योधनानें उडवून लावले. द्यूतप्रसंगीं दिलेलें वचन म्हणजे " निव्वळ कागदाचें चिटोरे " मानण्यापर्यंत त्याची हद्द जाऊन पोंचली ! व सामा-

साठीं—कुरुकुलाचा संहार वाचविण्यासाठीं—कांहींशा आशेनें आलेल्या व त्यास सौम्यपणानें उपदेश करणाऱ्या प्रत्यक्ष भगवान् गोपालकृष्णांवर सुद्धां तो दुष्ट सर्प कसा उलटून पडला हें आपण लवकरच पाहणार आहोंत. असो.

याप्रमाणें कौरवांच्या छावणींतल्या सभेची स्थिति होती. इकडे पांडवांनींही पुष्कळ वाटाघाट करून धर्माच्या तोंडून दुर्योधनास कसा उदात्त निरोप गेला होता हें आपण पाहिलेंच आहे. पण द्रुपद राजाच्या दूरदृष्टि उपदेशाप्रमाणें तो खलप्रकृति दुर्योधन सामानें नाहींच वळला तर त्यास अखेर दंड करण्याची आपली तयारी पाहिजे म्हणून मध्यंतरी कौरवांप्रमाणेंच पांडवांचेही दूत देशोदेशींच्या राजांकडे साहाय्य मागण्यासाठीं गेले होते व त्याप्रमाणें हळुहळु राजे लोक दोन्ही बाजूंस जमूंही लागले होते. श्रीकृष्णाची मदत मागण्यासाठीं दुर्योधन व अर्जुन गेले असतां दुर्योधन उद्धटपणें—व चंपूकारांच्या कोटीप्रमाणें बोलायचें तर "अधिक कुटिल कोण? श्रीकृष्णाचें कुरल केश कां मी?" हें पाहण्यासाठींच कीं काय—निद्रिस्त श्रीकृष्णांच्या उशागती बसला, व नम्र अर्जुन त्यांच्या पायगतीं बसला. जागृत झालेल्या देवांनीं अर्जुनास आधीं पाहिलें. पण दुर्योधन आधीं आला होता, म्हणून दोघांसही साह्य करण्याचें ठरवून आपले दहा कोट खडे यादव वीर एका बाजूस व निशस्त्र व युद्ध न करणारा—' नधरी शस्त्र करीं मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार ' म्हणणारा—एकटा श्रीकृष्ण एका बाजूस, ह्यांतून निवड करावयास सांगितली असतां अर्जुनानें श्रीकृष्णासच ' वरिलें ' व खुळ्या दुर्योधनाला त्या यादव वीरांचाच आनंद झाला. ब्रह्मांडमोलाच्या श्रीकृष्णास टाकून त्याच्या दहा कोट यादव वीरांसच ' वरणाऱ्या '—घेणाऱ्या—खुळ्या दुर्योधनाचा हा खुळेपणा पाहून पंत ह्मणतात, " वरहि वरायासि पाहिजे समज !" पण तो आमच्या दुर्योधनाजवळ कुठें होता ? अर्जुनास श्रीकृष्णांनीं 'माझे दहा कोट यादव वीर टाकून तूं मला एकट्यालाच कसें वरिलेंस—पसंत केलेंस ' असें विचारल्यावरून अर्जुनानें जें त्यावेळीं एकाच वाक्यांत उत्तर दिलें आहे तें सर्वांनीं आपल्या हृदयावर कोरून ठेवावें. तो म्हणाला "देवा, जिकडे तुम्ही तिकडे जय !" हें तत्व अबाधित असतां मी वरच्या झकझकीस कसा बरें भुलूं ? "

असो. याप्रमाणें भावी युद्धाची तयारी दोहोबाजूंनीं झाली होती. "सुईच्या अग्रावर मावेल–राहील–इतकी मातीसुद्धां मी पांडवांस देणार नाहीं" म्हणून दुर्योधन उन्मत्त पिशाचासारखा आपल्या दरबारांत थै थै नाचत होता ! तेव्हां सामाची आशा बहुतेक संपल्यासारखीच होती. पण एकदा शेवटचा–अखेरचा–यत्न करून पहावा–कुरुकुलाचा निर्दय संहार टळल्यास टाळण्याचा यत्न करावा, म्हणून खुद्द भगवान् गोपालकृष्णांची स्वारी शिष्टाईसाठीं हस्तिनापुरांस निघाली. त्यावेळेस द्रौपदीला पुन्हां भडभडून आलें. मागील सर्व छळ तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला व "अयं ते पुंडरीकाक्ष दुःशासनकरोध्दृतः । स्मर्तव्यः सर्वकार्येषु परेषां संधिमिच्छतः ॥" असें म्हणून तिनें आपला–"दुःशासन–पाणि–कृष्ट–केश–" पाश डोळ्यांत अश्रु आणून श्रीकृष्णास दाखविला, व "त्याचा कधींही विसर पडूं देऊं नकोस बरें !" असें त्यास बजावल्यावांचून त्या पोळलेल्या गाईस राहवेना ! "कृष्णा, ह्या तुझ्या बहिणीच्या अब्रूचे धिंडवडे झालेले विसरूं नकोस बरें !" द्रौपदी पुढें म्हणाली. "द्रौपदी, मी ते कधींहि विसरणार नाहीं. तूं कांहीं एक काळजी करूं नकोस !" श्रीकृष्णांनीं तिचें समाधान केलें; व नंतर सर्वांचा प्रेमानें निरोप घेऊन श्रीकृष्ण निघाले. होतां होईल तों हें युद्ध टळावें अशी धर्माची खरोखरच अंतःकरणपूर्वक इच्छा होती, व ती त्यांनीं कृष्णाजवळ बोलूनही दाखवली होती. पण धर्मासह मुख्य पांडवांची व द्रौपदीची यावेळची मनःस्थिति आपणास आतां पूर्ण ठाऊक झाली असल्यामुळें त्यावर पुन्हां विशेष विस्तार करण्याचें कारण नाहीं.

श्रीकृष्णांनीं पहिला मुक्काम "वृकस्थळा"स केला व नंतर ते पुढें निघाले. "वृष्णिप वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि वृद्ध ते सर्व। जन सामोरे गेले अंधुक झाला सुयोधना गर्व ॥" असें या प्रसंगींचें पंत वर्णन करतात तें अगदीं यथायोग्य आहे. आमच्या धृतराष्ट्राची–अंधळ्या पण लोभी म्हाताऱ्याची–श्रीकृष्णाला वरच्या झकपकीवर भुलविण्याची–"दासी शत दासहि शत आठ महानाग ( म्ह. हत्ती ) रुक्मरथ सोळा" इत्यादि धाडून वरच्या आदरातिथ्यानेंच त्यास गार करण्याची–मारे धांदल उडाली ! पण धृतराष्ट्र अंधळा असला तरी परमात्मा डोळस होता ! मांजरानें

जरी डोळे मिटून दूध प्राशन केलें अथवा करण्याचा प्रयत्न केला, तरी जग त्यास पाहातच असतें! अंधळ्या धृतराष्ट्रास वाटलें कीं, शरीरानें नाहीं तरी बुद्धीनें तरी श्रीकृष्ण आपल्या-सारखाच अंधळा असेल. "अंधळ्यासी जग सारेंचि अंधळें!" असें एका कवीनें म्हटलेंच आहे तें कांहीं खोटें नाहीं! परंतु श्रीकृष्ण अंधळा नव्हता–शरीरानें तर नाहींच पण मनानें, बुद्धीनें व आत्मिक दृष्टीनेंही तो अंधळा नव्हता, इतकेंच नव्हें तर अखिल जगतांत त्याच्या–सारखा डोळस तोच हें खुळ्या धृतराष्ट्रास कोठून समजणार? नुसत्या बाहेरच्या दंभाला व झकाकीला भुलणारा तो साधा भोळा 'वकील' उर्फ दूत नव्हता. तिथें खरें नाणें हवें होतें. त्या प्रसंगीं, "सत्य प्रेमचि दावुनि सूज्ञें तो विश्वपाळ कवळावा" असा सिद्धान्त सांगून विदूर धृतराष्ट्रास पुढें म्हणतो कीं, "बाबारे, तुला जर त्याला प्रसन्न करायचें असेल तर असल्या गुळखोबऱ्याच्या भुलभुलावणीनें तो सर्वतश्चक्षु परमात्मा केव्हांहीं फसला जाणार नाहीं हें पूर्ण लक्षांत ठेवून, तो जी कांहीं न्याय्य व हक्काची मागणी करावयास आला आहे ती त्याला दे!" पण लोभी धृतराष्ट्राचे मनांत त्याचें नांवही येईना! धृतराष्ट्रानें घाडलेली वर सांगितलेली सत्काराच्या वैभवाची मिरास तर काय, पण दुर्योधनादिकांनीं "दाटुनि केलेला" भोजनाचा "आग्रह"ही परमात्म्यांनीं पलीकडे 'डावलून' टाकला, व विदुराच्या घरीं जाऊन उतरून 'विदुराच्या कण्या' मारे आनंदानें मिटक्या देऊन खाऊन. "शठांच्या घरच्या पंचपक्वान्नांहून साधूच्या येथली मीठभाकरही मला अधिक गोड लागते. प्रिय आहे" हें त्यांनीं सर्व जगास दाखवून दिलें–जगजाहीर केलें! शठांचीं बोलावणीं कशीं नाकारलीं, व देव विदुराच्या घरी ढेकरावर ढेकरा देऊन कसें आनंदानें जेवले, याचें वर्णन पंतांनींही–" भोजन करा म्हणे शठ, देव म्हणे मज कशास होकरिता?। जेवा तुम्हीच; दाटुनि आदर आग्रह कशास हो करिता?" नंतर विदुराच्या इथें, "आले ढेकर, दिधल्या मिटक्या, बहुसाळ मारिले फुरके। उरके सर्वामागुनि अशन, परि न ताट चाटणें उरके!॥"–अशा बहारीच्या आर्यांनीं केलें आहे. ह्या सडेतोड सत्यप्रीतीला व भक्तवत्सलतेला जगांत दुसरी तोड सांपडेल

काय ? अस्तु. त्यानंतर १३ वर्षे पुत्रवियोग झालेल्या कुंतीची भेट घेऊन श्रीकृष्णांनीं तिचें योग्य शब्दांनीं समाधान केलें. " ते तर–नाथ तर–माझ्या फुटक्या नशिबानें मागेच निघून गेले. त्यांचें छत्र जाऊन उघड्या पडलेल्या माझ्या पोरक्या पोरांवर व सुनेवर, कृष्णा, ह्या दुष्टांनीं अमानुष आग पाखडली रे ! त्यांचा दुस्वास करून, त्यांची विटंबना करून, त्यांचा नानातऱ्हेनें छळ करून, ह्या नीचांनीं त्यांना–विशेषेंकरून माझ्या लाडक्या द्रौपदीला, फार छळलीरे ! " इत्यादि परोपरीनें कुंतीनें विलाप केला. " वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या। ब्रह्मासहि गहिंवरवी महिवरवीरेंद्रपांडुची भार्या ! " असें पंतानींही त्याचें सहृदय वर्णन केलें आहे ! निर्गुण ब्रह्मसनातन श्रीकृष्णासही तो विलाप ऐकून गहिंवर आला असें पंत म्हणतात, आणि ते योग्यच आहे. कोणाचाही छळ किंवा अपमान हा पुरुषांच्यापेक्षांही भावनाप्रधान स्त्रियांच्या हृदयाला अधिक लागतो–जाणवतो ही एक गोष्ट, आणि स्त्रीहृदयाच्या यातना स्त्रीहृदयच खरें जाणूं शकतें ही दुसरी गोष्ट, लक्षांत ठेवली असतां एकाच रुदनाच्या व हृदयखळबळीच्या तारा द्रौपदी व कुंती ह्या दोन हृदयावर कशा सारख्याच छेडल्या गेल्या, हें वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल. असो. कुंतीचें योग्य शब्दांनीं समाधान करून व आपले डोळे पुसून परमात्मा धृतराष्ट्राच्या–दुर्योधनाच्या दरबारांत निघाले !

त्या दरबारांतली स्थिति काय होती, आपल्याच लोभाच्या पापानें उत्पन्न केलेलें व पोसलेलें दुर्योधनाचें भूत–पिशाच–शंकराच्याच डोक्यावर अकृतज्ञपणें हात ठेवावयास निघालेल्या 'भस्मासुरा'प्रमाणें–त्याचें त्यासच कसें अनावर झालें होतें, हें आपण वर पाहिलेंच आहे. दुसरी एकच गोष्ट लक्षांत ठेवायची म्हणजे म्हाताऱ्या धृतराष्ट्राचा स्वभाव अत्यंत–पराकाष्टेचा–लोभी होता, व तो जरी आपल्या मुलाइतका दुष्ट नसला, तरी या लोभाचेच पायीं कदाचित् बनलेल्या कमकुवत मनामुळें त्याची आपल्या पुत्रावर जरब बिलकुल नव्हती. दरखेपेस आपल्या मुलांच्या आड दडून म्हातारा आपला लोभी स्वार्थ साधीत होता ! विदुर, भीष्म, व्यास, इत्यादिकांनीं आजपर्यंत त्यास या बाबतींत थोडा थोडका उपदेश केला होता असें नाहीं. पण तो सर्व–संजय पुढें गीताकथनप्रसंगीं ज्ञानेश्वरमुखानें

म्हणतो आहे, त्याप्रमाणें–“ रेड्याच्या पाठीवर पाऊस ” होता ! म्हाताऱ्याचा राज्यलोभ अनिवार होता व त्याच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष फुशीनें दुर्योधनादि मंडळी फारच शेफारून गेली होती. बाकी, धृतराष्ट्राला म्हणजे न्यायान्याय व धर्म्याधर्म्य कळत नव्हतें असें नाहीं. पण ‘ सर्व पापाचें मूल ’ असणाऱ्या लोभाचे पायीं तें त्यास वळत नव्हतें इतकेंच. असो. तेव्हां अशा प्रकारच्या दरबारांत सामासाठीं म्हणून श्रीकृष्ण जेव्हां दाखल झाले, तेव्हां त्याचा निकाल काय लागणार हें दिसतच होतें. सभेंत गेल्याबरोबर श्रीकृष्णांनीं धृतराष्ट्रास उद्देशून–त्यास पुढें करून–धीर गंभीर वाणींत भाषण करण्यास प्रारंभ केला ! त्यांचें भाषण ऐकून सर्व सभेनें मान डोलावली. श्रीकृष्ण परिसा'बरोबर आलेले ‘ अय ’ ऋषींनीहीं त्यास पुष्टि दिली. भगवान् श्रीकृष्ण प्रत्यक्ष दुर्योधनाशींही सौम्यपणानें एकदां बोलले ! लढाईच्या वणव्यांत सगळ्यांची आहुति पडूं नये म्हणून श्रीकृष्णांनीं सामाची कमाल केली. परंतु, “ यांत माझा कांहींच अपराध नसतां उलट तुम्ही माझीच ‘ कुलांगार ’ म्हणून निंदा करतां याचा अर्थ काय ? अर्धें राज्य तर राहोच पण सुईच्या अग्रावर राहील इतकी मातीही मी तुम्हांस देणार नाहीं ! ” असें उन्मत्त व अधःपाताच्या खोलच खोल दरींत बुडालेल्या दुर्योधनानें उत्तर केलें ! अरेरे ! स्वतः केलेलीं हजारों पापें स्वतःसच दिसेनातशीं व्हावीं ह्याहून अधःपाताची शेवटची पायरी ती कोणची असणार ? पण श्रीकृष्णांनीं त्याला झणझणीत उत्तर देऊन त्याला त्याच्या अनन्वित पापांची आठवण करून दिली, व शेवटीं बजावलें कीं, “बच्चंजी, तुला रणांगणावरच्या धुळींत लोळायची इच्छा झाली आहे काय ? ठीक आहे. पांडव तुझी हीहि इच्छा लवकरच पुरी करतील ! सामोपचारानें मागितलेला राज्याचा अर्धा वांटा तूं तसा कुठला द्यायला ? रणांगणावर तुला लोळवून, तुझ्या मस्तकावरील राजमुगुट ज्या वेळेस पांडव लाथेच्या ठोकरीनें उडवून देतील, तेव्हां तूं शुद्धीवर येशील ! तोंवर कुठला यायला ? ” पण यावर उत्तर न करतां उद्धटपणें भरदरबारांतून निघून जाणाऱ्या दुर्योधनाच्या बापास–धृतराष्ट्रास–श्रीकृष्णांनीं, “दुर्योधन व त्याची चांडाळचौकडी कैद करून पांडवांच्या हवालीं कर, तरच भावी युद्धाचें संकट टळेल,” असें

स्पष्टपणें बजावलें असतांही त्या थेरड्यानें पुत्रमोहाला व लोभाला अशा भयंकर वेळींही बळी पडून सर्व कुरुकुलच्या कुरुकुल युद्धाच्या ज्वालामुखी पर्वताच्या तोंडावर नेऊन बसवलें–ठेवलें ! तेव्हां या सर्व अनर्थाच्या व रक्तपाताच्या पापाचें खापर त्याच्याच माथीं बसतें असें स्पष्ट म्हणण्यास हरकत नाहीं ! आणि आश्चर्य हें कीं, शेवटचा यत्न म्हणून गांधारीनें उपदेश करूनहि जेव्हां तो दुष्ट कारटा ऐकेना तेव्हां त्याचें योग्य तें नियंत्रण करायचें टाकून उलट हा लोभिष्ट म्हातारा सभागृहांतून निघून जाण्यास तयार झालेल्या कृष्णप्रभूजवळ जाऊन, " माझ्या मनांत पांडवांबद्दल पाप नाहीं, पण माझा मुलगाच माझें ऐकत नाहीं त्याला मी काय करूं ?" असें तोंड वाकडें करून म्हणूं लागला! पण त्याची किंमत किती–नक्राश्रु इतकीच–आहे हें श्रीकृष्णास काय कळत नव्हतें ? त्यांनीं तिकडे दुर्लक्ष करून सर्व सभासदांस बजावलें कीं, "पहा, दुर्योधन सामोपचारानें ऐकत नाहीं. व हा धृतराष्ट्रही त्यास आवरूं शकत नाहीं अथवा आवरीत नाहीं. तेव्हां आतां युद्धावांचून सोयच नाहीं" असें म्हणून, व दुष्ट दुर्योधनाच्या चांडाळ चौकडीनें त्यास अडवून धरण्यास–अडकवून ठेवण्यास– आपले नोकर त्याचे अंगावर घालण्याचा यत्न केला असतां, "माझ्या अंगाला हात तर लावा कीं, जळून खाक व्हाल." असें खणखणीत उत्तर देऊन, आपल्या अलौकिक तेजाच्या प्रकाशानें त्या सभेंतील दुष्टांचे व प्रेक्षकांचे डोळे दिपवीत, श्रीकृष्ण बाहेर पडले !

प्रियवाचक, क्षणभर विचार केल्यास सहज लक्षांत येईल कीं, अशाच तऱ्हेचा अंगदशिष्टाईचा प्रसंग आपण रामायणांत वाचला आहे, पण तिथें जो त्या शिष्टाईचा निकाल झाला तोच इथेंहि झाला आहे. दोन्ही शिष्टाईपासून मानवांनीं कांहींच शिकण्यासारखें नाहीं काय ? शिष्टाईनें राज्यें मिळत नसतात–दुष्ट नक्रानें गिळलेलें माणिक बाहेर काढायचें म्हणजे त्याला मनगटांतच जोर लागतो, हा उत्कृष्ट धडा ह्या दोन्हीही शिष्टाया शिकवीत नाहींत काय ? " धटासि पाहिजे धट । उद्धटासि आणावा उद्धट । खटनटासि खटनट। अवश्य करी ॥" ह्या समर्थोक्तीची सत्यता यावरून पटत नाहीं काय ? " एथ पैंजरावें काम । अधमासी तो अधम । " असें शांतिसागर तुकोबाहि सांगतात. विसाव्या शतकांतील

गोपाल कृष्णानीं असाच एक शिष्टाईचा प्रसंग केला होता. पण जेथें भगवान् गोपालकृष्णासारख्या विभूतीलाही आपल्या शिष्टाईत यश आलें नाहीं, तेथें आमच्या साध्या भोळ्या गोपाळ कृष्णास श्वेतद्वीपस्थांनीं वाटाण्याच्या अक्षता लावाव्या हें योग्यच आहे. श्रीकृष्णाची शिष्टाई सर्व जगाला एकच गोष्ट वारंवार जाहीर करते; ती हीच कीं, उन्मत्त व पशुवृत्तीच्या सैतानांचे हातांत साम्राज्य गेलें असतां त्यांच्या पकडींतून तें सुटणें प्रत्यक्ष परमेश्वर जरी शिष्टाई करूं लागला तरी अशक्य आहे, प्रत्यक्ष ईश्वराची शिष्टाईही तेथें अपुरी पडते–कमकुवत ठरते. त्याला अन्य उपायांचेंच अवलंबन करावयास हवें. फार लांब कशाला ? खुद्द वरील शिष्टाईच्या वेळचींच जर सर्व पांडवांचीं कृष्णांशीं झालेलीं भाषणें व त्यांचीं उत्तरें पाहिलीं, तरीहि ह्या शिष्टाईचा फोलपणा खुद्द त्यांचा त्यासच किती अगाऊच पटला होता, हें आपणांस कळून येणार आहे. तथापि धर्मनीतिप्रमाणें सामोपचारानें गोष्टी झाल्या तर बऱ्या हें केव्हांहीं खरें आहे. पण त्याचबरोबर त्या तशा अशा प्रसंगीं कधींच होत नाहींत –प्रत्यक्ष परमेश्वर अवतरला तरी होत नाहींत–आणि यासाठींच, त्या सामाच्या मागं दंडाची–कालदेशवर्तमानानुरूप कोणाच्याही दंडाची–जय्यत तयारी हवी, हेंच तत्व वरील शिष्टाईपासून सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अस्तु.

श्रीकृष्णाची शिष्टाई फोल ठरली, व दुष्टांची रग प्रत्यक्ष रणांगणावर जिरविल्यावांचून गत्यंतर नाहीं, असा प्रसंग येऊन ठेपला. तथापि सत्यासाठीं, न्यायासाठीं, आपल्या हक्कासाठी, झगडतांना केवढाही प्रलय करावा लागला तरी तो ईश्वराचे घरीं क्षम्यच ठरत असतो! पृथ्वीवर माजलेलें दुष्टांचें रान वारंवार सफा जाळून टाकण्यासाठीं समरदेवतेच्या रूपानें प्रत्यक्ष परमेश्वरास अवतार घ्यावा लागतो. मानवी हक्कांची पायमल्ली करणाऱ्या, पतिव्रतांची अब्रू घेऊ पाहणाऱ्या, दुष्टांचें निर्दलनाची कृपा त्या दुष्टावर दाखविण्याकरितां प्रत्यक्ष ईश्वरही युगायुगांचें ठायीं अवतार धारण करतो ! काय ? " दुष्टांचें निर्दलनाची कृपा ? " होय. दुष्टनिर्दलन हीच त्यांच्यावर कृपा होय–दया होय–हें आमचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. कारण ' धर्मनीतीच्या व्यवहारांतील सूक्ष्म धाग्यांची

गुंतागुंत ' आपल्या ओजस्वी वाणीनें सहज उकलणारे तुकोबा दयेची व्याख्या करतांना–" दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कंटकांचें ॥ धर्मनीतिचा हा एक व्यवहार । सांगतसे सार निवडोनी ॥ " असेंच सांगतात. तेव्हां साधूचें व अनागस–गरीब–अशा भूतमात्रांचें परिपालन-परित्राण, व कंटकाप्रमाणें सर्व समाजाला–सर्व राष्ट्राला– सर्व जगाला बोंचणाऱ्या दुष्कृतांचा–दुष्टांचा–विनाश–त्यांचें निर्दालन, या दुहेरी कार्यासाठीं होणारा मंगलमय ईश्वराचा अवतार 'दयाघन' ह्या त्याच्या ब्रीदाला अविरुद्ध खास नाहीं! यासाठींच कालियामर्दनप्रसंगाचें वर्णन करतांना शुकाचार्य म्हणतात, " दंड प्रसंगांत कृपाच पाहे! " ईश्वराच्या दयाघनत्वाला या दुहेरी कामगिरीनें बाध येत नाहीं; इतकेंच नव्हे तर, खुद्द मानवी व्यवहारांतही ह्या तत्वाचा उलगडा असाच लावायचा हेंच तुकोबांना वरील उक्तींत सांगावयाचें आहे. " दया धरमका मूल है " ह्या उक्तीची यथार्थताही वरील उक्तीशीं पूर्ण जुळतीच आहे, हें क्षणभर विचार केल्यास कळून येणार आहे. दयेच्या नांवाखालीं समाजांत व राष्ट्रांत जो पंगूपणा–नामर्दपणा- भ्याडपणा—क्लैब्य शिरतें तें समर्थांसारख्या तेजस्वी व बाणेदार साधूसच नव्हे, तर तुकोबांसारख्या शांतिनिधीसही व खुद्द परमेश्वरासही पसंत नाहीं, हेंच वरील संतांच्या उक्ती व प्रत्यक्ष ईश्वराचेंही, " परित्राणाय साधूनां " इ० वचनच नव्हे,–तर अवतारकार्यही आपणास दाखवितें. कारण त्या ईश्वराच्या पावलावर पाऊल ठेऊनच आपणास जावयाचें आहे,–" मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः " असें तेच म्हणतात. अस्तु.

तेव्हां आतां निकराची लढाई जुंपणार, राज्यवारसाचा हक्क कौरव-पांडव समरभूमीवरील रणदेवतेस विचारणार, हें नक्की ठरलें. सैन्याची आणि शस्त्रास्त्रांची जमवाजमव पांडवांनीं पूर्वींच द्रुपदाच्या दूरदर्शी उपदेशाप्रमाणें सुरू केली होती हें आपणास ठाऊकच आहे. त्याचप्रमाणें, एक श्रीहरी आपल्या बाजूस असल्यावर, त्याचे १० कोट नव्हे ५६ कोट यादववीर जरी दुर्योधनानें उचलले असतें, तरी अर्जुनास त्याची कशी क्षिती नव्हती, हेंहि आपण पाहिलेंच आहे. कारण, ' जिकडे देव तिकडे जय ' हें तर ठरलेलेंच होतें. पण ही साधी गोष्ट सुद्धां खुळ्या दुर्योधनास

दिसली नव्हती व तो आपल्याच आनंदांत होता, व त्यानेंही मारे युद्धाची जय्यत तयारी केली. हळुहळु पांडव आपल्या सात अक्षौहिणी सैन्यासह उपप्लव्य नगरीहून पुढें सरकले, व कुरुक्षेत्राच्या पटांगणावर त्यांनी आपली छावणी दिली. उलटबाजूस समोरच कौरवांच्या ११ अक्षौहिणी सैन्याचा–मोंगलसेनेप्रमाणें–अफाट सेनासागर पसरला होता. श्रीकृष्णांनीं 'हातांत शस्त्र धरणार नाहीं' अशी प्रतिज्ञा केली असल्यामुळें अर्थात् त्यांनीं पार्थाचें सारथ्य–त्याच्याही फार दिवसांच्या इच्छेप्रमाणें–पत्करलें. या श्रीकृष्णाच्या प्रतिज्ञेचाही मोड करणारा निघालेला भक्तवीर पुढें आपण पहाणारच आहों; असो. एकंदर सैन्याची रचना कसकशी झाली, दोन्ही सैन्यांत कोण कोण वीर प्रमुखपणें चमकत होते, त्यांची चतुरंगदल सेना किती अफाट व अथांग होती, व शंख भेऱ्यांच्या निनादानें कानठळ्या बसून भीरूंची घाबरगुंडी कशी उडे व वीरांस कसें स्फुरण चढें, याची हकीकत भगवद्गीतेचा पहिला अध्याय व त्यावरील ज्ञानोबांची टीका, यांवरून फारच बहारीनें समजून येणार आहे. त्या धर्मक्षेत्रावर–भावी पानपतच्या त्या पटांगणावर–दोन्ही सैन्यें लढाईच्या अगदीं जय्यत तयारीनें उभीं होतीं. वीरांचे बाहू फुरफुरत होते, घोड्यांचें खिंकाळणें त्यांची उत्सुकता दर्शवीत होतें–मधून मधून गंभीर असा शंखनाद होत होता! याच पानपतच्या पटांगणावर पुढें कित्येक निकराच्या व निकाल लावणाऱ्या लढाया झाल्या आहेत! येथेंच झालेल्या भयंकर रणकंदनानें मराठी वैभवास अपजयाच्या तडाक्यामुळें उतरती कळा लागली! पण तो कथाभाग 'भारताच्या राजकीय इतिहास'प्रसंगीं तृतीय खंडांत आपणास पहावयाचाच असल्यामुळें प्रस्तुत आपण ह्या कुरुक्षेत्रावर काय होत आहे हें पाहूं या. आंधळा धृतराष्ट्र घरीं बसून व्यासांनीं दिव्यदृष्टि दिलेल्या संजयास लढाईवरील हकीकत विचारीत आहे, असा गीता नाटकाचा पडदा वर जात आहे–भगवद्गीतारूपी नाटकाच्या पहिल्या अंकांतील पहिला प्रवेश आहे! "धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे" काय काय झालें– लढाईसाठीं एकाच पटांगणावर ठाकलेल्या माझ्या मुलांनीं व पांडूच्या मुलांनीं काय काय केलें–तें सांग!" असें म्हतारा विचारीत आहे, व संजय सांगत आहे. दुर्योधनास अत्यंत आनंद झालेला आहे.

पांडवांची लढाईची खुमखुम जिरवून एकदां निष्पांडवी पृथ्वी केली कीं मग आपण निष्कंटकपणें सर्व राज्याचा आरामशीर उपभोग घेऊं, असे बिचारा मनांत मांडे खात होता. पण विधिघटनेच्या चक्रांत त्याची सद्दी संपली होती–त्याचा काळ फिरला होता. पण ह्या भावी स्थितीची कल्पनाही नसलेला वेडा दुर्योधन आनंदानें द्रोणाचार्यां-जवळ गेला, व त्यांना उभयपक्षाची कशी व्यवस्थित रचना झाली आहे, विविध ध्वज कसे फडकत आहेत, व धनंजयासारखे वीर आपले देव-दत्तासारखे शंख कसे फुंकीत आहेत, हें वर्णन करून सांगू लागला. ह्या 'रणनदी'च्या पार 'केशव कैवर्तका'नें–नावाड्यानें–पांडवांस कसें सुखरूप नेऊन पोहोंचविलें, हेंच आतां आपणास पाहणें आहे. "भीष्म-द्रोणतटा जयद्रथजला गांधारनीलोत्पला। शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला। अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी।" अशा प्रकारची ही 'रणनदी' होती. "हें पहा, आचार्य, पांडवांच्या सैन्याचा हा द्रुपदपुत्रानें रचलेला व्यूह पहा! आपलेंही सैन्य भीष्मांच्या रक्षणाखालीं कसें व्यवस्थित उभें आहे, तें पहा. तो पहा कर्ण, तो दुःशासन, तो जयद्रथ" याप्रमाणें दुर्योधन आनंदांत द्रोणाचार्यांशीं गोष्टी करीत आहे तोंच इकडे एक चमत्कारिक प्रसंग उद्भवला. अर्जुनानें "सेन-योरुभयोर्मध्येरथंस्थापयमेऽच्युत" म्हणून श्रीकृष्णांस विनंति केली. कृष्णांनीं त्याचा रथ दोन्ही सैन्यांच्यामध्यें नेऊन उभा केला. अर्जुनानें आपली नजर एकदां आपल्या व एकदां कौरवांच्या सर्व सैन्यावरून फिरवली. पण हें काय? अर्जुनाचें तोंड असें गोरेंमोरें कशानें झालें? क्षणापूर्वींचा त्याचा तो रणोत्साह कोठें नाहींसा झाला? "हाय! हाय! नको हें युद्ध!" अर्जुन आपलें गांडीव धनुष्य खालीं टाकून म्हणाला, "देवा! माझे आजे, चुलते, काके, मामे, यांच्याशीं लढून त्यांच्या रक्तानें माखलेल्या सिंहासनावर मी बसूं काय? नको, तो विचारसुद्धां किती असह्य होतो! त्यापेक्षां भीक मागून उदारनिर्वाह केलेला काय वाईट? टीचभर पोटाच्या खळगीसाठीं प्रत्यक्ष भावांचे व नातलगांचे बळी घ्यायचें, या मारेकऱ्यासही लाजविणाऱ्या कृत्यापासून जितका मी दूर पळेन तितकें चांगलेंच. त्यांच्या रक्ताचा सडा घालून मी राज्योपभोग भोगूं? देवा!

या पापाची फेड मग जन्मजन्मांतरीं तरी होईल काय ?" इत्यादि अर्जुनाचा विलाप पाहून देव तर थक्कच झाले ! "याला कुठली ही अवदसा आठवली ?" ते स्वतःशींच म्हणतात, "आतां काय करावें ? हा तर पार आपलें गांडींव धनुष्य फेंकून देऊन खालीं मान घालून बसला ! " असें म्हणून, 'एकाद्या भुतानें झपाटलेल्या व्यक्तीकडे जसा पंचाक्षरी पाहात राहातो ' तशी देवांनीं त्याची कांहीं वेळ टेहळणी केली !

याच ठिकाणीं आपणही, यापुढें येणाऱ्या भगवद्गीतेसाठीं, उद्भवलेल्या–अथवा उत्पन्न केलेल्या, या प्रसंगाचा थोडासा विचार करूं या. अर्जुन ऐत्या वेळेस हातपाय गाळून बसला आहे, असा हा प्रसंग आहे. पण हें कितपत शक्य आहे याचा विचार केला पाहिजे. ज्या अर्जुनाच्या मनांत आजपर्यंत झालेल्या अपमानाचा व द्रौपदीच्या विटंबनेचा सूड सारखा धुमसत होता, तोच अर्जुन ऐन लढाईच्या वेळेस मात्र हातपाय गाळतो, हा थोडासा चमत्कारच नव्हे काय ? आधीं अर्जुनासारखा वीर आणि तो हातपाय गाळतो, हेंच चमत्कारिक.–त्यांतूनही त्याच्या ठिकाणीं सूडाची भावना इतकी जाज्वल्य असतांना तर तें फारच चमत्कारिक, एक वेळ धर्मराजास असा मोह उत्पन्न झाला असें म्हटलें असतें, तर तें थोडेसें तरी सयुक्तिक होतें. तसेंच आपले काकेमामेच आपणांशीं लढायला येणार ही गोष्टही त्यास कांहीं नवीन नव्हती. इतकेंच नव्हे, तर उत्तरगोग्रहणांसारख्या प्रसंगीं मात्र त्यांच्याशींच लढतांना तो कचरूं नये, व आतां मात्र त्यास धडकी भरावी, हें चमत्कारिक दिसतें ! बरें, अशाच तऱ्हेचा कांहींसा प्रसंग मागें वाटाघाट चालली असतां उद्भवला होता. धर्मास व भीमास केलेला, 'भिक्षा हे क्षत्रियांचें काम नव्हे," व " भीमा, मनुष्यानें नेहमीं स्वकर्तव्य पाहावें, त्याच्या परिणामाकडे लक्ष देऊं नये, " इत्यादि भगवंतांचा उपदेश अर्जुनानें ऐकला नव्हता काय ? त्याचप्रमाणें मेलेल्या हाडांनाही जिवंत करणारा कुंतीचा निरोप–" अपमानाबद्दल ज्याला राग येत नाहीं तो क्षत्रीयच नव्हे ! सापांच्या दाढा उपटून काढतांना मेलांत तरी बेहत्तर, पण कुत्र्याच्या मोतीनें मरूं नका ! " इत्यादि विदुलेच्याच शब्दांत कुंतीनें धाडलेला निरोप–ऐकल्यावरही अर्जुनासारखा जातिवंत क्षत्रिय मोह पावावा,

हें त्याहूनहि आश्चर्यकारक आहे! तेव्हां हा प्रसंग नैसर्गिक नसून, मुद्दाम अर्जुनाच्या निमित्तानें सर्व जगास उपदेश करण्यासाठीं म्हणून, मुद्दाम उत्पन्न केला आहे, असें म्हणणारा एक पक्ष आहे. यावर तोंडीस तोंड उत्तरें ठेवून देतां येणारच नाहींत असें जरी नसलें—आणि हीं उत्तरें सर्वत्र माहीत आहेतच+ —तरीही वरील पक्षाच्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें मात्र नाहीं, एवढेंच आम्हांस येथें दाखवावयाचें आहे. सारासार विचार करून तो प्रसंग उद्भवला आहे, कीं कल्पिला आहे, याचा निकाल वाचकांनीं आपल्याशींच करावा हें बरें. कांहीं असलें तरी तो उद्भवला असें धरून चालून आपण पुढें जाऊं या.

जातां जातां इथें दुसऱ्याहि एका मुद्याचा विचार करणें भाग आहे, व तो म्हणजे भगवद्गीतेंत काय सांगितलें आहे, कोणचा विषय प्रतिपाद्य आहे हा होय. वास्तविक आमच्या मतें असा प्रश्न उपस्थित होणें अथवा करणेंच हास्यास्पद आहे. कारण भगवद्गीतेच्या पूर्वीं अर्जुनाची स्थिति काय होती? व नंतर काय झाली? ह्या दोन प्रश्नांचें उत्तर मिळालें म्हणजे त्याच्यांतच, ' यावरून भगवद्गीतेंत काय सांगितलें असलें पाहिजे? ' या प्रश्नाचें उत्तरहि गर्भितपणें मिळतेंच आहे. गांडीव धनुष्य फेंकून देऊन उघड उघड एखाद्या षंढ माणसासारखा सर्वकर्मसंन्यास करायला तयार झालेल्या नेभळट अर्जुनाला ज्या मोहाच्या भुतानें पछाडलें होतें, त्या भुताला गाडून, अर्जुनाला पुन्हा नवीन दमदारपणानें लढाईला प्रवृत्त केलें—नव्हे, अर्जुनाच्या तोंडून "नष्टोमोहःस्मृतिर्लब्धा" व 'करिष्ये वचनं तव' इ. उद्गार कृष्णांनीं वदविले आहेत, यावरूनच कर्मयोगाचा—व कर्मयोगाचाच केवळ—जाज्वल्य उपदेश या भगवद्गीतेंत असला पाहिजे, हें अगदीं उघड आहे—अंधळ्यालाही दिसण्यासारखें आहे! परंतु असें असतां गम्मत काय झाली आहे कीं, वेद, उपनिषदें, व गीता, या प्रस्थानत्रयीचें महत्त्व आपल्या पारमार्थिक वाङ्मयांत अतिशयच असल्यामुळें, या बड्या वशिल्यासाठीं ज्या त्या पंथाची धडपड सुरूं झाली;—कारण तिला मान्य त्याचा गौरव फार व्हावयाचा, व

---

+ उदाहरणार्थ श्रीयुत चिं. वि. वैद्य यांचा "महाभारताचा उपसंहार" पान ८३७ ते ८३९ पहा.

तिला सोडून असणाऱ्या विधानांचें तितकें महत्त्व राहायचें नाहीं, या विचारामुळें जो तो या प्रस्थानत्रयीचा आश्रय घेऊं लागला. व त्यांतलीच भगवद्गीता एक असल्यामुळें तिचीही बिचारीची ओढाताण सुरू झाली. ! ज्याप्रमाणें कै. लो. टिळकांचा सर्वत्र बोलबाला असल्यामुळें, प्रत्येक चळवळ करणाऱ्या पंथांनीं, "त्यांचेंही मत असेंच होतें" हें सिद्ध करण्यासाठीं धडपडावें;—तें इतकें कीं, ज्या गोष्टी व जे पदार्थ टिळकांस अत्यंत अप्रिय असायचे ते सुद्धा त्यांच्या नांवावर—'लोकमान्य' ह्या नांवाखालीं विकण्याची धडपड अगदी साध्या हॉटेलवाल्यांनीं सुद्धां करावी, तसाच कांहींसा प्रकार येथें झाला. वास्तविक जाज्वल्य कर्मयोगाचें प्रतिपादन गीतेंत असतां, शंकराचार्यांनीं तिला अद्वैतज्ञानपर ठरवली, व गीतेंतील कर्मयोगपर विवेचन केवळ अर्थवाद म्हणून साफ उडवून दिलें, तर रामानुजांनीं ती केवळ भक्तिपर आहे, असें दाखविण्याचा यत्न केला. वल्लभाचार्यांनीं तिला तिसरीकडेच खेंचली, योगी लोक त्यांत केवळ योगच पाहूं लागले, असा प्रकार झाला. वास्तविक 'ग्रंथाचा प्रारंभ व अंत पाहून कोणच्याही ग्रंथाची उपपत्ति लावण्याची' मीमांसकांची सोपी व बिनमोल युक्ति उघड डोळ्यासमोर असतां, गीतेच्या प्रतिपाद्य विषयाची इतकी ओढाताण व्हावी—आपल्या पंथाच्या भरीस भरून त्याच्या मरभराटीसाठीं ज्या त्या आचार्यांनीं आपापल्या पंथाकडे तिला खेंचण्याचा यत्न करावा—हें केवढें चमत्कारिक ? पण यांत चमत्कार तरी कसचा ! पंथाभिमानानें एकदां मनुष्य ग्रासला म्हणजे असेंच व्हायचें. परंतु ह्या पंथाभिमानापासून अलिप्त राहणाऱ्याही क्वचित् 'लोकमान्यां'सारख्या कांहीं विभूति निघाल्या, व त्यांनीं मनमोकळेंपणें गीतेंत कर्मयोगच प्रतिपाद्य आहे, असें मुक्तकंठानें जाहीर केलें. अर्थात् त्या कर्मयोगाचें आचरण पायाशुद्ध व यथास्थित व्हावें, बिनचुक व्हावें, यासाठीं—केवळ त्या कर्मयोगाच्या पूर्तिसाठीं व त्यास सहाय्यक म्हणून, त्याच गीतेंत योगसाधन, भक्ति व ज्ञान ह्यांचेंहि प्रतिपादन आलें असेल; नाहीं असें नाहीं. पण तें साध्य नव्हे, साधन आहे, हें विसरतां कामा नये. कारण भगवद्गीता सांगून झाल्यावर अर्जुन नाक धरून योग करीत बसला नाहीं, किंवा ईश्वराची मूर्ति पुढें मांडून उपासनेंत दंग झाला नाहीं, अथवा ज्ञानाच्या उच्च समाधींत केवळ डुलत

राहून स्वस्थ बसला नाहीं; तर या तिन्ही मार्गांचें सार पोटांत घालून, तें पचवून, योगसाधनाची बैठक, भक्तिमार्गाची दृढता, व ज्ञानाची " सर्वं खल्विदंब्रह्म " अशी स्थिति, यांच्या जोरावर त्यानें भयंकर रण-कंदन माजविलें, व विलक्षण कापाकापीस सुरवात केली! असो.

भगवंतांनीं अर्जुनाची ती हताश व दुबळी स्थिति पाहून त्यांस विलक्षण चेव आला, व ताबडतोब त्यांच्या तोंडून, "क्लैब्यंमास्म गमःपार्थ" हा श्लोक बाहेर पडला! "अहारे नेभळटा!" श्रीकृष्ण बोलत होते, "अरे तुला ही अवदसा कुठून आठवली? ऐन लढाईच्या प्रसंगीं असा प्रसंग करायचा होता तर घरींच कां नाहींस हातांत बांगड्या भरून बसलास? अरे, मर्दासारखा तूं मर्द असून रणांगणांतून तूं पळून जाणार म्हणतोस? अर्जुना, आजपर्यंत तुझी 'वीर' म्हणून ख्याति झाली त्या आपल्या कीर्तीस इथून काळें करून तूं काळिमा फांसणार काय? अहारे भ्याडा! तूं रणांगणांतून बाहेर पडूं लागल्याबरोबर हे कौरव तुझी कशी हुर्‌रेवडी उडवतील याची तुला कल्पना तरी आहे काय? तसलें लाजिरवाणें जिणें घेऊन तूं घरीं जाणार काय? आणि तशा स्थितींत तुला जिवंत तरी राहवेल काय? अरेरे! अर्जुना, तुझा हा षंढपणा पाहून मला खरोखर तुझी कींव येते. ऐनवेळीं असा षंढपणाच दाखवायचा होता तर विराटाच्या इथेंच कां नाहीं राहिलास आजन्म बृहन्नडेचें काम करीत? त्या ' वीरवीडंबनाची ' लाज वाटून मग स्वहक्काच्या रक्षणाकरतां शस्त्र तरी कशाला हातीं धरलेंस? अरे, खरें पाहिलें तर तुझ्यासारख्या क्षत्रिय वीरानें यावेळीं एकच रणधुमाळी माजवून ' उसन्या वार्यी झुंजावें ' व अनायासें तुम्हासारख्या क्षत्रियांसाठीं उघडे झालेल्या स्वर्गद्वारांतून आंत प्रवेश करावा, किंवा रणांगणावर जिंकून सर्व पृथ्वीचें साम्राज्य भोगावें, तें सोडून आज तुला हें कसलें बायकी वेड आठवलें आहे कुणास ठाऊक? अर्जुना, या तुझ्या करणीनें तूं आपल्या जातिवंत क्षत्रिय धर्मास बाध आणित आहेस याचा तूं कांहीं विचार केला आहेस काय?" असें म्हणून श्रीकृष्ण क्षणभर थांबले व अर्जुनाकडे क्षणभर पहात राहिले. पण मोहभुजंगाचा डंख फार तीव्र होता व त्याचें विष अर्जुनांच्या देहांत फार भिनलें होतें. त्यामुळें मिठाच्या पाण्याच्या या पहि-

त्याच पण जोरदार हपक्याचाहि कांहींच उपयोग झाला नाहीं. तेव्हां अर्जुनाला चुचकारीत देव पुढें म्हणतात, " अर्जुना, काय तूं त्यांना मारणार म्हणतोस ? मग 'हे अनादि विश्वरचना। तें लटिकेंचि काई ?' अर्जुना, तूं ह्यांना मारलें नाहींस म्हणजे हे चिरंजीव कां होणार आहेत ? आणि असें पहा, वरि,तूं ह्यांच्या मरणाची काळजी करतोस तो ह्यांच्या जन्माला काय तूंच कारण झाला आहेस ? मग ह्यांच्या जन्मावर जशी तुझी सत्ता नाहीं तशीच ह्यांच्या मृत्यूवरहि नाहीं ! मग आपलें कर्तव्य करीत असतां कोणी मेलें तर तुला त्याचा शोक कां व्हावा ? तसेंच तूं दुसरी एक खुळी चूक करतो आहेस. ती अशी कीं, आत्म्याचें अमरत्व तूं पार विसरून गेला आहेस ! बरें, " जातस्यहि धृवो मृत्युः " ह्याप्रमाणें पाहिलें तरीहि तुला शोकाला जागा नाहीं. मिळून काय ? कसाही विचार केलास तरी तुला लढाई करायला कोणतीच हरकत नाहीं ! अरे, ह्या जगांतील सर्व व्यवहार व्यवस्थित चालावेत, व आपल्या उदाहरणाकडे डोळे लागून राहिलेल्यांच्यापुढें आपणाला उत्कृष्ट कित्ता ठेवतां यावा, यासाठीं थोर लोकांनीं–तुझ्यासारख्या धीरोदात्त नायकांनीं–प्रयत्न करावयास नको काय ? कारण तुमच्याआमच्यासारख्या श्रेष्ठांचे हातून जसें वर्तन घडेल त्यावरच बहुजनसमाजाचें नियंत्रण अवलंबून आहे. मग काय, आज हातांत बांगड्या भरून तूं सर्व क्षत्रियांस ' असेंच करावें ' असें सांगणार काय ? अरे, आमच्याकडे बघ, जनकादिकांच्या चरित्राकडें नजर फेंक, त्याचें सूक्ष्म अवलोकन कर, म्हणजे तीं मंडळी खरी श्रेष्ठ होतीं–कर्मयोगाची खरी आचरणकर्ती होती–असेंच तुला दिसून येईल. मग काय, त्यांच्या किंवा आमच्या चरित्रांपासून तूं कांहींच बोध घेणार नाहींस काय ? नातवानें आजोबाला शिकवावें, तसा तूंच भलभलत्या गोष्टी करून उलट आम्हालाच ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतोस, तेव्हां आम्ही सर्व मूर्ख म्हणायचें, असेंच ना? तसें नसेल, आणि अर्जुना, माझ्या ठिकाणीं जर तुझी श्रद्धा असेल, तर मी सांगतों तसें बेशक वाग ! त्यानें तुला काडीइतकाहि लेप लागायचा नाहीं याची हमी माझ्याकडे ! अरे, निरहंकार व निष्काम बुद्धीनें, केवळ कर्तव्य म्हणून व फलाशा सोडून केलेल्या कर्मांचा लेप केव्हांहि व कुणालाहि लागणें शक्य नाहीं, हें त्रिकालाबाधित

सत्य तूं नेहेमीं हृदयांत ठेवून दे. अर्जुना! त्यांतून तुम्हांआम्हांसारख्या थोरामोठ्यांवर असलेली जबाबदारी आपण जर न ओळखली तर केवढा अनवस्था प्रसंग माजेल, याची तुला कल्पना तरी आहे काय? माझेंच उदाहरण पहाना. आतां मला म्हणजे कांहीं या जगांत मिळवायचें आहे किंवा प्राप्तव्य आहे असें तर नाहींना? पण असें असूनही, मी क्षणभर तरी स्वस्थ बसलों आहे कां? याचें कारण काय? एकच; कीं, जर मी कांहीं न केलें तर, " उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्। संकरस्यच कर्ता स्याम् उपहन्यामिमाः प्रजाः॥" बाबारे, मीच जर कर्म न करीन, तर माझ्या पावलावर पाऊल ठेवून चालणारे सामान्य जन सुद्धां शुद्ध आळशी बनतील, व त्यानें सर्व जगाचा नाश होण्याची वेळ येईल. असो. तर अर्जुना, सांगायचा भाग इतकाच कीं,हा क्षुद्र दुबळेपणा टाकून देऊन " आतिष्ठोत्तिष्ठ भारत। "–उठ व एकदम लढायला लाग! असें म्हणून भगवंतांनी क्षणैक विसांवा घेतला, व अर्जुनाच्या मनाची कुठवर तयारी झाली आहे, हें ते अजमावून पाहूं लागले. अर्जुन शुद्धीवर येत आहे असें दिसल्यावर देवांस जरा बरें वाटलें, व उपदेशाच्या मात्रेचा शेवटचा वळसा देण्यासाठीं ते पुढें म्हणतात,—" अर्जुना, अशा निष्काम कर्मयोगाच्या आचरणासाठीं, सुखदुःखादि द्वंद्वें सारखींच सहन करण्याची शक्ति यावी म्हणून, मनाची बैठक तयार करण्यास, यौगिक व्यवास्थितपणाहि तुला अंगिकारला पाहिजे; तसेंच आपण करीत असलेलें कर्तव्य म्हणजे परमेश्वराची पूजा आहे–' स्वकर्मणा ' केलेली प्रभूची 'अभ्यर्चना' आहे–व त्यापासून प्राणांतींहि आपण ढळणार नाहीं, असा कृतनिश्चय होण्यास परमेश्वराच्या भक्तींतही मन तितकेंच रंगलें पाहिजे, तरच ' देहीं उदार'त्व प्राप्त होतें; तसेंच आपण करीत असलेल्या कर्तव्यांच्या बरोबर उलगडा पडण्यास ज्ञानाचीहि जरूर आहे–कारण त्यांवाचूनच्या क्रिया ह्या आंधळ्या होत–ह्यासाठीं ज्ञानासही तुला जवळ केलें पाहिजे. पण ह्या सर्वांच्या बैठकीवर व पायावर, शेवटीं तुला कर्मयोगाची इमारत उठवायची आहे, हें तूं विसरूं नकोस. ती अशी झोंकदार व भव्य उभारून दे कीं,सर्व जगानें त्याकडे नुसतें टकमक पहातच रहावें! " असें म्हणून देवांनीं योग, भक्ति, व ज्ञान यांची संपूर्ण माहिती अर्जुनास दिली. नंतर

ते म्हणतात,—"अर्जुना, तूं वरवर जरी नाहीं लढणार म्हणतो आहेस, तरी तुझा मूळचा देहस्वभाव जो आहे—तुझ्या नसांनसांतून जें शुद्ध क्षत्रियाचें रक्त उसळत आहे-तें तुला स्वस्थ बसूं देईल काय? नांव कशाला घेतोस? अरे, तूं जा. पण घटकाभरानें जर तुझा तूंच लढाईला नाहीं परत आलास तर नांव बदलून देईन! समजलास? बाबारे— "प्रकृतिस्त्वां नियोक्षति" ही तुझी प्रकृतीच तुला युद्ध करावयाला भाग पाडील, समजलास? प्रकृतीचा जोर हा असा आहे! त्यांतूनही पहा बोवा!" देव उपदेशाचा उपसंहार करीत म्हणतात,—"तुझा तूं पूर्ण धनी आहेस; तुला वाटेल तसें कर!" असें म्हणून देव थांबले. देवांचा उपदेश अर्जुनाच्या नसांनसांतून भिनला व त्यानें मोह-भुजंगाचें विष पार उतरलें, व त्या तंद्रींत अर्जुन गुंग राहिला, तेव्हां शेवटचें म्हणून देव म्हणाले, "अर्जुना, 'कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा। कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय॥' अर्जुना, मीं काय सांगितलें तें ऐकलेंस ना? आतां तुझा वेडेपणा गेला ना पार सगळा?" अशा भयंकर प्रसंगीं-कीं ज्या वेळीं लढाईस ऐन तोंड लागण्याच्या वेळेस कर्तव्याकर्तव्याचा भयंकर व्यामोह चित्तास जडून सर्वनाश होतो कीं काय, अशी स्थिति येऊन पडली त्यावेळीं-श्रीकृष्ण परमात्मा, तो 'दयाळु गडी' धांवून आला, व त्यानें ह्या विलक्षण प्रसंगांतून आपणास बाहेर काढलें, ह्या विचारानें अर्जुनाच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रू उभे राहिले! "देवा, आपल्या अपरंपार कृपेनें माझा मोह आतां पार नाहींसा झाला असून-'करिष्ये वचनं तव'-आपण सांगाल तें करण्यास आतां माझी तयारी आहे!" दिव्य दृष्टीचें अंजन मिळाल्याबरोबर सर्व जगास कांहीं निराळ्याच दृष्टीनें पहाणारा अर्जुन म्हणाला. क्षणार्धांत अर्जुन लढाईला सिद्ध झाला! त्यानें आपलें 'गांडीव' धनुष्य सरसावलें व तो रथांत सांवरून बसला! असो.

याप्रमाणें व्यामोहाचें अभ्रपटल दूर सरून अर्जुनाचा पराक्रमसूर्य पुन्हां आपल्या प्रखर किरणांनीं तळपण्यास सज्ज झाला. क्लैब्याचें संकट एकदांचें दूर झालें, हें पाहून श्री कृष्णासही आनंद झाला, व दुर्योधनादि

दुष्टांचा भार लवकरच कमी होऊन भूमाता सुखी होणार, या विचारानें त्यांस बरें वाटलें. कारण तेंच त्यांचें ब्रीद असल्यामुळें, त्या कामीं आपणास आपला प्रिय भक्त साहाय होईल—मदत करील, अशी त्यांची अपेक्षा होती, पण मध्येंच ह्या व्यामोहाचें भूत उठलें! पण त्या चतुर पंचाक्षऱ्यानें त्यास गाडून, अर्जुनास त्याच्या झपाट्यांतून मुक्त केलें—' झाड ' सोडून भूत पळालें! तेव्हां साहजिकच देवांस बरें वाटलें!

दोन्ही सैन्यांतले सैनिक, लढाई कधीं एकदां सुरू होते, म्हणून अगदीं उतावीळ झाले होते! व अर्जुनाचा रथ दोन्ही सैन्यांमध्यें येऊन उभा राहिला तरी अद्याप कसें रणशिंग फुंकलें जात नाहीं, याचेंच तें आश्चर्य करीत होते. परंतु इकडे केवढा अनर्थ झाला होता, याची त्या बिचाऱ्यांस काय कल्पना? अर्थात् लढाईला तोंड लागण्याच्या ऐन दंगलींत या व्यामोहावर श्रीकृष्णांनीं जी मात्रा दिली, ती केवळ सूत्रमय—अल्पशी श्लोकमय अशी सुमारें ७० श्लोकांचीच होती असें सांगतात. व तेंच साहजिक दिसतें, कारण ७०० श्लोक म्हणण्याइतका अवधि व स्वस्थता त्यावेळीं होती कुठें? अर्थात् अर्जुनाच्या मूळच्या कुशाग्र बुद्धीवरच्या पटलाचे तुकडे केवळ ७० च घावांत करून श्रीकृष्णास त्यास त्यांतून मोकळें करावें लागलें. अस्तु. पण त्यानंतर मात्र लढाईचें शिंग फुंकलें जाऊन लढाईला खरेंखुरें तोंड लागलें. त्या वेळेस जो भयंकर ध्वनि झाला, व " हाके कांपती लोकालोक " अशी जी स्थिति झाली, त्याचें कुठवर वर्णन करावें? तथापि, त्यांतील ठळक ठळक प्रसंग आपण आतां पुढील भागांत पाहूं या.

पण तत्पूर्वीं आपणास अद्याप कांहीं गोष्टींचा उलगडा करून घेतला पाहिजे. कारण लढाईचें रणशिंग फुंकलें गेलें आहे, व प्रस्तुत नाटकांतील पुढील—पांचव्या अंकाचा—पडदा वरती गेल्याबरोबर आपणास लढाईची दंगल व धुमश्चक्री पहावी लागणार आहे. त्या ' रणचंडीच्या नाचाच्या ' थैमानांत व तिच्या भीषण हातवाऱ्यांत मग आपणास शांतपणें ह्या प्रश्नांचा विचार करावयास सांपडणार नाहीं. असो. त्यापैकीं पहिली गोष्ट आम्हांस ही सांगायची आहे कीं, शिष्टाईचा फोलपणा ठरून ज्या वेळीं श्रीकृष्ण दुर्योधनसभेंतून बाहेर पडले, त्यावेळेस त्यांनीं कर्णाला आपल्या

स्थांत घेऊन, कांहींसें अंतर गेल्यावर, एकांत पाहून, प्रभूंनीं त्याला फित-विण्याचा–मथविण्याचा–प्रयत्न केलेला आहे. त्या प्रसंगीं कर्णानें जें बाणेदार व दिलदार उत्तर दिलें, तें जर एका प्रकारें स्तुत्य ठरतें, तर मग साहजिकच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, श्रीकृष्णप्रभूंनीं तरी मग त्याला असें नीच कर्म–विश्वासघात–वचनभग–कसें करावयास सांगितलें ? वर वर पहातां ह्यांत श्रीकृष्णांकडे दोषच येतो. कुंतीनेंही पुढें त्याला लगेच भागीरथीतीरीं गाठून असाच मथवण्याचा यत्न केलेला आहे, हेंही वाचकांनीं जातां जातां लक्षांत ठेवावें. कमलकुमारीचें पाणिग्रहण करण्यासाठीं म्हणून उदयभानू मागणी घालतो त्या वेळेस 'तो दासी-पुत्र' म्हणून त्याची हेटाळणी करण्यांत येते, व 'कावळ्यानें आपले पंख कितीहि चुन्यांत बुडवलें म्हणून कावळा कांहीं राजहंस होत नाहीं !' अशा तऱ्हेचे नीच उत्तर–तिच्या बापाकडून त्यास मिळतें, पण तेंच पुढें अरवलीच्या डोंगरांत, वरील अपमानानें चिडून जाऊन मुसल-मानांचा सरदार बनलेला उदयभानू ज्या वेळेस स्वपतीच्या शवाबरोबर सती जाणाऱ्या कमलकुमारीची अडवणूक करतो, त्यावेळीं मात्र तिच्या बापाला तो 'खरा क्षत्रिय' दिसत आहे, ह्या चित्रांत जी गंमत आहे तीच कांहीं अंशीं वाचकांस कर्णाच्या बाबतींतही आढळून येणार आहे. वर वर पाहतांना प्रभूच दोषी ठरतात असें जें आम्ही वर म्हणण्याचें धाडस करीत आहोंत तें ह्याचसाठी. कारण 'कर्ण हा खरा सूतपुत्र नसून कुंतीच्या पोटीं सूर्यापासून तिच्या कौमार्यावस्थेंत झालेला बालक आहे, व पंडु हाच त्याचा खरा पिता आहे' ही गोष्ट काय कृष्णांस ह्याच वेळीं ठाऊक झाली ? आणि जर ती पूर्वींही त्यास तितकीच ठाऊक होती, तर द्रौपदीस्वयंवराचें वेळीं, "सूतमहं जातु चेन्न वरयामि !" म्हणून–तिच्या दृष्टीनें योग्यच का होईना पण–कर्णाचा द्रौपदी अधिक्षेप करीत असतां, बिचाऱ्या कर्णास अधोबदन होऊन त्या वेळीं जें खालीं बसावें लागलें, त्या वेळेस नाहीं कुठें श्रीकृष्णाला–त्या ठिकाणीं जातीनें हजर असणाऱ्या प्रभूला–कळवळा आला तो ? त्याच वेळेस जर श्रीकृ-ष्णांनीं उभे राहून "सूतपुत्र" ह्या लोकप्रवादाच्या 'रक्तलांछना'चा टिळा त्याच्या कपाळावरून पुसला असता, तर मग वरील प्रभूच्या 'उपदेशांत'–

' पांडवांच्याकडे येऊन पृथ्वीची राज्यलक्ष्मी भोगण्याच्या ' उपदेशांत– कांहीं तरी अर्थ होता, असें म्हणतां आलें असतें. किंबहुना मग असा उपदेश करण्याचा कदाचित् प्रसंगही पडता ना. मग ह्या प्रभूच्या वागणुकीची सोडवणूक कशी करायची ? कृष्णांच्या वरील कृत्याचा उलगडा काय ? साम दाम, भेद, दंड असे राजनीतीचे चार प्रकार आहेत. तेव्हां दंडापूर्वी जसा प्रभूंनीं पांडवांचा वकील ह्या नात्यानें सामाचा–व दामाचाही म्हणण्यास हरकत नाहीं–प्रयत्न केला- पण तो फसला, हेंही आपण वर पाहिलेंच आहे–तसाच, केवळ कौरववंशाचा निःपात टाळण्यासाठीं, भेदाचाही प्रयत्न करून पाहणें हें त्यांचें–पांडवांचा दूत किंवा वकील–या नात्यानें कर्तव्यच होतें. कर्णावरच दुर्योधनाच्या सर्व–निदान पुष्कळशा– उड्या आहेत, व त्याच्याच भरीनें तो युद्धास सज्ज झाला आहे–(हें आपण मागे पाहिलेंच आहे)–ही गोष्ट कर्ण तर प्रभूस दिलेल्या आपल्या उत्तरांत सांगत आहेच; पण प्रभूसही ती पूर्वींच ठाऊक असावी, व म्हणूनच त्यांनीं हा भेदनीतीचा प्रयत्न–केवळ कौरवकुलसंहार टाळण्यासाठीं– करून पाहिला असला पाहिजे. दुसरेंही एक कारण वरील प्रभूंच्या कृत्याचा उलगडा करण्यास देतां येण्यासारखें आहे. व तें म्हणजे कर्ण हा मोठा सत्यप्रतिज्ञ व सत्यवचनी म्हणून प्रसिद्ध होता; तेव्हां, " तोंवरि तोंवरि डगमगीना कदा " ह्या तुकोबांच्या अभंगांत त्यांनीं, " तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी। सुंदर वनिता दृष्टी पडली नाहीं " याप्रकारें म्हटल्याप्रमाणें, कर्णाच्या वरील गुणाची परीक्षा पाहण्यास प्रत्यक्ष परमात्मा तयार झाले. कर्णाच्या दानव्रतापासून त्यास च्युत करण्यास, अर्थात् पुत्रप्रेमानेंच आलेल्या प्रत्यक्ष आपल्या बापास–सूर्यास–ही ह्याच महाभाग कर्णानें, "पांडवांचे हातून येणाऱ्या मरणाची मी मोठीशी क्षिति बाळगीत नाहीं. पण बाबा, मी माझा नियम–व्रत मोडून " अपकीर्तीचें मरणाहून अधिक " दुःख जोडूं काय ? नका, बाबा, नका; आपण मला असा आग्रह करूं नका!" असें नम्र पण सडेतोड दिलेले उत्तर आपणांस ठाऊकच आहे. प्रभूंनीं घेतलेली कसोटी कदाचित् ह्याहूनही भयंकर–कठीण होती असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण वीरपुरुष मरणाला कस्पटासमान लेखीत असतात; व कर्ण हा खरा वीर होता, हें आपणांस पूर्ण ठाऊक

आहे. इतकेंच नव्हे तर, कनकाची रास आणि सुंदरीचा विलास याला न भुलणारा—कर्तव्यापुढें त्याच्यावर लाथ मारणारा तो गौतमबुद्धाच्या भाषेंतील 'श्रेष्ठ'—मनोजयी वीर होता. रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें, "धन्य कर्णाच्या औदार्याची कीं, एकदां धरलेला पक्ष व पत्करलेलें दुर्योधनाचें मित्रत्व संभाळण्यासाठीं पांडवांचा मुख्य होऊन द्रौपदीची व व राज्याची प्राप्ति होण्याचा मोह त्यानें सर्वथैव जिंकला! अनायासें चाढून आलेलें पंच पक्वान्नांचें ताट दूर सारून मित्रार्थ व स्वव्रतपरिपालनार्थ जाणून बुजून तो काळाच्या स्वाधीन झाला! विश्व काय आहे, परमेश्वर कसा आहे, मी कोण आहे, माझें कर्तव्य काय आहे, या चार प्रश्नांचा आपल्या बुद्धीनें ज्यानें उलगडा केला व आपला वर्तनक्रम ठाम ठरविला, तोच पुरुष वीराच्या पदवीस प्राप्त होतो. त्याची कर्में बरीं आहेत कां वाईट आहेत हें ठरविण्याचें भानगडींत दुसऱ्यानें सहसा पडूं नये हें बरें! "सर्वारंभाहि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः" हा सिद्धान्त लक्षांत ठेवावा, व पंतांनीं कर्णपर्वांत दिलेली, "जातीनें अधम असो, घातकहि असो, असो महाघोर। जो काय कृतप्रज्ञ प्राज्ञमतें पुरुष तो जगीं थोर!" ही थोर मनुष्याची केलेली अत्यंत व्यापक व्याख्या सर्वांनीं लक्षांत ठेवावी."× कर्ण हा औदार्याचा पुतळा होता, व क्षुद्र अंग देशाच्या राज्यदानासाठीं त्यानें आपल्या आमरणांत अखंड मैत्रीचें—म्हणजेच स्वतांच्या पंचप्राणांचें—उदक दुर्योधनाच्या हातावर कसें सोडलें होतें हें आपण मागें पाहिलेंच आहे. याच वचनपालनासाठीं—राज्याचा व सुंदर द्रौपदीचा—'भार्यारूपवती शत्रुः' ह्या म्हणीप्रमाणें, जयद्रथकीचकादि अनेकांनीं अभिलाषिलेल्या द्रौपदीचा—मोह बाजूस सारून व, "यतो धर्मस्ततोजयः"—म्हणजेच आपला मृत्यु—उघड उघड डोळ्यांपुढें दिसत असतां त्यांनींही न गांगरून जातां, तो आपल्या वचनास जागला, तेव्हां त्याची केवढी धन्य म्हणायची? 'कृतप्रज्ञ'त्व हेंच थोरांचें लक्षण, व कृतघ्नपणा हें पंचमहापातकांहूनही अधिक पाप होय अशा अर्थाचीं वचनें आपणास ठाऊकच आहेत. वचन, प्रतिज्ञा, व कर्तव्य ह्या तिहींच्या बैठकीवरच

× "मोरोपंत—चरित्र आणि काव्यविवेचन," पान ३४९—५० पहा.

महाभारताची, किंबहुना आर्यांच्या इतिहासाची इमारत उभारलेली आहे! "आत्माहि उपेक्षावा परि रक्षावाचि बोल संतांनीं" हें वचन कर्णानें ह्या ठिकाणीं सर्वांस उत्तमप्रकारें शिकविलें आहे. या कालोपद्रुत जगतांत पाण्याच्या बुडबुड्यासारख्या क्षणभंगुर देहाच्या लालचीस न भुलतां 'आपला बोल रक्षावा' हाच उदात्त धडा प्रस्तुत कर्णाच्या कृतीवरून सर्वांनीं घेण्यासारखा आहे. किंबहुना, हरिश्चंद्र,भीष्म, इत्यादि महाभागांचीं चरित्रें आपणास हेंच सांगत आहेत. भीष्माचार्यांनीं केलेल्या आजन्म ब्रह्मचर्याच्या प्रतिज्ञेचा उल्लेख वाचकांनीं मागें वाचलाच आहे. ती प्रतिज्ञा जर त्यांनीं मोडली असती तर त्यांचा थोरपणा इतका टिकला असता काय? वचनपालनांतल्या जळजळीत थोरपणाची किंमत क्षुद्र स्वार्थासाठीं कोर्टांत लटपटपंची करणाऱ्या विसाव्या शतकांतल्या नैतिक दृष्ट्या अधःपतित सामान्य जनांला काय कळणार? भीष्मांच्या लग्न न करण्यानें 'पुष्कळांचें पुष्कळ हित' तें काय नाहींसें झालें कोणास ठाऊक? पंडु राजानें चांगल्या प्रकारें राज्यकारभार करून तो यथाकाळ शापाप्रमाणें मृत्युलोक सोडून गेला यांत बिघडलें कोठें? बरें, आंधळी व पंडु प्रजा होणार ह्याचें भीष्माना काय आधीं स्वप्न पडलें होतें? ह्या गोष्टी दैवाधीन आहेत; व स्वताच्या वचनाला धक्का लागू न देतां त्यांनीं त्यावेळच्या सामान्य समजुतीप्रमाणें त्यांतून योग्य मार्ग काढला यांत त्यांच चुकलें काठें? धृतराष्ट्र इतका लोभिष्ट व त्याचीं मुलें इतकीं दुष्ट निघालीं, यांत तरी त्यांचा काय दोष? प्रत्यक्ष सद्‌गुणी बापाचीं सुद्धां दुर्गुणी मुलें निघालेलीं आपणांस काय थोडीं माहीत आहेत? आणि व्यासांच्या पावित्र्याहून भीष्मांचें पावित्र्य काय अधिक होतें? भगवंतांनीं प्रतिज्ञा मोडल्याचा मुद्दाही असाच हास्यास्पद आहे. "ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दररक्तचक्षुच्या पातें" त्या भगवंताला अर्जुनावरील संकट टाळायला काय स्वतांची प्रतिज्ञाच मोडावयाला हवी होती? तर असें नव्हे; भगवंताला स्वतःपेक्षांही स्वतांचे भक्त अधिक प्रिय असतात, व त्यांची कीर्ति ऐकून—'बापसें बेटा सवाई' निघालेला पाहून बापास, किंवा 'शिष्यादिच्छेत् पराजयं' यानें जसा गुरूस, आनंद होतो तशींच भक्तांची कीर्ति आपणांहूनही अधिक झालेली पाहून प्रभूला प्रेमाचें भरतें येतें. भीष्म हे अर्जुनाहूनही कांकणभर

जास्तच कृष्णभक्त होतें हें लक्षांत घेतलें पाहिजे. प्रभूला स्वतांचा अभिमान काडीइतकाही नसून भक्तांचा आहे. किंबहुना, एका अर्थानें, त्यास वेगळें आस्तित्वाहि नसून तो भक्तांत पूर्ण लपलेला आहे व तेथेंच त्यास ' गिवसावें ' लागतें ! अर्थात् पाण्याला जसा आकार नसून घालाल त्या भांड्याचा आकार तें धारण करतें, तीच ईश्वराची गोष्ट आहे. तेव्हां देवांनीं वरीलसारख्या प्रसंगीं आपली प्रतिज्ञा मोडली म्हणण्यापेक्षां आपल्या भक्ताची प्रतिज्ञा–भीष्मप्रतिज्ञा–खरी केली, व हातांत रथ-चक्र घेतले असेंच म्हणणें जास्त सयुक्तिक होणार नाहीं काय ? मग देवाचा दृष्टांत देण्यांत अर्थ तो काय राहिला ? अस्तु. थोडक्यांत म्हणजे 'भीष्माची भयंकर भूल' लिहिणारांचेंच या कामीं ' भान हरपलें ' आहे व त्यांनीं केवळ ' वडाची साल पिंपळाला ' लावण्याचा यत्न केला आहे, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें ! अस्तु.

पण याच भीष्मांच्या बाबतींत–" अर्थस्य पुरुषोदासः " ह्या वचनाची थोडीशी छाननी केली पाहिजे. ते जर "भीष्म आजोबा" होते तर त्यांना दुर्योधनादिकांचे ' सेवक ' कसें म्हणता येतें हेंच आम्हास समजत नाहीं. घरांतल्या आजोबांनीं म्हातारपणीं बसून खाऊन आपल्या नातवंडा–पत-वंडांस ' युक्तीच्या चार गोष्टी ' सांगितल्या व सल्ला मसलत दिली, तर ते काय त्यांचे ' सेवक ' झाले ? पण घटकाभर वादाकरतां आपण रा. द. गो. लिमयांप्रमाणें+ त्यांस सेवक व मंत्री धरूं या. तसेंच 'तें राजा दुर्योधनाची प्रजा होते'–हेंही एका दृष्टीनें खरें आहे. पण ते कौरवांच्या बाजूनें खरोखरी किती लढले हा प्रश्न घटका-भर बाजूस ठेवून, पूर्ण लढले असें धरून, ते तसे लढले हें बरोबर होतें काय याचा आतां आपण विचार करूं. वास्तविक देहानें जरी ते दुर्योधनाच्या ' अर्थाचे दास ' असले, तरी मनानें ते 'पांडवपक्षीच' होते, हेंही इथें जातां जातां लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'अर्थस्य पुरुषो दासः' ह्या त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें शरीर दुर्योधनाच्या अन्नावर वाढलें, तेव्हां त्याचा व्यय त्याच्याचसाठीं करावा व त्यांनीं 'निमक' हराम होऊं नये हेंही

---

+ " भारतीय युद्ध " पान १६२–६३ पहा.

ठीकच आहे. पण प्रश्न असा कीं, ते देहानेंही प्रथमपासूनच पांडवपक्षी कां राहिले नाहींत ? प्रजाजन ह्या नात्यानेंहि, इतर कित्येक प्रजाजनांनीं दुष्ट दुर्योधनाचें मुखावलोकनहि नको म्हणून त्याशीं सडेतोड असहकारिता करून ते जसे वनवासास गेलेल्या धर्माचे मागें गेले तसे भीष्म कां गेले नाहींत? किंबहुना, त्याच्याहि आधी इंद्रप्रस्थास वेगळी गादी स्थापली गेली तेव्हांच ते सत्पक्षीय पांडवांकडे कां जाऊन राहिले नाहींत ?× बरें दुर्योधनासारख्या अधार्मिक राजाची नोकरी जरी त्यांनीं इतके दिवस केली—व मंत्रीपद व सेवकपद जोंवर चालवायचें तोंवर त्यांस त्याच्या—दुर्योधनाच्या बाजूनें लढणेंहि योग्य होतें—तरी पण प्रश्न असा कीं, अशा राजाच्या नोकरीचा त्यांनीं शेवटीं राजिनामा कां दिला नाहीं ? कीं असा राजीनामा देऊनही इतक्या दिवस खालेल्या निमकास त्यास जागावेंच लागलें असतें ? सध्याच्या कल्पनेप्रमाणें पहातांना तरी निदान त्यानीं—अगदीं कमींत कमी बोलायचें तर—अशा राजाच्या नोकरीचा राजिनामा देऊन त्याच्याशीं त्यानीं पूर्ण असहकारिता करावयास पाहिजे होती—त्यांत कांहींच पाप नव्हतें; उलट सत्पक्षास प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष साहाय्य केल्याचें, निदान असत्पक्षाचा त्याग केल्याचें, पुण्यच होतें.

जी गोष्ट भीष्मांस तीच गोष्ट थोड्या बहुत अंशानें द्रोण व कृपाचार्य यांस लागू समजावी. परंतु आमच्या भीष्म, द्रोण, कृप, कर्ण ह्यांची नीति कांहीं मुलखावेगळीच ! "तुका म्हणे सत्य कर्मा व्हांवे साह्य । असत्यासी भय नरका जाणे" असें तुकोबा कंठरवानें सांगत असतां असत्पक्षास—मूळापासूनच असणाऱ्या असत्पक्षास—असत्यास साह्य करण्याचें पाप ह्यानीं केलें नाहीं काय ? "धर्मराजाच राजा होण्यास सर्वथैव योग्य आहे" म्हणणारा कर्ण दुर्योधनासाठीं आमरणांत झगडतो याचा अर्थ काय? पण त्याच्या बाबतींत एक वचनाची तरी सबब होती. आणि सर्व कौरवांचा नाश होऊन पांडव विजयी होणार ही गोष्ट त्यास उघड उघड दिसत असतांना केवळ त्या वचनासाठींच बिचारा काळाच्या तोंडीं पडला ! पण शेवटीं असत्पक्षास प्रथमपासूनच्या साह्याचें पाप

× यावर रा. लिमयांच्याजवळ उत्तर नाहीं हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें!

त्याच्या माथीं बसतेंच आहे. वचनभंग हा 'अधर्म' झाला असता ही गोष्ट खरी आहे. पण त्याजबरोबर तो जर पांडवास मिळता तर सत्पक्षाचें साहाय्य केल्याचें पुण्य व प्रत्यक्ष परमात्मा भगवान् यांचीही अर्थात् त्यामुळें कृपा त्यास लाभली नसती काय ? व असा जर 'देव जोडला' जात होता तर 'अधर्म' सुद्धां करण्यास काय हरकत होती ? कारण "देव जोडे तरी करावा अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ॥ प्रल्हादें जनक, बिभीषणें बंधु । वंद्या माता निंद्यू भरतें केली" इत्यादि प्रकारें तुकोबा सांगत आहेत, त्यांत कांहींच अर्थ नाहीं काय ? कर्तव्याची मिजास कुठवर ? ज्या कर्तव्याच्या पालनानें परमेश्वर दुरावतो, तें कर्तव्य करण्यापेक्षां न केलेलेंच बरें नव्हे काय ? वडिलांची आज्ञा मानणें, थोरल्या भावाची इच्छा पुरवून त्यास साह्य करणें, व जन्मदात्या आईस परमपूज्य मानणें हीं पुत्र, बंधु, व मुलगा ह्यांचीं 'कर्तव्यें'च नव्हतीं काय ? त्याचप्रमाणें स्वकर्तव्याच्या जाणिवेची तीव्र जळजळीत भावना त्यांच्याही—प्रल्हाद, बिभीषण, भरताच्याहि—हृदयांत काय कमी होती ? मग अशा कर्तव्यासहि बाजूस सारून, त्या कामीं 'अधर्म' करून सुद्धां, त्यांनीं 'देव जोडला' ते काय मूर्ख म्हणून ? स्वपतींची आज्ञा अमान्य करून देव जोडणाऱ्या गोपींना आमचे भीष्म, द्रोण, कृप, कर्णादि ऐहिक कर्तव्याच्या मोहांतच गुरफटलेली मंडळी मूर्खांतच काढतील. पण मूर्ख कोण ह्याचा उलगडा देवांजवळ झालाच आहे, व त्याचें उत्तर प्रभूंनीं कर्णास झणझणीतपणें दिलेलें आपणास पुढें लवकरच वाचावयास मिळणार आहे. थोडक्यांत म्हणजे वरीलसारख्या मंडळींचा,—व दुर्योधन दुःशासनादिकांचा तर हमखासच—निश्चयीपणा, करारीपणा, बाणेदारपणा व चिकाटी 'हीं तामसी होतीं, म्हणूनच केव्हांही त्याज्यच ठरतात. द्रौपदीचें वस्त्र फेडण्याच्या व तिला सभेंत आणून उघडी करण्याच्या कामीं दुर्योधनदुःशासनादि दुष्टानीं दाखवलेल्या 'चिकाटी'चीच स्तुति करावयाची असेल तर मग आमचें कांहींच म्हणणें नाहीं. पण अशा दुष्टांच्या चिकाटीची स्तुति करण्याचा रा. पांगारकरांचा झोंक

दिसतो,× व युद्धप्रसंगीं पांडवांनीं व कृष्णांनीं अवलंबिलेल्या कपटनीतीवर उसळून, "पांडवांच्या अंगीं दोष नव्हते असेंहि नाहीं, त्यांची नीति सरळ व अकपट नव्हती " असें ते म्हणतात.× कौरवपक्षाकडच्या 'मुळापासूनच खोट्या' असूनहि 'जास्त सरळपणा' चें कोडकौतुक त्यांना काय वाटत असेल तें वाटो !+ पण आम्हास तर वाटतें कीं, ह्यांत वरील पांडवकृष्णादि मंडळींची कांहींच चूक झालेली नाहीं. उलट "घटासि आणावा घट। उद्धटासि पाहिजे उद्धट। खटनटासि खटनट। अवश्य करीं" ह्या समर्थोक्तीप्रमाणेंच त्यांचीही नीति होती. 'शठंप्रति सत्यं' करून भागत नसेल तर शाठ्यं व लाठ्यंच केलें पाहिजे अशा मताची ही मंडळी होती. अवघ्या पांच गांवांवर संतुष्ट राहाणाऱ्या धर्माचा निरोप व सामासाठीं आलेल्या भगवंतासही ज्यांनीं साफ उडवून लावलें त्या नीचांची व त्यांच्या सरळ (!) नीतिमत्तेची स्तुति करायची असेल तर ती रा.पांगारकरांनीं खुशाल करावी. केवळ 'धर्मयुद्ध' ह्या दृष्टीनेंच म्हणणें असेल तर द्रोणादिकांचा, किंबहुना सर्व कौरवपक्षीय थोर वीरांचा बळी, पांडवांनीं प्रत्यक्ष बगवंतांच्या अनुमतीनें कपटानेंच घेतला आहे, व 'कपटास कपट व शठास शाठ्य' हीच भगवंतांची नीति आहे—"ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं " असें त्यांचें सांगणें आहे. धर्माच्या आणि नीतीच्या गप्पा कर्णासारख्या दुष्टांना रणांगणावर सुचतात, आणि आधीं हजारों पापांची व कपटांची रास रचली व घडा भरून ठेवला त्या वेळेस ह्या धर्माची त्यांना आठवण तरी झाली होती काय ? बुद्ध, एकनाथ, खिस्त इत्यादिकांच्या मताप्रमाणें पाहिल्यास पांडवांनीं शेवटपर्यंत एका थोबाडींत मारली तर दुसरा गाल पुढें करून शठाशीं सत्यानें—कपटानें नव्हे—वागावयास पाहिजे होतें. पण 'दुष्टांचें निर्दालन हीच जशी त्यांच्यावर कृपा' त्याचप्रमाणें 'शठास शाठ्य व कपटास कपट' हीच खरी भगवंतांची व त्यांच्या पांडवांसारख्या भक्तांची नीति होय ! सुईच्या अग्रावर मावण्यइतकीहि माती न देऊं इच्छिणाऱ्या सैतानास—( शक्य तर सरळ नाहीं तर कपटानें सुद्धां )

---

× " मोरोपंत—चरित्र आणि काव्यविवेचन " पान ३४९ पहा.
+ " मोरोपंत—च. आ. का. " पा. ३४९—५० पहा.

भातींतच गाडावयास पाहिजे होता, व तो तसा गाडला गेलाही. ज्यांचा वध पांडवांनीं कपटानें केला ती मंडळी एरवी सरळ धर्म–युद्ध–मार्गांनीं अजेय होतीं, हेंही त्याजबरोबर लक्षांत ठेवलें पाहिजे. पण अजेय, बलाढ्य व महान् पराक्रमी झालें म्हणून काय झाले ? वरील गुणांचा उपयोग सत्पक्षकडेच त्यांनीं करावयास पाहिजे होता; पण तसें न करतां धर्माधर्म कळत असूनही, कांहीं तरी तिरशिंगरावासारखी तृतीय पंथी नीति स्वीकारून, ते जर असत्पक्षाच्या बाजूनें लढाईला उभे ठाकले, तर त्यांस सरळपणें नाहीं जमल्यास कपटानेंही–केवळ सत्पक्षाचा विजय व्हावा म्हणून–मारणें योग्यच नव्हतें काय ? असो. चला वाचक, रणशिंग फुंकलें जाऊन बराच वेळ झाला ! तिकडे लढाईची एकच दंगल माजली असेल. तर चला आतां तिकडेच जाऊं व 'रणचंडीचा भीषण नाच' पाहून 'युद्धस्य वार्ता रम्या' ऐकूं या.



# भाग ५ वा.




रुक्षेत्राच्या मैदानावर–पानपतच्या पटांगणावर कौरवांचें ११ अक्षौहिणी सैन्य हस्तिनापुराहून येऊन डेरे देऊन पडलें होतें. द्रौपदी व इतर राजस्त्रियांस बंदोबस्तानें उपप्लव्य नगरांत ठेवून पांडवही आपल्या ७ अक्षौहिणी सैन्यासह त्याच मैदानावर पूर्वाभिमुख येऊन पोंचले होते. व दोन्ही छावणींतून हत्तींच्या गर्जना, घोड्यांचें खिंकाळणें, योद्धयांचे सिंहनाद व धनुष्याचे टणत्कार, व शंख, भेरी, नगारे यांचा गंभीर ध्वनि सुरू होता! द्रुपद, विराट, सात्यकी, धृष्टद्युम्न, शिखंडी, चेकितान, व भीम या सातांनीं सात अक्षौहिणी संभाळल्या असून, धृष्टद्युम्न हा पांडवांचा मुख्य सेनापति झाला होता. शल्य, शकुनि, जयद्रथ, कृतवर्मा वगैरे दहाजणानीं कौरवांचेही दहा अक्षौहिणी सैन्य आपल्या हुकमतीखालीं घेऊन त्या सर्वांच्या डोक्यावर घमेंडखोर कर्णास बाजूस सारून, पांढरें चिलखत व पांढरा फेटा बांधलेले, व पांढरे केस झालेले पण तरुण वीरासही मागें टाकणारे, भिष्माचार्य मुख्य सेनापति म्हणून प्रथमारंभीं विराजमान झाले! वास्तविक, " अर्जुनसम वीर नसे मागें, आतां, पुढें न व्हायाचा " व "होऊनि वज्रपंजर रक्षितसे वासुदेव कीरा या " याप्रमाणें दुर्योधनास त्यांनीं बहुत सांगून पाहिलें; व पांडवांवर मनांतून आमचें प्रेम आहे, असेंही त्यांनीं व द्रोणांनींही दुर्योधनास सांगण्यास कमी केलें नाहीं. किंबहुना, " स्वहित पुसतील पांडव, तरि सांगुनि संकटांत तारीन " अशी त्यांनीं स्पष्ट प्रतिज्ञाही केली. पण तरीहि खुळा दुर्योधन उमगला नाहीं, व ' शरणागता न सांडावें ' म्हणून त्यानें त्यांचे पाय धरले. तेव्हां भीष्मांचा नाइलाज झाला. अन्नाचें व द्रव्याचें मिंधेपण मोठें कठीण आहे. व इतके दिवस दुर्योधनाच्या खाल्लेल्या अन्नाची स्मृति जागृत झाली–आड आली

–पुढें उभी राहिली! व भीष्माचार्य लढाईस तयार झाले! भीष्म, द्रोण, कृपादि सज्जनांच्या पायांवर मस्तक ठेवून प्रथमारंभींच धर्मादिकांनीं त्यांचा शुभाशीर्वाद मागितला. त्यावेळेस त्या सज्जनांना किती प्रेमाचें भरतें आलें असेल, व त्यांचे डोळे अश्रूनीं कसें डबडबले असतील, व केवळ द्रव्याच्या मिंधेपणामुळें आपणास अशा सुलक्षणी पांडवांबरोबर लढावें लागणार, याचें त्यास किती वाईट वाटलें असेल, याची कल्पना सामान्य जनास कोठून येणार? दुष्टवार्ताश्रवणानें निःशस्त्रावस्थेतलें आपलें मरण द्रोणांनीं जाहीर केलें. भीष्मांनीं सामान्य मार्ग सांगितलाच, पण नक्की उपाय पुढें सांगण्याचें अश्वासन देऊन पांडवास प्रेमानें निरोप दिला, व अमावास्येच्या दिवशीं दुपारीं, तीन प्रहराच्या सुमारास, दोन्ही सैन्यें एकमेकास भिडलीं! भीष्मार्जुन, भीयमदुर्योधन, सात्यकी-कृतवर्मा, व युधिष्ठिरशल्य, अशा जोड्यांचीं द्वंदयुद्धें सुरू झालीं. रणदेवतेला पहिला बळी शल्यानें विराटपुत्र उत्तराचा—त्या बालिश व भ्याड पोराचा–देऊन तिला संतुष्ट केलें! त्याबरोबर त्याचा कैवार घेऊन चालून आलेल्या त्याच्या भावानें–श्वेतानें शल्याला रथांत मूर्छित पाडला असतां भीष्मांस त्याशीं झुंजावें लागलें. आपल्या ब्रह्मास्त्रयुक्त बाणानें भीष्मांनीं शेवटीं त्यास यमसदनीं पाठविलें. कौरवांनीं आनंदाचा जयघोष केला! इतक्यांत संध्याकाळ झाल्यामुळें युद्ध थांबलें.

पहिले दहा दिवस भीष्माचार्यांच्या सेनापतित्वाचे होते, व हातांत शस्त्र असल्यावर तो म्हातारा काळालाहि भारी होता, हें लक्षांत ठेवलें असतां त्यांनीं त्या दहा दिवसांत कशी दंगल माजवून सोडली असेल, व त्यांच्या असह्य माऱ्यापुढें पांडवपक्षीय वीरांना पळतां भुई कशी थोडी होत असेल, याची चांगलीच कल्पना येणार आहे. कृतांतकाळ भीष्मांच्या दणक्यानें दहा दिवस पृथ्वी नुसती दणाणून गेली! " युद्धें जिकडें तिकडे शोणितगंधें समस्त भट भुलले " अशी त्यांनीं स्थिति करून सोडली. दुसऱ्या दिवशीं अर्थात् प्रथमारंभींच्या तडाख्यालाच त्यांनीं शत्रुपक्षास जर्जर करून पळावयास लावल्यामुळें कृष्णांनीं अर्जुनाचा रथ त्यांच्या रथांशीं भिडवला. व वृद्ध–तरुण वीरांचें युद्ध जुंपलें. पण इकडे भीमांनीं कलिंगाधीपतीस ठार करून त्याच्या सैन्याचा आपल्या गदेनें फडशा

पाडण्याचा तडाखा लावल्यामुळें, भीष्म भीमाकडे वळले, व दुर्योधनादि मंडळी तिकडे एकट्या अभिमन्यूवर घसरूं पहात होती, त्याच्या मदतीस अर्जुन गेला. भीमानें भीष्मांचा सारथी ठार मारल्यामुळें उधळलेल्या घोड्यांनीं भीष्मांना दूर नेलें, व अर्जुनाच्या बाणांच्या माऱ्याखालीं तिकडे कौरवांचेंही सैन्य दशदिशां पळू लागलें. इतक्यांत संध्याकाळ होऊन लढाई थांबली.

वरील दोन दिवसांचा भीष्मांचा दणका कांहीं कमी नव्हता. असें सांगतात कीं, दुर्योधनास त्यांनीं सांगितल्याप्रमाणें, रोज दहा हजार सैनिक मारून नंतर ते शस्त्र खालीं ठेवीत असत. पण हे दहा हजार इतर फालतु सैनिक होत. खुद्द अर्जुनाशीं दोन्ही दिवस त्यांची लढाई जुंपली असून त्यांनीं त्यास किंवा इतर पांडवांस हातही लावला नव्हता. कारण शरीर दुर्योधनाकडे असलें तरी त्यांचें मन होतें पांडवांकडे, हें आपणास माहीतच आहे–( व खुद्द त्यांनींही युद्धारंभींच–किंबहुना तत्पूर्वींच–दुर्योधनास तसें सांगितलेलें आहे. )–तेव्हां अशा स्थितीत–दुर्योधनाच्या दृष्टीनें किंवा बाजूनें बोलायचें तर–अशा मनाच्या फितुर स्थितींत–व शरीर-मनाच्या फारकतीच्या अवस्थेंत त्यांच्या हातून खऱ्या कट्या शत्रुभावयुक्त–सेनापतीचें काम कसें व्हावें? म्हणून दुसऱ्या दिवशीं रात्रीं आचार्यांच्या शिबिरांत जाऊन दुर्योधन केंविलवाण्या स्वरानें म्हणाला, "जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें। पायें अनन्य लोटुनि, लावावें काय अन्य थानांतें ?॥" तेव्हां भीष्मानीं 'उद्यां श्रीकृष्णांची प्रतिज्ञा त्यांस मोडावयास लावण्यासारखा घनघोर संग्राम करण्याचें' त्यास आश्वासन देऊन, "उद्यां कृष्णाला हातांत शस्त्र धरायला लावीन "तरिच मी भागवत रे" अशी मनांतल्या मनांत त्यांनीं घोर प्रतिज्ञा केली.

याच सुमारास अर्जुनासही गर्व झाला होता कीं, "माझ्यासारखा योद्धा कोणीही नाहीं !" गर्वाचें घर नेहमीं खालींच होत असतें–अथवा देव तें खालींच करीत असतो. मग तो गर्व प्रत्यक्ष लाडक्या भक्तानें कां केलेला असेना ! देवास तो तिळमात्र खपत नाहीं. शंकर, लक्ष्मी, यांच्यासारख्यांचा गर्व जिथें चालला नाहीं तिथें, "येर प्राकृतें हेंदरे" यांच्या गर्वाची "हुटहुटी" काय चालणार ? ज्या लाडक्या

भक्ताच्या रक्षणासाठीं देवांनीं प्रत्यक्ष चक्र हातांत घेऊन ते भीष्मावर पुढें धावून गेलेले आपणास दिसणार आहेत त्याच देवांला अशा लाडक्या अर्जुनाचाहि गर्व क्षणभर सुद्धां सहन झाला नाहीं, व तो हरण करण्याची त्यानीं एक छान युक्ति योजली. त्या युक्तीनें एका भक्ताचा–अर्जुनाचा–गर्व हरण करणें व दुसऱ्या भक्ताची–भीष्माचार्यांची प्रतिज्ञा पुरी करणें असें दुहेरी काम देवांना साधावयाचें होतें. यासाठीं दुसरे–( म्ह. लढाईच्या तिसऱ्या ) दिवशीं, भीष्माच्यार्यांशीं लढाईला जाण्यासाठी रथ वगैरे सज्ज करून व जामानिमाकरून अर्जुन निघाला असतां, रथोपस्थावर बसलेले भगवान्, रथ हांकतां हाकतां जणुं काय भावी गोष्टींचें दर्शकच असें अर्जुनास म्हणतात, "अर्जुना, आज कांहीं बुवा चिन्ह ठीक दिसत नाहीं !" असें म्हणून, "जातीं शिवा अशिव हें अति सव्य साची" इत्यादि रीतीनें त्यांनीं त्या वाईट चिन्हांचें वर्णन केलें. त्यावर गर्वानें फुगलेल्या अर्जुनानें असेंच ताठ्यांत उत्तर देऊन कृष्णांचें बोलणें मोडून काढलें. "देवा, 'म्यां काळखंज वधिले अतुल प्रतापी' तें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? तुम्ही असे भितां कां ? माझ्यासारखा योद्धा आज आहे कोण ? अशा एक सोडून छप्पन कोल्ह्या आडव्या गेल्या म्हणून त्यानें माझें कोण काय वांकडें करणार आहे ?" 'ग' च्या कैफींत अर्जुन बोलत होता ! देव मनांतल्या मनांत हंसून म्हणतात, "असें काय बच्चंजी ! बरें आहे, दिसेलच आतां !" अर्जुनाचा रथ समरांगणावर जाऊन उभा राहिला ! भीष्माचार्यांनीं घोर रणकंदन माजविल्यामुळें पांडवपक्षीय वीरांचा त्यांच्यापुढें बिलकुल टिकाव लागत नव्हता ! "जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महाजवन तो बा । बहु हाय हाय म्हणती प्राकृत, बुध हंतहा ! यवन तोबा॥" असें पंतांनीं त्याचें वर्णन केलें आहे. त्यासरशी अर्जुनानेंही आपला रथ कौरव सैन्यावर घालून निकराचा हल्ला केला, व बाणांच्या अमोघवृष्टीनें शत्रूचा फडशा पाडला. याप्रमाणें विजयश्री, हिंदोळ्यावर बसलेल्या एकाद्या रम्य बालेप्रमाणें, एकदां इकडे तर एकदां तिकडे अशी हेलावूं लागली ! पण अशा संकुलयुद्धांत अर्थ नाहीं असें पाहून, श्रीकृष्णांनीं अर्जुनाचा रथ भीष्मांच्या रथाशीं भिडवला. त्यावेळेस जो तुंबळ रणसंग्राम झाला, त्याचें वर्णन करणेंहि कठिण आहे. "स्वयें गतवयस्क मी सरस वीर तूं रे नवा । भिडे रणधुरं-

धरा जय घडो सुखें वा न वा ॥ " असें म्हणून म्हाताऱ्या भीष्मानें जो कहर उसळून दिला तो कांहीं विलक्षणच! बाणांचा सारखा पाऊस पाडून त्याच्या माऱ्याखालीं अर्जुनाला नुसता त्यानीं बेजार केला ! त्याला दम घ्यायला सुद्धां फुरसत दिली नाहीं. अर्जुन एवढा धनुर्धारी वीर खरा ! पण भीष्मांच्या पुढें तो केवळ बच्चा होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां, " पुष्पवर्ण नटला पळसाचा । पार्थ सावध नसे पळ साचा ॥ " अशी स्थिति व्हावी ह्यांत आश्चर्य तें काय ? हळु हळु भीष्मांच्या भयंकर माऱ्याखालीं अर्जुनाची शुद्धि हरपूं लागली, तों तों इकडे श्रीकृष्णांच्या हृदयाची घालमेल काय विचारतां? भीष्मांच्या प्रत्येक प्रखर बाणप्रहारानें व्याकुळ होणाऱ्या अर्जुनाची ती दशा पाहून, व स्वतावरही भीष्म बाण मारीत आहेत असें पाहून, श्रीकृष्णांचा भीष्मावरील राग वाढूं लागला. " जों जों हाणी खर शर तो रिपुयवसदव तारको पाया । तों तों लागे हळुहळु कमलाधव सदवतार कोपाया॥" असें पंतानींही त्याचें वर्णन केलें आहे. शवटीं भीष्मांच्या एका सणसणीत बाणानें अर्जुन खरोखरच रथांत निश्चेष्ट होऊन पडला ! त्यावेळेस श्रीकृष्णांच्या रागाला काय विचारता ? आपल्या बालकाला दुखवणाऱ्या व्यक्तीवर सामान्य माउली सुद्धां कशी तुटून पडते याचे प्रत्यंतर सबंध जीवकोटींत आपणांस पहावयास सांपडतेंच. तीच गोष्ट भक्तभगवंतांची आहे. रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें, " श्रीकृष्ण आपल्या भक्तांची माउली आहे. 'भक्ता राखे पायांपाशीं । दुर्जनासी संहारी' हाच त्याचा अनेक युगांचा धंदा आहे!"× आपल्या अनन्य भक्तांना आपल्या प्रेमाच्या पंखाखालीं घालून दुर्जनांचा संहार करणारी ती माउली आहे. भीष्माचार्य इतर रीतीनें व जात्या कितीही सज्जन असले, तरी ते दुष्ट दुर्योधनाच्या बाजूनें लढत होते म्हणून—त्या वेळेपुरतें तरी 'दुर्जन'च बनले होते असें रा. पांगारकरांच्या शब्दांवरूनीह म्हणावयास हरकत नाहीं, अर्थात् भीष्मांच्या दुर्योधनपक्षांकडून लढण्यासंबंधीं आम्हीं वर जी नापसंती दर्शविली आहे ती यावरून किती बरोबर आहे हें वाचकांसही सहज जातां जातां येथें कळून येणार आहे. असो. "सुमधु—हराउपरि जेंवि सर घाली"

× " मोरोपंत—चरित्र आणि काव्यविवेचन " पान ३३६.

असें कोपून त्या माउलीनें, "प्रतोद मग ठेविला, उतरला रथाधःस्थळीं" व ताबडतोब हातांत चक्र घेऊन स्वारी भीष्मांवर धांवून गेली ! अहाहा ! कोण तो प्रसंग ! भक्तत्राण व भक्तप्रतिज्ञापूर्ति करण्यासाठीं प्रत्यक्ष परमात्मा एका भक्ताचे अंगावर धांवून जात आहे ! " असा येतां देखे रथनिकट तो श्यामल हरी । नृपा ! गांगेयाच्या हृदयिं भरल्या प्रेमलहरी ॥ शरांतें चापातें त्यजुनि वदला गद्गदरवें । जगन्नाथें केलें मज सकल लोकांत बरवें ॥ " असें वामनपंडितांनींही त्याचें प्रेमळ वर्णन केलें आहे ! आपली प्रतिज्ञा पुरी झाली हें पाहून भीष्माचार्यांस किती आनंद झाला असेल, व श्रीकृष्णप्रेमानें त्यांचा कंठ किती गहिंवरला असेल, याची कल्पना त्यांच्यासारख्या वीरभक्तास किंवा भक्तवीरासच येणार आहे ! " ये रथावरि क्षणीं यदुराया । खड्ग देइन विकोश कराया ॥ " भीष्म डबडबलेल्या नेत्रांनीं अश्रू गाळीत बोलत होते, कंठ सद्गदित झाला होता ! " देवा, माझी प्रतिज्ञा पुरी करण्यासाठीं शेवटीं तुम्ही शस्त्र घेऊन माझ्यावर धांवलांत ना ? अहाहा ! आज मी धन्य झालों ! या, देवा, या ! हें माझें शस्त्र घ्या, व–" तोडि मस्तक पडो चरणीं या । धन्य होइन तदाचरणीं या ! " यावांचून देवा, माझी तरी दुसरी काय इच्छा असणार ? प्रत्यक्ष भगवान् माझा आज वध करणार याहून माझें भाग्य तें काय ? " स्वतांची प्रतिज्ञा मोडून सुद्धां भक्तांची प्रतिज्ञा पुरी करणाऱ्या परमात्म्याची भक्तवत्सलता व भक्तप्रेम यानें फारच उत्कट रीतीनें दिसून येतें ! असो. पण इतक्यांत तिकडे रथामध्यें अर्जुन सावध झाला, व पाहतो तों केवळ आपणासाठी आपली प्रतिज्ञा मोडून भगवान् चक्र घेऊन भीष्मांवर धांवून जात आहेत ! अर्जुन लज्जित झाला व गहिंवरला. ताबडतोब कृष्णांच्या पाठोपाठ धांवत जाऊन त्यांच्या पायांस मिठी घालून, त्यानें त्यांस माघारे परतविलें ! वरील गोष्ट इथें इतक्या सविस्तरपणें देण्याचें कारण इतकेंच कीं, भीष्माचार्यांची प्रतिज्ञा किती जाज्वल्य असते याचें अजून एक प्रत्यंतर वाचकांस पटावें. कारण अजून एक त्यांनीं प्रतिज्ञा केली आहे, ती ओघाओघानें वाचकांस लवकरच कळणारच आहे. इथें एवढें मात्र सांगतों कीं, त्या त्यांच्या शेवटच्या प्रतिज्ञेनें पांडवांच्या हृदयानें–काळजानें–कांहीं काळ ठावच सोडला होता ! असो.

पुढील पांच दिवसांचा सारांश पुढीलप्रमाणें आहेः—चौथ्या दिवशीं भीष्मार्जुन, सात्यकीभूरिश्रवा, व भीमदुर्योधन यांचीं द्वंदयुद्धें झालीं. धृष्टद्युम्नानें 'सांयमनि' राजाचा पुत्र गदेनें ठार केला. नंतर संध्याकाळपावेतों भीमानें खूपच पराक्रम करून शत्रूचें हजारों सैन्य मारिलें! पांचव्या दिवशीं युद्धाची एकच गर्दी होऊन, संकुल युद्ध माजलें. त्यांत भूरिश्रव्यानें सात्यकीच्या दहाहि पोरांची डोकीं आपल्या बाणांनीं उडविलीं. सहाव्या दिवशीं भीमानें दुर्योधनाचें छत्र मोडलें, मुकुट धुळींत लोळविला, व बाणांनीं त्यास रथांत मूर्छित पाडलें. सातव्या दिवशीं पुन्हा हातघाईचीं द्वंद्वें जुंपलीं. त्यांत संध्याकाळच्या सुमारास, भीष्म कोणालाच एकट्याला अनावर होतात हा नेहेमींचाच अनुभव असल्यामुळें,पांडवांकडील सर्व मुख्य महारथ्यांनीं एकदम मिळूनच त्यांच्यावर गर्दी केली; पण भीष्मांचा पराक्रम इतक्यांसही पुरून उरला! शेवटीं पांडवांनीं शिखंडीला पुढें केला. शिखंडी पूर्वींचा स्त्री होता. अर्थात् भीष्मांच्या, "यास्तव म्हणतों आम्ही हाणूं ना बायकोस हातेंरे" ह्या व्रताप्रमाणें त्यांना दुसरीकडे जाणें भागच होतें. आठव्या दिवशीं भीमानें आपल्या गदाप्रहारांनीं धृतराष्ट्राच्या कित्येक पोरांस यमसदनीं पाठविलें. कौरवांच्या 'आर्षशृंगी' राक्षसानें अर्जुनाचा 'ईरावान' नांवाचा मुलगा तरवारीनें ठार केला. उलट घटोत्कचानें कौरवांच्या राक्षस-सैन्याचा चांगलाच समाचार घेऊन त्यास खरपूस चोप दिला. भगदत्त नांवाच्या कौरवपक्षीय वीरानेंहि त्या दिवशीं खूप पराक्रम करून पांडवांचें बहुत सैन्य ठार केलें!

हें सगळें खरें. पण आज आठ दिवस झाले, तरी पांडवांपैकीं तर राहोतच, पण बाकीच्या मोठ्या योध्यापैकींसुद्धां एकही महारथी पडला नाहीं. जे कांहीं मेले तो पुष्कळसा खुर्दाच होता. आणि भीष्माचार्यांसारख्या असामान्य सेनापतिंच्या हुकमतीखालीं अशी स्थिति व्हावी म्हणजे १०० धांवा हटकून काढणारा गडी 'चेंडूफळीच्या' पटांगणावर दोन दोन तास उभा राहून एकही 'धांव' न काढण्यापैकींच होतें! दुर्योधनास वाईट वाटलें, व असाच प्रकार चालल्यास पुढें कसें होणार म्हणून चिंताहि उत्पन्न झाली. दुर्योधन पुनः भीष्माचार्यांच्या शिबिरांत रडत

गेला, व " भीष्मासि म्हणे राजा व्हावी ऐसी रणांत मदवस्था ? " असें म्हणून भीमानें आपली उडवलेली दुर्दशा सांगून तो म्हणतो, " शिरला भीम व्यूहीं जेवि अजकुळांत लांडगा शिरतो। दैवेंचि रक्षिलें मज कापित होताचि दांडगा शिर तो !॥" त्याचप्रमाणें "या तुमच्या पावाव्या दुर्बल–सेनासमान वध सेना ?" " हें केवढें आश्चर्य आहे ? " असेंहि तो म्हणाला. ' उद्यां मी अत्यंत निकराची झुंज करतों ' असें सांगून व त्याचें समाधान करून, भीष्मांनीं त्यास लावून दिलें. व दुसरें दिवशीं, म्हणजे लढाई सुरू झाल्यापासून नववे दिवशीं, म्हाताऱ्यानें असा कांहीं समरचमत्कार केला आहे कीं, तिसऱ्या दिवसाची–अर्जुनास बेशुद्ध पाडलेल्या दिवसाचीच सर्वांस आठवण व्हावी. पण खरें पाहिलें असतां आज आठ नऊ दिवसांच्या झुंजींत अर्जुनानें भीष्मांवर मनापासून बाण टाकले आहेत कधीं ? आजही तीच स्थिति झाली. ! " येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाःसुखानि च। त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानिच॥" अशी पहिल्या प्रथमच तक्रार करणाऱ्या अर्जुनाच्या हातून, ज्यानीं आपल्या बापाचेंही पुत्रवत् पालन केलें, त्या भीष्मपितामहांवर–आजोबांच्यावर सणसणीत बाण मारण्याची अकृतज्ञता कशी होणार ? शस्त्रास्त्रविद्येचें शिक्षणदान देणाऱ्या द्रोणांचे बाबतींतहि गुरूची विद्या गुरूसच फळविण्याचें पाप त्याच्या हातून तितक्या जोरांत कसें होणार ? द्रोणांच्या बाबतींत काय झालें ते आपण पुढें पाहूंच. इथें भीष्मांच्या बाबतींत मात्र अर्जुन कुचराईनें लढत आहे, व " भीष्म ग्रीष्मतरणिसा " आणि " अर्जुन हेमंततरणिसा गमला। " तेव्हां साहजीकच, " देव म्हणे बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला ॥ " आणि तें साहजीकच आहे. कारण त्याचें कारण वरील कुचराई होय, हें आपण पाहिलेंच आहे. पण अशा रीतीनें जर ह्या वृद्धाला–वृद्धाच्या पराक्रम–अग्नीला फार पसरूं दिलें तर, " धर्म–कटक खांडववन, भीष्म विजय, विजय तोचि हरि गमला,। शर दव, रक्त ज्वाला " अशा सारखी पुन्हा स्थिति होऊन, " हा पांडवासि भस्मचि करिल," म्हणून, " उपेक्षा करूं नये याची।" असें मनांत आणून, " भीष्म वधाया धांवें हरि हस्तें कवळुनी प्रतोदास।" हातामध्यें चाबूक घेऊन कृष्णप्रभूची स्वारी पुन्हा एकदां आपली प्रतिज्ञा मोडून

अर्जुनास लाजविण्यासाठीं–( व दुष्टनिर्दलनाचें कार्य पांडवांचे हातून योग्य रीतीनें पार पडावें ह्यासाठीं )–भीष्मांचे अंगावर धांवून गेली. "एह्येहि पुंडरीकाक्ष देवदेव नमोस्तुते।" असें म्हणून, श्रीकृष्णांनीं आपणांस पुन्हां केवढा थोरपणा दिला, ह्या कृतज्ञतेनें व कृष्णप्रेमानें "बोले गह्व प्राज्य–प्रेमाश्रुभरें करूनिया डोले॥"–भीष्म तशाही स्थितींतल्या समाधीसुखांत–"नेत्रीं जळ वाहो सदा। आनंदाचे रोमांच॥"–अशा समाधींत डुलूं लागले! धन्य त्या महाभागांची! भीष्माचार्यांसारखा भक्तवीर पुन्हां होणें नाहीं! यावेळीं अर्जुनानें मागून जाऊन कृष्णास धरलें; पण कृष्णास कसा खरोखरीच राग आला होता, व उद्यां "हनिष्यामि पितामहं" म्हणून त्यानें वचन दिल्यावर तो मावळून कृष्ण परत गेल्यावर पुन्हा भीष्मानीं सायंकाळपर्यंत रणकंदन कसें माजविलें, याचें पंतांनींही तशाच बहारीनें वर्णन केलें आहे:–"धांवुनि धरी धनंजय," पंत म्हणतात, "मागुनि त्या माधवासि बाहूनीं। मग दृढचरणींच मिठी घाली पाहिलीच रीति पाहूनी॥ दूर उसळला तेव्हां कोपावेशें मुकुंदकंदुकसा!।" नंतर "मारिन भीष्मातेंही" अशी अर्जुनाची प्रतिज्ञा झाली. तेव्हां केवळ त्याच्या संतोषासाठीं भगवान् मागें फिरले! "कुरु–कुंजरासि गेला होता यदु–सिंह तो खरा खाया!। परते पर तेथूनि प्राण–प्रिय–मित्र–तोख राखाया॥" नंतर बाणांचें छत आकाशांत पसरून देऊन, वाऱ्याचीही गति अडविणाऱ्या भीष्मांच्या नव्या पराक्रमास, पुन्हा सुरुवात झाली! "भीष्मशरव्रज दावाचि पांडवभटनिकर तो गमे घास। क्षण सोसवे न कोणासहि जैसा वायुवेग मेघास॥"–पण इतक्यांत "तों मावळला दिनकर" व युद्ध थांबलें!

पण आतां गंमत काय झाली ती पहा. अर्जुन इकडे "हनिष्यामि पितामहं" म्हणून प्रतिज्ञा करून बसला. पण ती पुरी कशी करावयाची असा प्रश्न येऊन पडला. तसेंच असें सांगतात कीं, दुर्योधनाकडून त्यांच्या पांडवपक्षपातित्वाबद्दल कर्णप्रेरणेनें पुन्हा झाडले गेलेल्या भीष्मांस फारच वाईट वाटलें–आपल्या परवशतेबद्दल अनिवार दुःख झालें, व तशाहि स्थितींत शक्य तितकी सेवा बजावीत असतां कृतघ्नपणें बोलणाऱ्या दुर्योधनाचा त्यांना रागही आला; पण करतात काय? यापेक्षां सडेतोड

असहकारिता त्यांनीं प्रथमपासूनच केली असती तर बरें नसतें झालें? असें आम्ही अजूनही म्हणतों. पण त्यांच्या कल्पनेप्रमाणें ते द्रव्याच्या मिंधेपणानें दुर्योधनाच्या दास्यांत बांधले गेले होते खरे. त्याला कोण काय करणार? वूल्सेप्रमाणें, "Had I but served my God Almighty" वगैरे तऱ्हेचे पश्चात्तापात्मक विचारही त्यांच्या मनांत आले नसतीलच असेंही नाहीं. पण अजूनही स्वतःची सोडवणूक करून घ्यायचें म्हाताऱ्याच्या मनांतही न येतां तो अधिकच गुंतला गेला! कारण, "तुम्हाला होत नसेल तर कर्णाला तरी सेनापत्य द्या" ह्या दुर्योधनाच्या उद्गारानीं म्हातारा इरेस पेटला, व "उद्यां मी निष्पांडवी पृथ्वी करीन, किंवा मी तरी मरेन!" अशी त्यानें घनघोर प्रतिज्ञा करून त्यामुळें संतुष्ट-चित्त झालेल्या दुर्योधनास वाटेस लावलें. भीष्मप्रतिज्ञाच ती! ती काय खोटी होणार? अर्थातच ती ऐकूत पांडवांच्या व द्रौपदीच्या हृदयानें ठावच सोडला, व तीं सर्व ही दुःखद वार्ता सांगण्यास श्रीकृष्णाकडे गेलीं. जणुं काय ती त्या सर्वांतर्याम्यास ठाऊकच नव्हती! कृष्णांनींही तें ऐकून तशाहि स्थितींत दुःख दाखवीत थोडासा विनोद आरंभला. "अरेरे! फारच वाईट गोष्ट" देव म्हणाले, "हं, पण काय करायचें आतां? त्याची प्रतिज्ञा कां फिरणार आहे? आल्या भोगाला सादर झालें पाहिजे! दुसरें काय?" "वा! हे रे काय कृष्णा! ही वार्ता ऐकून आमच्या काळजाची कोण कालवाकालव झाली, म्हणून आम्ही तुझ्याकडे आलों!" द्रौपदी केविलवाणीनें म्हणाली, "तो तूं आपला दैवावरच लोटून देत आहेस!" त्याच केविलवाण्या स्वरांत ती पुढें म्हणते, "भाऊराया! यावर कांहीं तोड नाहीं कां रे?" देवांनीं मग आपला विनोद आवरता घेतला व एक अजब युक्ति काढून द्रौपदीला घेऊन त्याच रात्रीं ते भीष्मांच्या शिबिरांत गेले. त्यांचें शिबीर म्हणजे मुक्तद्वार! कोणींही यावें व जावें. यावेळीं आचार्यमहाशय श्रीकृष्णांच्या गुणगानांत वाणी रंगवून तल्लीन झाले होते. त्यामुळें द्रौपदीनें येऊन नमस्कार केला त्यावेळेस, इतर चार बाया शुभाशीर्वादार्थ दर्शनास येतात त्यांतीलच ही एक असेल, असें समजून-कारण ध्यानाच्या अर्धोन्मीलित नयनानें ती कुणीतरी स्त्री आहे एवढेंच त्यांनीं पाहिलें होतें-त्यांनीं

" अष्टपुत्रासौभाग्यवती पुत्रवती भव।" असा आशीर्वाद ठोकून दिला ! पण ह्याच आशीर्वादानें आपण आपलें मरण जवळ ओढीत आहोंत याची म्हाताऱ्यास कल्पनाहि नव्हती ! सगळ्या मुलखाच्या लबाड कृष्णाची युक्ति सोळा आणे पार पडली ! कारण द्रौपदीनें तो आशीर्वाद ऐकून विचारलें, " पण हें खरें ना ? " जणुं काय भीष्मांस सावध करण्याकरतांच केलेल्या ह्या प्रश्नानें आचार्य शुद्धीवर आले नाहींत. " प्रायःसमापन्नविपत्तिकाले धियोऽपि पुंसां मलिना भवंति " म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. म्हाताऱ्याचा मृत्यु चांगलाच ओढवला होता असें दिसतें. कारण अद्याप त्याच भ्रमांत राहून आचार्य म्हणतात, " सत्य म्हणजे त्रिवार सत्य ! ह्या भिष्माची वाणी कधीं खोटी झाली आहे काय ? " हें उत्तर ऐकून द्रौपदी अजून एक शंका फेडून घेण्यासाठीं म्हणते, " पण हा आशीर्वाद ह्या जन्मीं खरा होणार कीं पुढच्या ? " " याच जन्मीं ! " भीष्मांनीं सत्यभाषित्वाच्या कैफींत–जोरांत–कालमुखांत अज्ञाततः उडी घेत उत्तर दिलें ! या उत्तरानें तर निकालच लागला ! तेव्हां, " पण आपण मला ओळखलेंना ? " ह्या द्रौपदीच्या प्रश्नाबरोबर मात्र भीष्माचार्य चमकले, व खडबडून शुद्धीवर आले. पण आतां त्याचा काय उपयोग ? भगवद्ध्यानाच्या अफूच्या तारेंत तोंडांतून निघालेला आशीर्वाद त्यानें खोटा कसा होणार ? स्वप्नांत अर्पण केलेल्या राज्यावर उदक सोडणाऱ्या हरिश्चंद्र राजाच्या कोटीतलें भीष्माचार्य सत्यप्रातिज्ञ व सत्यवचन होते. याच कल्पनेनें प्रेरित होऊन द्यूताच्या धुंदींत पणास लावलेल्या द्रौपदीस मुग्धपणें कौरवांची दासी म्हणण्यास धर्मराज कबूल झाले काय ? " कोण द्रौपदी ? " आश्चर्यानें नेत्र विस्फारीत भीष्म म्हणतात. " होय मामंजी मीच ती ! " " आणि तूं अशा अपरात्रीं एकटीच कशी आलीस ? बरोबर कोण आहे ? " " जोडेराख्या आहेना ! तो बाहेरच उभा आहे ! " ह्या उत्तरांतील कोटीची खोंच लक्षांत येऊन, प्रत्यक्ष मृत्यूसारखें संकट अंगावर येऊन आदळलें होतें तरी, त्यांतल्यात्यांत हंसून भीष्म म्हणतात, " मला वाटलेंच ! कारण त्या 'जोडेराख्या'-शिवाय ही युक्ति दुसऱ्या कोणास सुचायची नाहीं. त्यानें तुमचा जोडा राखलान् खरा, जा; द्रौपदी, तूं कांहीं काळजी करूं नकोस ! माझा आशी-

र्वाद कधींही फिरायचा नाहीं. माझा बळी देऊनही मी तुझें सौभाग्य राखीन बरें !" अहाहा ! केवढी ही धीरोदत्त वाणी ! एका अर्थानें थोडेसें फसवूनच हा आशीर्वाद उपटला असतांना सुद्धां, त्यासाठीं आपल्या देहाचाहि बळी देण्यास तयार होणारा भीष्म या आर्यावर्तांतच निपजायचा ! आचार्यांची ती धीरोदत्त वाणी ऐकून द्रौपदीच्या नेत्रांत कृतज्ञतेचे अश्रु उभे राहिले ! व तिनें त्यांना पुन्हां वंदन केलें !

वरील सर्व युक्तीचा 'अथपासून इति'पर्यंतचा पाठ श्रीकृष्णांनीं द्रौपदीस जसा दिला तसें तिनें—त्या जगन्नाटककाराच्या भगिनीनें—बरोबर नाटक उठवून दिलें, व दुसऱ्या दिवशीं भीष्माचार्य शरपंजरीं पडणार हें निश्चित झालें ! फक्त ते कोणच्या उपायानीं पडणार, एवढाच प्रश्न राहिला, व तोही लवकरच निकालांत निघाला. कारण भीष्मांचा पराभव ते जिवंत असेपर्यंत होणार नाहीं असें ठाऊक असणाऱ्या धर्मांनीं, त्यांना भीष्मांनीं त्या कामीं पुन्हा येण्यास युद्धारंभींच सांगितलें होतें त्याप्रमाणें धर्मादि पांडव व श्रीकृष्ण भीष्माकडे गेले, व खुद्द धर्मानें "मग आपण उद्यां कशानें मरणार ?" अशा तऱ्हेची असभ्य पृच्छा त्यांस केली. त्यावर "पुसतील पांडव स्वहित, तरि सांगुनि संकटांत तारीन" ह्या त्यांनीं दुर्योधनास युद्धाच्याहि आधीं सांगितलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें, "शिखंडी हा पूर्वीं स्त्री असून आतां पुरुष झाला आहे, त्यास पुढें करून अर्जुनानें माझ्यावर एकसारखे बाण टाकल्यास मी मरण्याचा संभव आहे" असें भीष्मांनीं—उदारहृदयी भीष्मांनीं—उत्तर दिलें ! तेव्हां, "नको तो प्रसंग, व नको तें राज्य !" असें पुन्हां अर्जुनास शोकपूर्ण वैराग्य आलें. पण कृष्णांनीं त्याच्या प्रतिज्ञेची त्यास आठवण देऊन त्याचें तोंड गप्प केलें !

याप्रमाणें आदल्या दिवशीं रात्रीं सर्व तयारी होऊन दुसऱ्या दिवशींच्या—भीष्मांच्या दहाव्या दिवशींच्या—युद्धास सुरवात झाली. आधीं शिक्षा काय द्यायची वगैरे सर्व ठरवून मग राजकीय गुन्हेगारांच्या चौकशीच्या फार्सास सुरवात होते त्यांतलाच हा प्रकार म्हणायचा ! पण मरतां मरतांही दुर्योधनाची—ज्याच्या अन्नावर आजवर देह पोसला—अखेरची सेवा बजवावी म्हणून भीष्मांनीं आज, 'न भूतो न

भविष्यति ' असा पराक्रम केला, व लाखों सैनिकांना धुळींत माती खायला लावलें ! त्यांच्या शौर्यसागराला आज अपार भरती येऊन त्याच्या लाटांच्या तडाक्यांत सांपडतील ते ते आज त्यांत वाहून जाऊं लागले ! ह्याप्रमाणें युद्ध करून थकल्या भागलेल्या त्या वृद्ध वीरावर, सायंकाळच्या सुमारास शिखंडीस पुढें करून लढणारे आमचे वीर (!) अर्जुन खरोखरच, ' बायकोच्या नथेंतून तीर ' मारूं लागले असें म्हणावयास काय हरकत आहे ? येथें वाचकांना या शिखंडीबद्दल थोडेसें सांगितलें पाहिजे. भीष्माचार्यांच्या आजन्म ब्रह्मचर्याच्या प्रतिज्ञेनें अंबेचा कसा हिरमोड झाला होता, व त्या ' भग्न–हृदया ' दुष्टेनें भीष्मांचा सूड उगवण्याची कशी आसुरी प्रतिज्ञा केली होती, हें आपण मागेंच पाहिलें आहे. तो सूड उगवण्याची संधी अनायासानें आतां अवचित चालून आल्यामुळें ' शिखंडी'च्या रूपांत असलेली ' अंबा ' प्रस्तुत तो सूड चांगलाच उगवून घेत होती ! अर्जुनाच्या प्रत्येक घावाबरोबर म्हाताऱ्या शांतनवाची वयोवृद्ध काया जर्जर होत असतांना ती पाहून अंबेच्या हृदयास आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या ! हरहर ! प्रेमाचा कोण हा सैतानी अधःपात ! पण छे ! तें प्रेम तरी कशाचें ? त्याला प्रेम म्हणणें, म्हणजे त्या प्रेमाची नुसती थट्टा करणें आहे! कारण खरें प्रेम हें निर्लोभ व निर्मत्सर असतें, असें आपणास कवि सांगतात. ज्या इच्छेच्या पूर्तीच्या भंगानें दुसऱ्याचा सूड घेण्याची वासना उद्भवते, तें प्रेमच असेल तर सैतानी प्रेम होय ! प्रेमविषयाच्या दुःखानें ज्या प्रेमी हृदयास आनंद होतो तें हृदय आसुरी–पैशाची होय ! खऱ्या प्रेमाच्या तारेंत शत्रूही मित्रांसारखे प्रिय होतात. त्या दिव्य स्वर्गीय प्रेमाचा अंबेच्या ठायीं लवलेशहि नसून, वैषयिक पशुवासनेचा हिरमोड झाला म्हणून थैमान करणारें तिचें हृदय पिशाच वृत्तीचें होतें; आणि म्हणूनच भीष्मांच्या विकलांगाकडे पाहून तें खदखदां हंसत होतें ! अस्तु.

हळूहळू भीष्मांनीं आपलें अंतःकरण युद्धापासून पराङ्मुख केल्यावर अर्जुनानें भीष्मांचे भोंवतीं नाचणारी सेना जर्जर केली व लवकरच मोठ्या शिताफीनें (!) त्यांचा ध्वज मोडला, धनुष्यें तोडलीं, सारथी ठार केला व ढालतरवारीचे तुकडे उडवले. तेव्हां प्रचंड जयघोषांत पांडवांच्या

सैन्यानें अधिकच लगट केली, व कवच भेदून शेंकडों बाणांनीं विद्ध झालेले शरान्वितकाय भीष्म व्याकुळ होऊन भूमीवर पडले,—नव्हे त्याच बाणांच्या शेजेवर—'नाराचांच्या अंथरुणा'वर त्यांचें शरीर वरच्या-वर तोललें जाऊन ते शरपंजरीं पडले, असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. अशा रीतीनें त्रैलोक्यांत अजिंक्य असा हा वीर आज बाणांच्या शय्येवर पहुडला! परंतु भीष्माचार्यांस त्यांच्या आजन्म ब्रह्मचर्याच्या भीष्म प्रतिज्ञेनें संतुष्ट होऊन त्यांच्या पित्यानें—शंतनूनें—'इच्छामरणी'-पणाचा वर दिलेला असल्यामुळें, एखाद्या किरकोळ माणसासारखे ते मृत्युवश झाले नाहींत. पूर्वपश्चिम पहुडलेल्या त्या वीरानें दक्षिणायनांत सूर्य आहे असें पाहून उत्तरायणांतली उत्तम गति प्राप्त होण्यासाठीं त्यांनीं तिथवर दम धरला—मृत्यूस थोपवून धरिलें! व उत्तरायणाच्या शुक्लपक्षांत आनंदानें भगवन्नामस्मरण करीत त्यांनीं इहलोकाचा त्याग केला! त्या वेळीं त्यांचें वय १५० वर्षांचें होतें असें सांगतात. आणि "प्राप्तं कलियुगं विद्धि प्रतिज्ञा पांडवस्यच।" ह्या वचनाप्रमाणें महाभारतकाल म्हणजे कलियुगाचा प्रारंभच होय हें लक्षांत घेतां वरील वय लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वयाला १५० वर्षें झालीं तरी कणखरपणें लढणारा तो वृद्ध वीर कुठें, व तिशी चाळिशी उलटली नाहीं, तोंच वृद्धत्वानें वांकणारे सध्यांचे वीर कुठें! यावरून आपला किती अधःपात झाला आहे याची चांगलीच कल्पना होते! असो. मृत्युपूर्वीं भीष्माचार्यांनीं पांडवांचा जय पाहिला, व धर्मराजास 'राजनीति'चा उपदेशही पण त्यांनीं केला, व शेवटीं कृष्णप्रभूची—"कष्मलजडत्व गेलें, आलें सर्वज्ञपण तुझ्याच वरें। करुनि प्रसाद लाविसि रंकावरिही उडावया चवरें!" याप्रमाणें स्तुति करीत ते परमात्मस्वरूपीं विलीन झाले. भीष्मांच्या मृत्यूनें भारत-भूची किती हानि झाली आहे ह्याचें कोण वर्णन करणार? शोकानें दाटलेली आमची लेखणी यापुढें जास्त चालत नाहीं! यासाठीं भारती-युद्धानंतर रणभूमीवरचा देखावा पहात हिंडणाऱ्या गांधारीच्या शब्दांत व तदनंतर धर्मास ज्ञानबोधांसाठीं नेणाऱ्या खुद्द प्रभूंच्या शब्दांतच तें आम्ही वाचकांस सांगतों. शरपंजरीं पडलेल्या भीष्मांस पाहून गांधारी म्हणते, "भीष्मप्रभु शरतल्पीं निजला आहे जसा कुसुमतल्पीं। हें शौर्यवीर्य

न सुरीं, कैसें मनुजीं असेल मग अल्पीं?॥ या मागें धर्माचें पांडव पुसताल तत्व कोणातें ?। हा राजनीति विधवा झाली ! बैसेल धरुनि कोणातें ?॥" कृष्ण प्रभु म्हणतात, " ज्ञानें अस्तां जातिल, होता तो भीष्ममानु अस्तमित। दिसतो तसा नव्हे बा ! तेजस्वी सूर्य काय हस्त-मित ? ॥" प्रियेचे प्रेत मांडीवर घेऊन विलाप करणाऱ्या अजराजाप्रमाणेंच पण निराळ्या नात्यानें असलें तरी हृदयाच्या तितक्याच कळवळ्यानें आपल्या अंकावर-बाणांच्या शय्येवर-पहुडलेल्या त्या वीरश्रेष्ठ पुत्रास-भीष्मांस पाहून भूमातेनेंहि उद्गार काढले असतील कीं, "करुणा विमुखेन मृत्युना हरता त्वां वद किं न मे हृतम् ?" आणि ते अक्षरशः खरे आहेत! असो.

आपण भीष्मांच्या मृत्यूपर्यंत सामान्यतः बोलतां बोलतां येऊन ठेपलों. पण आपणास चार पावलें मागें हटून अद्याप भारतीय-युद्धाचा शेवट पहावयाचा आहे, त्यांतील कित्येक प्रसंग अजून अनुभवावयाचे आहेत. तेव्हां आतां तिकडेच वळावें हें बरें. " भीष्म पडतांचि गेले सर्वांचेहि पळांत आंवाके।" अशी स्थिति होऊन सर्वांचीच कंबर खचली. खुद्द कर्णाला सुद्धां भडभडून रडूं आलें. " पडतांचि भीष्म पडले रडले कुरुवीर, भूप, सुर सगळे।" अशी साहजीकच स्थिति झाली ! त्या दिवशीं ताबडतोब युद्ध बंद होऊन, सर्वजण भीष्मांच्या भोंवतीं जमा झाले. भीष्मांची मान खालीं लोंबत होती म्हणून त्यांनीं उशी मागितली. लगेच मऊ मऊ गिरद्या घेऊन दुर्योधन पुढें झाला ! पण शरपंजरीं पडलेल्या भीष्मांना त्या कशा आवडणार ? त्यांनीं अर्जुनाकडे पाहिल्याबरोबर त्यानें मात्र तीन बाणांची उशी त्यांच्या मस्तकाखालीं व्यवस्थित करून दिली, तेव्हां साहजीकच संतुष्ट होऊन त्यांनीं, "व्हावें शस्त्रेंचि रणीं वीरांचें गलित वपु न रोगानें।" असा सर्वांस उपदेश केला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं अशीच मंडळी पुन्हां त्यांच्या भोंवतीं गोळा झाली असतां, जखमांच्या वेदनांनीं व्याकुळ झालेल्या भीष्मांस तहान लागल्यावरून त्यांनीं पाणी मागितलें. लगेच गारगार पाणी घेऊन दुर्योधन पुढें झाला ! पण मुमूर्षु जीवाच्या मुखांत गंगोदकावांचून अन्योदक कशास व्हावें ? भीष्मांनीं अर्जुनाकडे पाहतांच तो वीर उठला, व त्यांच्या मुखांत गंगा सोडण्याचें काम त्या धनुर्धारी वीरानें केलें. समरांगणावर गंगोदक त्यानें

कुटून आणलें ! खऱ्या वीराला काय? लाथ मारील तिथें तो पाणी काढीत असतो ! इथेंही अर्जुनानें धनुष्य खेंचून असा एक तीव्र बाण त्या बाण-शय्येजवळ भूमीवर मारला कीं, भूमि फोडून पाताळींची गंगा घेऊनच तो वर आला, व त्या शुद्ध निर्मल गंगोदकाची धार अज्ञात त्या मुमूर्षु शांतन-वांच्या मुखांत पडली ! सर्वजण आश्चर्यचकित व भीष्म संतुष्ट झाले, आणि शेवटीं सुद्धां त्यांनीं मृत्युशय्येवर अर्जुनाच्या पराक्रमाचें व दुर्योधनास यश मिळण्याच्या असंभवाचें वर्णन करून, 'एवढ्या हानीवरच उमजून डोळे उघडा, व पांडवांशीं सख्य करा, असा दुर्योधनास व कर्णास उप-देश केला. पण पालथ्या घड्यावर पाणी ! त्या दीड शहाण्यांनीं तो मुळींच ऐकला नाहीं ! असो.

याप्रमाणें युद्धाचे पहिले दहा दिवस झगडून शेवटीं शरपंजरीं पड-लेल्या मुमूर्षु भीष्मपितामहांचा निरोप घेऊन कौरव पांडव वीर तेथून आपल्या शिबिरांत परत आले. दुर्योधनास वाटलें कीं, आपल्या विश्वा-साचा आधार जो कर्ण त्यासच आतां सेनापत्याचीं वस्त्रें द्यावीं. परंतु नम्रपणें त्यांनीं हा मान प्रथम द्रोणगुरूसच द्यावा असें सुचविल्यावरून, दुर्योधन राजा द्रोणाचार्यांच्याकडे गेला, व "सेनापति शत्रु–बळ–विरामा व्हा ।" अशी त्यानें त्यांस प्रार्थना केली व सेनापतिपदाचा त्यांस अभिषेक केला ! त्यामुळें प्रसन्न होऊन त्यांनीं वर देऊं केला असतां, "धर्माला जिवंत धरून माझ्या स्वाधीन करा" असा दुर्योधनानें वर मागितला. यांत कांहीं याचा उच्च हेतू आहे असें द्रोणास वाटलें; परंतु, "म्हणजे त्याला पुन्हां द्यूतांत जिंकून वनवासास व अज्ञातवासास लावून देईन !" ह्या त्याच्या उत्तरानें त्यांची सपशेल निराशा झाली ! तथापि त्याच्या इच्छेप्रमाणें धर्मास जिवंत धरुन देण्याचें त्यांनीं कबूल केलें. मात्र अर्जुन त्यावेळीं त्याजजवळ नसला पाहिजे अशी त्यांनीं अट घातली. ती बातमी अर्जुनास हेराकडून कळल्यावर, "जीवांत जीव आहे तोंवर मी धर्मास धरूं देणार नाहीं !" अशी त्यानेंही प्रतिज्ञा केली. याप्रमाणें धर्मास धरण्यासाठीं द्रोणांची धडपड, व धर्माच्या रक्षणार्थ अर्जुनाचा अटोकाट यत्न, हीं आपणास "द्रोणपर्वा" च्या पहिल्या दोन दिवसांत प्रामुख्यानें दिसणार आहेत. तिसऱ्या दिवशीं अभिमन्यूचा

वध, चौथ्या दिवशीं जयद्रथवध, व पांचव्या दिवशीं खुद्द द्रोणवध आपल्या दृष्टीस पडून, हें द्रोणपर्व खलास होणार आहे. अस्तु.

द्रौणाचार्यांस सेनापतीचीं वस्त्रें अर्पण केल्यावर तीं अर्पण करणाऱ्या दुर्योधनाच्या तोंडावर त्यांनीं साफ सांगितलें कीं, " धृष्टद्युम्नासि न मी वधिन, करीन त्वदर्थ बहु कष्ट ! " यांतील धृष्टद्युम्नास न मारण्याची अट द्रोणानीं कां बरें घातली ? त्याच्या हातूनच त्यांचा मृत्यू होता, व आपल्या मृत्यूवांचून पांडवास जय येणें मुष्कील—किंबहुना अशक्य—आहे हें त्यांस पूर्ण ठाऊक होतें म्हणूनच नव्हे काय ? पण दुर्योधनाच्या बाजूनें बोलायचें तर ह्यांत भीष्मांप्रमाणेंच फितुरी दिसून येत नाहीं काय ? खुळ्या दुर्योधनास तें एक समजलें नसेल; परंतु द्रौणांनीं अशी त्याची वंचना करावी काय ? दुर्योधनानें भीष्मांस म्हटल्याप्रमाणें, "जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें " हेंच खरें नव्हे काय ? रा. लिमये यांनीं भीष्मद्रोणादिकांची बाजू या कामीं उचलून धरण्याचा प्रयत्न करून, " आपलें शरीरसामर्थ्य, युद्धकौशल्य व बुद्धिमत्ता हीं आपल्या स्वामीसाठीं खर्च करणें त्यांचें कर्तव्य होतें " असें म्हटलेंच आहे;+ पण त्याचबरोबर "त्यांची भक्ति, प्रेम व अंतःकरण पांडवाकडे ओढ घेत होतीं" हीहि गोष्ट तेच कबूल करतात;+ कारण ती तितकीच सत्य आहे. किंबहुना त्यांनीं तसें दुर्योधनासही युद्धापूर्वींच सांगून साम करण्याचा व युद्ध टाळण्याचा यत्न केला होता—उपदेश केला होता. पण प्रश्न असा कीं, तो यत्न विफल झाल्यावर मग रा. लिमयांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांनीं वरील गोष्टी कितपतशा केल्या ? आधीं अंतःकरण व शरीर ह्यांची द्विधा स्थिति झाल्यावर तें कितपत होणें शक्य आहे याचा वाचकांनींच विचार करावा. आमच्या मतें तर 'जिकडे मन तिकडे देह असावा' असा साधा न्याय आहे. तसेंच तेंच शरीर–बुद्धि–शौर्य इ. एकदां एका पक्षार्थ वेचायचीं हें कर्तव्य ठरल्यावर मग ती संपूर्णपणें—अंतःकरणांसह—तिकडेच वेचायला हवींत असाच उलटही नाहींका सरळ अर्थ निघत ? पण पांडवांचा सत्पक्ष म्हणून मन तिकडे, व कौरवांचें अन्न खालें म्हणून देह इकडे, अशा

---

+ भारतीय युद्ध "–पान १६३ पहा.

रीतीनें दोन्हीकडे—दोन डगरीवर, हेलकावे खाऊन ते अखेर काळाच्या तोंडीं पडले आहेत. यांत त्यांनीं काय साधलें, असा प्रश्न आहे. 'शरणागता न सांडावें,' म्हणून दुर्योधनानें प्रार्थना केल्यावरून सेनापतीचा अधिकार स्वीकारणाऱ्या भीष्मांनीं व द्रोणांनीं त्यांच्या शौर्यावर ज्याचा अत्यंत विश्वास त्यास तोंडघशीं पाडून, स्वतःचें मरण स्वतःच सांगून टाकून भीष्म शरपंजरीं पडले, व 'धृष्टद्युम्नास मी मारणार नाहीं' म्हणून द्रोणांनीं त्याच्या हातून स्वतःचें शीर उडवून घेतलें. शल्य तर पाडवांचा उघड उघड व याहूनही अधिक फितुरी होताच, हें आपणास पुढें दिसून येणारच आहे. पण कुंतीमातेला, "अर्जुनाखेरीज मी दुसऱ्या कोणास मारणार नाहीं व अशा रीतीनें तुझे 'पांच पांडव' कसेंहि करून जिवंत राहतील" असें वचन देणाऱ्या खुद्द कर्णाचीही यांत थोडीशी मातृभक्ति दिसत असली, तरी दुर्योधनाच्या बाजूनें पहातां, त्यांतही थोडीशी फितुरीच दिसत नाहीं काय ? अर्थात् ही सगळ्यांत कमी होती. किंबहुना त्याला पाहिजे तर तुम्ही फितुरी हें नांवही देऊं नका. पण आम्हांस त्यांत सांगावयाचें इतकेंच कीं, याच कर्णाला याच वचनामुळें एकदा भीमाला व एकदां नकुळाला जिवंत सोडावें लागलें आहे. नकुळाची गोष्ट राहो, पण भीम हा कांहीं सामान्य योद्धा नव्हता. त्याचा पराक्रम पुढें आपणास लवकरच कळून येणारच आहे. पण प्रश्न असा कीं, अशा तऱ्हेनें कुंतीला वचन देऊन त्यापायीं भीमासारख्या वीराला सोडून द्यावें लागावें यांत 'दुर्योधनाचें सर्व प्रकारें कल्याण करण्यासाठीं झटण्याच्या' त्याच्या—कर्णाच्या—व्रताचा कांहींच भंग होत नाहीं काय ? व असल्यास मग त्यांनीं तसें कुंतीस आश्वासन कां द्यावें ? ज्या सडेतोडपणानें त्यानें, "दुर्योधनाशीं मी निमकहराम होणार नाहीं !" असें उत्तर दिलें त्याच सडेतोडपणानें, "मग त्यांत तुझे पाची पांडव पडले तरी त्याची मी किंमत बाळगीत नाहीं !" असें उत्तर द्यावयास नको होतें काय ? बाळपणींच स्वतःच्या भ्रष्टकौमार्याचा डाग छपविण्यासाठीं जिनें आपला त्याग केला व आतां मात्र आप्पलपोटेपणानें, "अरे, तूं कौंतेय आहेस !" म्हणून आपणास जी फितवूं पाहते तिच्या नैष्ठुर्याचा व आप्पलपोटेपणाचा जर त्यास राग आला होता, तर तिची त्यानें एवढी क्षिती कां बाळगावी हेंच आम्हास सम-

जत नाहीं. पण यांत कठीण काय आहे ? इथेंही प्रथम मातृस्नेह व असेंच इतर भाव आड आले, व कर्णाचें वर्तन कांहींसें पांडवपक्षीयांस अनुकूलच झालें, एवढेंच आम्हांस म्हणावयाचें आहे. दुर्योधनाच्या विश्वास–सर्वस्वाच्या आधारस्तंभाची जर ही स्थिति, तर भीष्मद्रोणादिकानीं तर काय उघड उघड 'आमचीं मनें पांडवांच्या बाजूस आहेत' म्हणून जाहीरच केलें होतें ! बिचारा दुर्योधन मात्र याप्रमाणें सगळीकडून नागवला गेला. पण तो जितका मानी व शूर होता तितकाच मूर्खही होता, व म्हणूनच त्यास शेवटीं धुळीचे दिवे खावे लागले असें म्हटल्यावांचून मात्र आमच्यानें राहवत नाहीं. असो.

तें कांहीं असो. " इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः " अशी त्यांची आमच्या मतें कितीही स्थिति झाली असो, ते तसें वागले खरें; व ते जसे वागले तसें वाचकांस सांगणें आम्हांस भाग आहे. पण कर्तव्य व प्रेम यांचा झगडा लागला असतां, रा. लिमये म्हणतात कीं, +त्यानीं–भीष्म–द्रोणांनीं–कर्तव्य बजावलें. पण आम्हांस तर साफ वाटतें कीं, यांत त्यांनीं प्रेमासच प्राधान्य दिलें असून कर्तव्याचा नुसता बाहेर आव आणला होता. तेव्हां कर्तव्याच्या दृष्टीनें पाहतांना त्यांनीं 'प्रत्यक्ष कृष्ण प्रभूकडूनच गेल्यास मारले जाऊं; तोंवर जिवांत जीव असेपर्यंत खऱ्या इमानानें दुर्योधनासाठीं लढून पांडवांकडचा निव्वळ खुर्दाच न सांडतां, कित्येक हिरेमाणिकही तोडून पाडण्याची आम्ही शिकस्त करूं' असें वागावयास नको होतें काय ? एक द्रोणाचार्यांनीं येऊन जाऊन अभिमन्यूसारखा ' बालवीर ' मात्र ठार करण्याचे कामीं सहाय्य केलें आहे. पण मुख्य पांडवांस कोणीच हात लावलेला नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. भीष्म–द्रोण–कर्णांत कांहींसा इमानानें लढला असा काय तो कर्णच ! बरें; प्रेमाच्या व धर्माधर्माच्या दृष्टीनें पहातां सत्पक्षाच्या बाजूनें लढणाऱ्या खुर्दास व रुपयांस तरी त्यांनीं ठार मारावें व अभिमन्यूसारखा बालक जिवावर उदार होऊन असहायपणें एकाकी लढत असतां त्याच्या मृत्यूला व त्यामुळें उद्भवणाऱ्या सत्पक्षाकडील अपार शोकाला अप्रत्यक्षपणें द्रोण व

---

+ " भारतीय युद्ध "–पान १६३ पहा.

कर्ण ह्यांनीं कारण व्हावें हें तरी कितपत बरोबर ठरतें ? तेव्हां 'धड हें नाहीं अन् धड तेंही नाहीं' अशी त्यांची अवस्था झालेली आहे एवढेंच आम्हांस म्हणावयाचें आहे. व याला कारण कर्तव्य व प्रेम आणि सत्पक्ष यांपैकीं कोणचें नेमकें उचलायचें याचा आधीं मनाशीं पूर्ण उलगडा करून न घेतां ते वागले, व त्यांच्या–भीष्मद्रोणांच्या वागण्यास त्यांतल्या-त्यांत नांवच द्यायचें असलें तर–दुर्योधनाचे बाजूनें स्पष्ट शद्बांत बोलावयाचें झाल्यास–कर्तव्याचा नुसता वरून आव आणणारे पण खरोखरी ते पांडवांसच फितूर होते–लागू होते, असें म्हणावयास हरकत नाहीं. मग 'आम्ही सत्पक्षाचे चहाते व पांडवप्रेमीं आहोंत' असें त्यास तें कितीही गोड नांव देण्याचा यत्न करोत. पण ते पूर्ण पांडवपक्षपाती होते असेंच त्यांच्या युद्धप्रकारादिकांवरून सिद्ध होतें–दिसून येतें. तथापि देहानें भीष्मानंतर आमचे द्रोणाचार्य कौरवपक्षीयांच्या बाजूनें झगडण्यास उभे राहिलेले आहेत, त्यांनीं धर्मास जिवंत धरण्याचें दुर्योधनास आश्वासन दिलेलें आहे, व ते स्वतः अप्रतीम योद्धे असल्यामुळें त्यांची त्या कामीं धडपड सुरू झालेली आहे, तर आतां तिकडेंच वळूं.

द्रोणाचार्यांच्या सेनापत्याखालीं लवकरच–"भट गांठिती भटांतें अहि अहितें जेंवि पतग पतगातें। कीं हरि हरितें, अत्यद्भुत होय द्वंद्वयुद्ध शतगातें॥" लवकरच अर्जुन धर्मराजाच्या आसपास नाहीं असें पाहून, "धर्माला गांठाया धांवे तो विप्र कटक विसकटून।" आणि आपल्या अतुल पराक्रमानें द्रोणांनीं–त्या "शत्रुसिंहशरभानीं" 'रक्तनदी वाहविली' व ती 'समराजिरीं खळखळा' वाहूं लागली. व लौकरच द्रोणगुरूंनीं–"कौंतेय (म्ह. धर्म) गांठिला रणरंगीं नटउनि महाभट कबंध।" त्यावेळेस धर्मानींही आपल्याकडून, "धीर धरुनि धर्मज्ञें धीरें धैर्यें धनुष्य चढविलें। दाखविलें तें गुरुला जें होतें आपणास पढविलें॥" परंतु क्रिकेटच्या पटांगणावर, "टाइम मेक अप्" करण्यासाठीं शेवटच्या गड्यांनीं ज्याप्रमाणें धडपड करावी, त्यांतलींच धर्माची वरील धडपड होती. द्रोणांचा रथ धर्माच्या रथाशीं येऊन भिडला! व आतां धर्म पकडला जाणार म्हणून कौरवांनीं आनंदाची टाळी पिटली! पण इतक्यांत अर्जुनाचा कपिध्वज व सिताश्व रथ विजेच्या वेगानें कौरवसैन्याचा विध्वंस करीत तेथें येऊन थडकला,

व बाणांच्या व अस्त्रांच्या बेदम माराखालीं कौरवांस जेर करणाऱ्या अर्जुनानें सायंकाळपर्यंत धर्मास संभाळून घेतलें !

अर्जुनाला दुसरीकडे लढाईत गुंतवल्यावांचून कांहीं आतां हें प्रकरण निभत नाहीं असें वाटणाऱ्या दुर्योधनाची चिंता त्रिगर्ताधिपति सुशर्मा व त्याचे पांच भाऊ ह्यांनीं, " मारूं किंवा मरूं " या प्रतिज्ञेवर अर्जुनास दुसऱ्या दिवशीं युद्धास हटकण्याचें कबूल करून, दूर केली व त्याप्रमाणें त्यांनीं दुसऱ्या दिवशीं युद्धास तोंड लागल्याबरोबर अर्जुनास युद्धास हटकलेंच ! युद्धास किंवा द्यूतास हटकलें असतां नाहीं म्हणूं नये असा त्यावेळचा क्षात्रियांचा नियम होता. पण कोणचा नियम पाळायचा, व तो किती, कसा पाळायचा इत्यादि गोष्टींचा सारासार विचार ज्याचा त्यानें करावयास पाहिजे. नाहींतर मग, " धीर धरुनि धर्मज्ञें धीरें धैर्यें धनुष्य चढविलें " हें आहेच ! युद्धास हटकलेला अर्जुन त्या संशतकाबरोबर गेला याचें कारण वायूच्या वेगानें परत येऊन धर्माचें रक्षण करण्याची हिंमत व ताकद त्याच्या अंगांत होती ! द्यूताच्या बाबतींत शकुनिचा कपटाचा डाव सुद्धां न ओळखतां येणाऱ्या धर्माची ताकद कितपत होती, हें आपण मागें पाहिलेंच आहे. दुसरें असें कीं, द्यूत हें अनार्य व पापपूर्ण व्यसन आहे, व युद्ध म्हणजे 'धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोन्यत् क्षत्रियस्य न विद्यते ॥' अशी पुण्य व मंगलमय बाब आहे हाहीं फरक लक्षांत ठेवला पाहिजे. पण तो लक्षांत न ठेवल्याचा परिणाम काय झाला, हेंही आपणांस ठाऊकच आहे—आपण मागें पाहिलाच आहे. अस्तु.

संशतकांच्या नायक सुशर्म्यांनीं अर्जुनास युद्धास हटकल्याबरोबर सात्यकीला धर्माचें रक्षण करण्यास सांगून, धर्माविषयींच्या कांहींशा काळजीनेंच, अर्जुन संशतकांबरोबर झगडण्यास निघून गेला. इकडे ही संधी साधून द्रोणाचार्यांनीं पुनश्च एकदां धर्मास धरण्याचा प्रयत्न केला. व या कामीं त्यांना इंद्रसखा भगदत्त याचें चांगलेंच साहाय्य झालें. कारण धर्माच्या रक्षणासाठीं त्याच्या आसपासच झगडणाऱ्या भीमावर भगदत्तानें आपलें गजसैन्य घातलें, व त्याच्या ' सुप्रतीक ' नांवाच्या हत्तीनें मालकाच्या आज्ञेनुसार भीमावर दणकावून चाल केली. पण भीमाच्या

गदाप्रहारापुढें तो चीं चीं करीत मागें पळाला. भीमदादा रथावरून खालीं उतरून त्यांनीं नुसत्या गदेच्या तडाक्यानेंच कित्येक हत्ती ठार केलें. नवनागसहस्त्रबळी अशा त्या भीमापुढें त्या गजसैन्याचा कसचा टिकाव लागतो ? पण ते हत्तींचे चीत्कार व त्यांच्या पदाघातानें उडालेली ती धूळ, धर्माच्या आसपास वातावरणांत भरून राहिलेली पाहून, तिकडे संशप्तकांशीं लढणाऱ्या अर्जुनाच्या मनाला धर्माच्या सुरक्षिततेविषयीं जास्तच काळजी वाटूं लागली, व क्षणैक धर्माच्या रक्षणार्थ आतांच जावें, कां त्रिगर्ताधिपांचा पूर्ण समाचार घेऊन मगच जावें, ह्याविषयीं तो बुचकळ्यांत पडला. वास्तविक तो मूर्तिमान् विजयच असल्यामुळें त्याचा पराक्रम, त्याच्या नुसत्या देवदत्त नांवाच्या शंखाच्या ध्वनीचा परिणाम पाहिला असतांही वाचकांस कळून येणार आहे. ऐका, पंत म्हणतात—" पार्थाचा प्रलय—घनाधिक दारुण देवदत्त दरवाजे । दरवाजेसे डोळे झांकिति आइकति भीति-द रवा जे ॥ " आणि त्यानंतर "वेष्टा धनंजयाला " " चेष्टा करूं न द्याव्या " इत्यादि वल्गना करणाऱ्या सुशर्म्यास व त्याच्या सर्व भावांसच आधीं कंठस्नान घालून मगच तिकडे धर्माकडे जावयाचें असें पार्थानें शेवटीं ठरविलें, व त्याप्रमाणें क्षणार्धांत त्यांचा मोड करून व त्यांस ठार मारून अर्जुनाचा रथ वाऱ्याच्या वेगानें धर्माकडे येण्यास निघाला! " अरि एक क्रोश पुढें लक्षुनि ज्या ज्या शरा विजय सोडी । क्रोश पुढें गेल्यावर मागे तो तो तदीय शिर तोडी! " या वेगास जगांत दुसरीकडे तोंड सांपडेल काय ? अस्तु. अर्जुनाचा विद्युद्वेगानें धांवणारा रथ धर्माच्या रक्षणास जात आहे असें पाहून भगदत्तानें आपलें गजसैन्य भीमावरून काढून तें अर्जुनावर घातलें, व अशा रीतीनें त्याचा मार्ग अडवून धरण्याचा यत्न केला. भगदत्ताचा पराक्रम व त्याच्या हत्तीची अवस्था अर्जुनापुढें कशी झाली त्याचें पंत मोठ्या बहारीनें वर्णन करतात:—" कुरुकटका तप्त करी पार्थ ग्रीष्मीं जसा पतंग जगा । तों प्रेषिला तयावरि भगदत्तें काळसा मतंगज गा ॥ होय पुढेंचि न मागें पार्थ-शराहतहि शत-मख-सखरे । मुनि म्हणति अर्जुनीं तव शक्ति जशी सागरांत खसखस रे ! ॥ विजयविशिखार्त होता, पूर्वीं दुष्करहि आयकोन करी । भगदत्ताचें कथिलें, अधनाचें जेंवि बायको, न करीं ! ॥ " मुनि त्याला—

भगदत्ताला–'सागरांतली खसखस' खुशाल म्हणोत. पण ह्याच 'खसखशीनें' ज्या वेळेस वैष्णवास्त्रानें अभिमंत्रून हातांतील खसखशींत अंकुश–अर्जुनानें बाणांच्या वृष्टीनें सर्व गजसैन्य ठार केल्यावर, अगदीं निर्वाणीचें अस्त्र म्हणून—जेव्हां अर्जुनावर फेंकला, त्या वेळेस तो प्रत्यक्ष श्रीकृष्ण-प्रभूला आपल्या छातीवर घ्यावा लागला–व त्याची लगेच वैजयंति माळ बनून प्रभूच्या गळां लटकूं लागली– हें लक्षांत ठेवण्यसारखें आहे! अर्जुनाच्या पृच्छेवरून त्या अस्त्राचें महत्त्व व त्याचें निवारण कसें फक्त आपणासच शक्य होतें इत्यादि गोष्टी त्यास सांगून कृष्णांनीं त्याचें समाधान केलें. अर्थात् हा शेवटचा प्रयत्नही हुकून भगदत्ताचें अवध्यत्व नाहींसें झाल्याबरोबर आमच्या वीर (!) अर्जुनानें एका अर्धचंद्र बाणानें भगदत्तास त्याच्या हत्तीसह ठार केलें. भगदत्तासारख्या कौरवाकडील दुय्यम प्रतीच्या योद्धयाची ही स्थिति ! त्यास दुर्बल करावयास प्रत्यक्ष भगवान् लागतात ! ह्यावरूनच कौरवांची मंडळी कशी शेलकी होती, व पांडवांना बहुतेक मोठीं मोहरीं कशीं कपटानें किंवा कृष्णाच्या साहाय्यानेंच मारावीं लागलीं, ह्याचा चांगलाच उलगडा होतो व, " योगेश्वर कृष्ण " पांडवांच्या बाजूस होते, म्हणूनच त्यास जय मिळाला असें साफ ठरून, " यत्र पार्थो धनंजयः । " हें पुढील अर्ध पराक्रमाच्या दृष्टिनें तरी काढून टाकावें असें सुद्धां क्षणैक वाटतें. अस्तु. याचा अर्थ असा नव्हे कीं, अर्जुन हा कमी शूर होता. पण मोठमोठ्या प्रसंगीं मात्र त्याची कांहींच मात्रा चालली नाहीं. व (" मयैवेते निहताः पूर्व मेव " तस्मात्) " निमित्त मात्रं भव्य सव्य साचिन् । " ह्या प्रभूच्या सांगण्याप्रमाणें खरोखरच आमचा अर्जुन त्या त्या प्रसंगीं केवळ 'निमित्तमात्र' झाला असें म्हटल्यावांचून मात्र आमच्यानें रहावत नाहीं ! बाकी त्याच्या एरवींच्या शौर्याबद्दल वादच नाहीं. प्रस्तुतच पहाना. भीमाच्या बाणवृष्टीस न जुमानतां जो हत्ती त्याच्यावर धुसला, तोच अर्जुनाच्या तीव्र बाणांपुढें क्षणभर सुद्धां टिकाव धरीना–भगदत्ताची आज्ञा तो साफ नाकारूं लागला, अशा तऱ्हेचें वरील वर्णन भीमार्जुनांच्या शरसंधानपाटवांतील फरक उघड करून सांगत आहे. टेनिसचा बॉल मारायला त्याची रॅकेट धराणारा हात सँडोचाच पाहिजे असें नाहीं तर त्या हाताचें मन-

गट चपळाईनें वांकविण्याचें कौशल्य त्या खेळणाऱ्याच्या अंगीं लागतें. तीच गोष्ट इथेंहि आहे. चेंडू नीट लागून जाळ्यापलीकडे जात नाहीं म्हणून शेवटीं 'रामटोला' मारणाऱ्या गड्याप्रमाणेच भीमदादांस शेवटीं रथावरून उतरून गदा हातीं घ्यावी लागली, हें आपण वर पाहिलेंच आहे; ती तरी गोष्ट हेंच सांगते. असो; पण यावरूनही भीमाचा पराक्रम कमी होता असें वाटण्याचेंहि कारण नाहीं. कारण तो आपणास लवकरच कळणार आहे. पण शक्ति व युक्ति उर्फ कौशल्य यांतील पहिली भीमाजवळ, तर दुसरी अर्जुनाजवळ. प्रामुख्यानें वसत होती एवढेंच आम्हांस म्हणावयाचें आहे. असो. भगदत्ताच्या वधानंतर आडव्या आलेल्या गांधारसैन्यास उडवून देऊन–शकुनिमामादिकांस पळावयास लावून–( कारण इथें कांहीं कपटाचे फासे टाकायचे नव्हते ! )–अर्जुन धर्माच्या रथाजवळ जाऊन थडकला. थोडक्याच वेळांत सूर्यही अस्तास जाऊन युद्ध थांबलें. कादंबरीच्या दृष्टीनें पहातां असत्पक्षास अधिक बळवान् दाखवून त्याहून कमी बळाच्या सत्पक्षाचाच शेवटीं प्रभूच्या कृपेनें कसा विजय होत असतो, हें तत्व व्यासांनीं या युद्धांत फारच उत्कृष्ट दाखविलें आहे. अस्तु.

द्रोणपर्वाचा तिसरा व बालवीर अभिमान्यूच्या आयुष्यांतला शेवटचा, दिवस उगवला. भवितव्यता मोठी बलवत्तर आहे ह्यांत शंका नाहीं ! ती मनुष्याच्या हातून कधीं कधीं सहज अशा गोष्टी घडवून आपला कार्यभाग साधीत असते ! इथेंच पहाना. आदल्या दिवशींच्या शिरस्त्याप्रमाणें संशप्तकयोद्ध्यांनीं–त्यांचे पुढारी अर्जुनाच्या बाणांखालीं गारद झाले होते तरी–आजही अर्जुनास युद्धास हटकलें, व अर्जुनही तिकडे जाऊन तो भीष्मपर्वापासूनच्या पद्धतीप्रमाणें–"शरपटलातूनि निघे घनपटलांतूनि अर्यमा साच । रिपुवाहिनींत तरतां भासे तो वीरवर्य मासाच !॥" याप्रमाणें तो आपल्या अतुल पराक्रमानें संशप्तकास दिपवीत असतां इकडे केवढा घोर अनर्थ ओढवला होता, ह्याची बिचाऱ्यास कल्पनाही नव्हती. द्रोणाचार्यांनीं रचलेला चक्रव्यूह त्यास माहीत नव्हता काय ? नसल्यास त्याकडे बिलकुल दोष येत नाहीं. परंतु त्यास तो कदाचित् माहीत असावा असें त्याच्या मागाहूनच्या उद्गारावरून वाटतें, व मग मात्र युद्धास हटकले कीं जायचें, ह्या नियमाचें पालन त्यानें अति केलें–सारासार विचार सोडून

केलें–त्या कैफींत तो तिकडे गेला, असेंच म्हणणें भाग पडतें. कारण, चक्रव्यूह भेद करणें ही गोष्ट जर अवश्यक ठरते, व मागें राहिलेल्या मंडळींत तें जर अभिन्यूवांचून दुसऱ्या कोणास ठाऊक नव्हतें हें जर तितकेंच खरें, तर मग मागून संतापाच्या भरांत इतरांस शिव्या देऊन काय उपयोग ? धर्मराजांनीं त्या कामीं घ्यायची तितकी खबरदारी घेऊन, अभिमन्यूच्या पाठीवर भीमादिमंडळीस पाठविलेंच होतें. इतकेंहि करून खुद्द धर्मानें अभिमन्यूच्या मृत्यूची बातमी ऐकून स्वतास बोल लावीत अपार शोक केला, तो त्याच्या हृदयाची वत्सलता दाखवीत आहे इतकेंच. पण होणाऱ्या प्रारब्धास कोण काय करणार ? द्रोणांचा चक्रव्यूह धडधडीत डोळ्यापुढें पाहून, व आपणावांचून दुसरा कोणीही तो भेदून परत येऊं शकणार नाहीं हें ठाऊक असूनही, द्रोणांचा हा डाव न ओळखतां त्या वृद्ध विप्राच्या त्या डावास तो बळी पडला, व युद्धास हटकणाऱ्या संशप्तकांच्या पाठोपाठ तो निघून गेला, असेंच म्हणावें लागेल. पण "युद्धास गोंविला अर्जुन। इकडे काय झालें वर्तमान। चक्रव्यूह गुरुद्रोण। रचिता झाला अद्भुत॥" ह्या श्रीधरोक्तिप्रमाणें पाहातां मात्र ती गोष्ट अर्जुनास आधीं ठाउक नव्हती, व मागाहून तर्कानें त्यानें ती अजमावली असावी असें दिसतें; व आम्हासही तीच गोष्ट अधिक संभाव्य वाटते. अर्थात्, असें असल्यास अर्जुनाकडे तिळमात्रही दोष येत नसून–नव्हे तो कुणाचाच दोष नसून–ही करणी पुष्कळशी भवितव्यतेचीच होती, असेंच होणार आहे. अस्तु.

सौभद्र अभिमन्यूनें धर्माची परवानगी मागितली–"सौभद्र म्हणे शिरतों व्यूहीं डोहीं जसा मतंगज, वा। हरिपोत दंतयूथीं," यावर त्याच्या भावीं नाशाचें चित्र डोळ्यापुढें येऊनच कीं काय, पंत पुढें उत्तरार्ध पुरा करतात,–"कीं दहनीं करुनिया पतंग जवा॥" पण भावी भावितव्यता आधीं कोणी पाहिली असते ? बाळ अभिमन्यूचें अप्रतिम सौंदर्य त्याच्या बाळपणींच्या मृत्यूच्या करुणकाव्यांत अधिकच भर घालीत आहे! कारण सौंदर्यहानि ही कविहृदयास अधिकच दुःख देते. श्रीधर त्याचें सौंदर्य वर्णितात–"परम सुंदर सुभद्रासुत। रूपासि तुळितां उणा मन्मथ।" आणि असा हा–"सुहास्य वदनाचा बाळक सुकुमार"

ज्यावेळेस रथावर चढला तेव्हां-"उदयाद्रीवरि दिनकर । तैसा सुंदर दिसतसे !॥" याप्रमाणें रथारूढ झालेला हा बालवीर ज्यावेळीं भीमादिकांसह कौरवसैन्यावर घसरला त्यावेळेस माजलेल्या घनघोर संग्रामाचें पंत वीररसयुक्त वर्णन करितात.-"रथ थडकले, भडकले हय, शस्त्रज वन्हि धडकले वरते। अन्योन्य द्वयंगुलही राहो देती न धड कलेवर ते ॥" याप्रमाणें हजारों शस्त्रांच्या खणखणाटांत 'इंद्राहूनही शूर,' असा आमचा अभिमन्यु त्या व्यूहाचा भेद करून त्या बालवीर्याच्या उत्सुकतेंत त्यानें त्या व्यूहाच्या आंत-जणों काळमुखांतच-उडी घेतली, व विलक्षण कांगकापीस व अप्रतीम लढवय्येपणा गाजविण्यास त्यानें सुरवात केली. "व्यूहीं द्वार करी," एवढीच धर्माची आज्ञा असतांनाही लहानपणच्या पराक्रमाच्या अनिवार मोहांत बिचारा काळगतेंत शिरला. इथेंच त्याचें पुरें दुर्दैव ओढवलें. कारण पहिल्या सपाट्यासच दुष्ट जयद्रथानें शंकरापासून मिळविलेल्या वराच्या जोरावर-'क्षुद्रवरें रुद्रवरें' भीमादि सर्व पांडवसेना अडवून धरली, व अभिमन्यूस त्यांच्यापासून वेगळें पाडलें! अपार पराक्रमाच्या गुंगींत अभिमन्यूस याची जाणीवच नव्हती. आज तो अतुल वीर्याची जणों भांग प्यायला होता, व तिच्या थरारींत त्याचें कंदनाचें काम सुरू होतें! "प्रभुता मर्मीं हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा। वाटे बहु सिंहाशीं समर करी कुपित पोत शरभाचा !॥" धृतराष्ट्राला ही गोष्ट खरीही वाटेना. तो म्हणतो, "अंध म्हणे रे संजय हें त्या पौत्रास वर्ष सोळावें। लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकासि घोळावें ॥" हें खरें काय? अंधळयास तें खोटें वाटलें, पण दिव्य दृष्टीनें युद्धाचा 'चित्रपट' डोळ्यापुढें पाहणारा संजय उत्तर करतो, "संजय म्हणे म्हण अद्भुत, भीष्माचा एकला पणतु मुलगा। करिता झाला गुहसा बहुतांनीं वेढिला रण तुमुल गा ॥" श्रीधरांनीं केलेलें त्याच्या पराक्रमाचें वर्णन असेंच वाचनीय आहे. "सहस्रावधी राजपुत्रांनीं रक्षिलेल्या व्यूहाची फळी आपल्या बिजलीसारख्या तळपणाऱ्या तरवारीनें फोडून, दहा हजार हत्ती, अयुत महावीर व महारथी यांना आपल्या पट्ट्याचें पाणी पाजीत जात असतां" वगैरेप्रमाणें जयद्रथानें त्यास एकाकी बनविलें तेव्हांचा चमत्कार तर याहूनही खरोखर अद्भुत व 'बापसे बेटा सवाई'

असें म्हणावयास लावणारा होता. प्रत्यक्ष द्रोण गुरूनीं तो चमत्कार पाहून मस्तक डोलविलें आहे. पहा त्याचा पराक्रमः—"बाण सोडीत धांवला कर्ण। दों बाणीं छेदिलें त्याचे कर्ण। आंग काढुनी भानुनंदन। पळतां झाला एकीकडे ! ॥ दश बाणीं सुयोधन खिळिला। द्रोण पांच-बाणीं विंधिला। जयद्रथ तात्काळ पळविला। एका बाणें करोनी ! ॥ अश्वत्थामा कृपाचार्य। हेही पळती गतवीर्य। देखोनि अभिमन्यूचें शौर्य। द्रोण मस्तक डोलवी ! ॥" अहाहा ! द्रोणच काय, पण जगांत असा कोण पामर आहे कीं, ज्याचें मस्तक हें ऐकून आनंदानें डोलणार नाहीं ? ह्या अतुलनीय पराक्रमास जगाच्या इतिहासांत तोड सांपडेल काय ? कर्ण, द्रोण, अश्वत्थामा, ह्यासारख्या अजिंक्य वीरास ज्यांनीं पाणी पाजलें त्याचा पराक्रम केवढ्या असामान्य कोटींतला असला पाहिजे याची कल्पना करणेंही कठीण आहे ! अर्जुनाचा पराक्रम पाहून भीष्मांनीं ज्याप्रमाणें, " वीजया वीरा भला भला बाहूं। बाहूस तुझ्या दृष्टि न लागो," म्हणून खऱ्या सहृदय व उदार वीराप्रमाणें त्याची पाठ थोपटली, त्याचप्रमाणें–"हर्षवितो मज पुत्राहूनि, नव्हे हा कुमार सामान्य!" इत्यादि प्रकारें द्रोणांनींही अभिमन्यूची स्तुति केली आहे. पण " भेदुनि शरें उरस्थळ, चळचळ बळ नळधि कर्ण कंपविला।" असा ज्याचा अतुल पराक्रम तो कोणाही एकट्या वीरास हार जात नाहीं असें पाहून एकाकी सांपडलेल्या त्या एकट्या वीरावर–हाय! सहा जणांनीं–द्रोण, अश्वत्थामा कर्ण, कृप, कृतवर्मा, आणि बृहद्बल, या सहांनीं–एकदम हल्ला करून त्यास वेढलें व संकटांत सांपडलेल्या त्या पोराचे लचके तोडण्यास ते लांडगे तयार झाले ! सोळा वर्षांच्या त्या बाळावर याप्रमाणें सर्व बाजूंनीं हल्ला झाल्या-वर क्षणैक तो गांगरून जावा यांत कांहीं आश्चर्य आहे काय ? ज्या परा-क्रमाच्या गुंगींत अभिमन्यु इतका वेळ लढत होता ती ह्या अनपेक्षित हल्ल्यानें साफ उतरली ! व त्यानें चौफेर नजर फेंकली ! पण आपणास वेढून टाकणाऱ्या त्या लांडग्याशिवाय त्यास " आपुलें कोणी दिसेना !" केवढा तो विलक्षण प्रसंग ! " चहूंकडे पाहे सुंदर। आपुले कोणी दिसेना ! " या दोनच ओळींत श्रीधरांनीं वीर व करुण रसांचे खरोखर पूर्ण काव्य ओतलें आहे ! शत्रूची अथांग फळी फोडण्यास तयार होऊन पुढें सरसावलेल

व हां हां म्हणतां ती फळी फोडून आंत घुसून लवकरच दिसेनासा झालेला अभिमन्यु–तो अलौकिक बालवीर–शत्रूचा व्यूह खिळखिळा करून लवकरच सुखरूप परत येईल–आतां येईल, मग येईल, अशी पांडवपक्षीय जन आशा करीत होते. पण इकडे त्या बाळाचें कसें पुरें दुर्दैव ओढवलें होतें, याची त्या बिचाऱ्यांना काय कल्पना? केवळ सोळा वर्षांचा बाळ एकाकी व असहाय असूनही, आपल्या विजलीसारख्या तळपणाऱ्या आयुधांचें पाणी शेकडों वीरांना त्यानें कित्येक घटका पाजलें होतें. पण किती झालें तरी शेवटीं तो अजून बाळच होता. "ओठाच्यावरचाही जार अजुनी नाहीं तुझ्या वाळला!" अशी त्याची स्थिति होती. वास्तविक धृतराष्ट्रानें (अविश्वासानें) म्हटल्याप्रमाणें खरोखरच हें म्हणजे त्याचें खरें लढाईचें सुद्धां एका दृष्टीनें वय नव्हे. पण तें कुणाला? पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या तुह्माआह्मासारख्या लोकांना! स्वातंत्र्यांतले वीर अशा वयांत सुद्धां भयंकर मर्दुमकी गाजवीत असतात. शिवबानें स्वातंत्र्याचें निशाण सोळाव्या वर्षींच तोरणा किल्ल्यावर फडकविलें! विश्वासराव १४व्या वर्षींच पानपतच्या धुमश्चक्रींत–ह्याच कुरूक्षेत्राच्या मैदानावर पुढें गारद झाले, हें आपणास भारत वर्षांच्या उज्वल इतिहासांत पुढें पहावयास मिळणारच आहे! आमचा बाळ अभिमन्यु अशाच स्वातंत्र्याच्या शुद्ध वातावरणांत वाढलेला एक बालवीर होता, व त्यानें आपल्या भीमपराक्रमानें क्षणभर प्रत्यक्ष शत्रूसही आश्चर्यानें तोंडांत बोट घालावयास लावले होतें. पण अजून तो बच्चा होता, त्याच्या आसपास शत्रूचा अथांग सेनासागर सारखा उसळून राहिला होता, व वर सांगितल्याप्रमाणें ते सहा कावळे त्याच्याभोंवतीं–यास व्रण करण्यासाठीं एकच कलकलाट करून राहिले होते! चक्रव्यूहांतून पार कसें पडावें हें जर त्याला ठाऊक असतें, तर आपल्या तरवारीच्या पट्टयानें व बाणांच्या फेंकीनें शत्रूंचीं शिरकमलें उडवीत तो तसाच नक्की बाहेरही पडला असता! पण इथेंच त्याचें दुर्दैव पुरें ओढवलें. त्यास तें ठाऊक नव्हतें. दैवानें डाव साधला! व समरदेवतेला त्याच्या कोवळ्या रक्ताचा बळी मिळणार असा रंग दिसूं लागला! कारण तें पहा, दुर्योधनाच्या येथील तीन तुकड्यांवर देह पोसलेल्या, व त्याच्या दारचें श्वान होऊन राहिलेल्या द्रोणांनीं,

तशाहि भयंकर स्थितींत झगडून बृहद्बलास ठार करणाऱ्या अभिमन्यूचें धनुष्य कर्णास इशारत करून त्याजकडून तोडविलें, व कृतवर्म्यानें व कृपाचार्यांनीं–( खूपच कृपा दाखवून ! )–त्याचे घोडे व सारथी अनुक्रमें ठार केल्यावर, पादचारी होऊन ढाल तरवारीनें युद्ध करणाऱ्या त्या बाळाची तरवार–अरेरे, जणूं काय तो सत्पक्षाकडून लढतो आहे म्हणूनच कीं काय–मुठीजवळ मोडून टाकली, व " धर्मच राजा होण्यास योग्य आहे, व द्रौपदीस दुर्भाषणें बोलल्याचा मला पश्चात्ताप होत आहे!" म्हणून कृष्णाजवळ म्हणणाऱ्या कर्णानें त्याचें धनुष्य तोडलेंच होतें व आतां ढालीचेही तुकडे उडवले ! पण धन्य त्या अभिमन्याची कीं, सांपडेल तें शस्त्र हातांत घेऊन मरेपर्यंत लढण्याची त्यानें शिकस्त केली ! कुणीं काय मारलें, त्याला कुणीं कसा नागवला, या बाबतींत श्रीधरांच्या ओंव्या जरा निराळ्या आहेत. ( पण त्यांनीं वरील आमच्या म्हणण्यास– द्रोण व कर्ण यांच्यासंबंधींच्या उद्गारास–काडीइतकाही बाध येत नाहीं आहे. ) पण त्याच्या शेवटच्या पराक्रमाचें वर्णन फारच सुंदर आहे. हातांत तरवार घेऊन लढणाऱ्या–झगडणाऱ्या त्या वीराचा अंतकाळचा पराक्रम श्रीधरांनीं, " जैसी वीज लवोनी जाये। तैसा अभिमन्य तळपताहे। " ह्या दोनच ओळींत पण फारच बहारीनें वर्णन केला आहे. असो. वर म्हटल्याप्रमाणें ढालतरवारीचे तुकडे झाल्यावर चक्र, व तेंही निरुपयोगी झाल्यावर गदा घेऊन अभिमन्यु लढूं लागला, व अश्वत्थाम्यास मागें हटवून त्यानें दौःशासनीचे घोडे ठार केले, त्याबरोबर रथाखालीं उडी टाकून, " त्या सौभद्रावरि बळ–सागर गरगर गदेसि फिरवीत। दुःशासनसुत धांवे निज-भुज-भुजग-प्रताप मिरवीत ॥ " क्षणार्धांत दोघेही वीर एकमेकांवर आदळले, व एकमेकांच्या तीव्र गदाप्रहारांनीं दोघेही मूर्च्छित होऊन पडले ! पण ताज्या दमाचा दौःशासनी आधीं सावध झाला, व सहांच्याच नव्हे तर शेकडोंजणांच्याविरुद्ध एकटा व असहाय लढून थकलेल्या, पण तितक्यांत उठण्याचा प्रयत्न करणाऱ्या अभिमन्यूच्या डोक्यांत त्या नीचानें गदा घालून त्यास ठार केलें! अरेरे ! समोरासमोर लढतांना त्याच्यापुढें नुसतें उभे राहण्यासहि ज्यांची माय व्यायली नाहीं त्यांनींच त्याला अशा बेसावध स्थितींत गांठून

ठार करावें—त्याच्या डोक्यांत गदा घालावी हें काय धर्मयुद्ध ! ज्यानें आपल्या दिव्य पराक्रमानें प्रत्यक्ष शत्रूसहि—मोठमोठ्या वीरांसहि क्षणभर थक्क करून सोडलें, त्याचा त्याच वीरांनीं असा विश्वासघातानें खून करावा, ही गोष्ट अत्यंत शरमेची आहे! आतांपर्यंतचा युद्धप्रकार पाहिल्यास त्यांत आपणास विश्वासघात, कपट आणि नीचपणा पांडवांच्या बाजूस बिलकूल दिसून येत नाहीं. प्रथम मारलेल्या भीष्म सेनापतीस त्यांनीं उघड उघड विचारून—त्यांचें मरण त्यांसच विचारून—त्यांनीं सांगितलें त्याच मार्गानें त्यास मारिलें आहे. दुसरा मोठा वीर म्हणजे भगदत्त. ह्यासही पण कपटानें मारलेला नाहीं. त्याचा अंकुश कृष्णांनीं स्वतःच्या छातीवर घेतला यांत कपट तें काय झालें ? आपल्या मित्राचा वार आपण आपल्या अंगावर घेऊन त्याचें रक्षण केलें यांत काय बिघडलें ? तेव्हां कपटानें व विश्वासघातानें अधर्मयुद्धाचा पाया कौरवांनींच प्रथम घातला, असें म्हणावयास हरकत नाहीं. इतक्या दिवसांच्या, लढाईपूर्वींच्या, त्यांच्या कपटपूर्ण, नीच व विश्वासघातकी वर्तनाची बेरीज म्हणजे कांहीं कमी होती असें नव्हे. पण प्रत्यक्ष रणांगणावरहि त्याच कपटाचा व विश्वासघाताचा प्रयोग प्रथम करून त्यांनीं आपल्या इतक्या दिवसांच्या पापी इमारतीवर कळस चढविला—आपल्या पापाच्या हंड्यांत शेवटचा हसा टाकून तो त्यांनीं पुरेपूर भरला, व जणुं काय अधर्मयुद्धाचा मार्ग पांडवांस मोकळाच करून दिला. आतां जर राहिलेल्या द्रोण, कर्ण, दुर्योधनादि मंडळीस त्यांनीं कपटानें मारिलें तर त्यांत त्यांचा काय दोष ? तरीही, "त्यांनीं अधर्मयुद्ध केलें, कपट नीति स्वीकारली," म्हणून त्यांच्या नांवानें हाकाटी करणारे कांहीं असतीलच; असोत बापडे ! वाचकांनीं मात्र वरील उलगडा आपल्याशीं पाहून घ्यावा म्हणजे झालें. अस्तु. अभिमन्यूस ठार करूनच न राहतां जयद्रथानें —अप्रत्यक्षपणें, नव्हें, प्रत्यक्षपणेंच म्हटल्यास सुद्धां चालेल इतक्या अप्रत्यक्षपणें, त्याच्या मृत्यूस कारण होणाऱ्या जयद्रथानें—त्यास कशी लाथ मारली व उदार वीर द्रोणांनीं त्याचा कसा धिःकार केला ते श्रीधर सांगतात—" सकळ दळभार एकवटला । भोंवता पाहावया पाळा पडला । त्यांत जयद्रथें हाणीतला । अभिमन्यु लातेनें ॥ द्रोणें

धिःकारिलें जयद्रथा। दुर्जना, वीरा हाणिशी लत्ता। त्या अभिमन्यें बाणावरि झोडितां। पळालासि सत्वर!॥" पण ह्या लाथेची सव्याज फेड त्या 'दुर्जन' जयद्रथास दुसऱ्याच दिवशीं करावी लागली! ती कशी ती आपण आतां पुढील भागांत पाहूं.



# भाग ६ वा.

दौ:- शासनीच्या गदाघातानें चूर्णमस्तक झालेला अभिमन्यु ठार झाला होता काय ? रा. लिमये म्हणतात कीं, " तो तत्काळ मरण पावला. "+ व आम्हांसही तो अशा स्थितींत फार वेळ जिवंत राहाणें कठीण वाटतें. खुद्द त्याभोंवतीं गोळा झालेल्या मंडळींची—कौरवपक्षीयांची—व धर्मभीमादि पांडवपक्षीयांची, व त्यांच्यामुळेंच पुढें पार्थाची व द्रौपदीसुभद्रेची, तशीच—तो ठार झाला होता अशीच—समजूत झाली होती असें दिसतें. पण परमेश्वराची लीला मोठी अगाध आहे ! श्रीधरांच्या सांगण्याप्रमाणें पहातां, तशाहि स्थितींत आमचा बालवीर अजून जिवंत राहिला होता! त्यास अंतकाळाच्या भीषण वेदना होत होत्या व तो फारच थोड्या घटकांचा सोबती होता ही गोष्ट खरी; परंतु तो अद्याप जिवंत होता ही केवढी आश्चर्याची गोष्ट ? श्रीधर म्हणतात, " कौरव गेले समस्त । अभिमन्य घायें विलपत । श्रीहरीचें स्मरण करित । वाट पहात पार्थाची !" अहाहा ! यांत केवढा करुणरस सांठवला आहे ! अंतकाळच्या वेदनांतही श्रीहरीचें स्मरण करणाऱ्या बालकाची कृष्णभक्ति व कृष्णप्रेम येथें किती उत्कटपणें दिसत आहे बरें !

इकडे धर्मास ही वार्ता कळल्यावर त्याच्या शोकास मात्र पारावार राहिला नाहीं. " धर्म म्हणे हा हा म्यां मंदें दाडुनि कुमार मारविला ।" ह्या एकाच ओळींत पंतांनीं, व पार्थ, सुभद्रा, द्रौपदी यांच्या नंतरच्या—"यावेगळा अपारिमित । धर्माच्या शोकासि नाहीं अंत। " ह्या दोनच ओळींत श्रीधरांनीं, त्याच्या शोकाची तीव्रता वर्णिली आहे. "संशतक वधुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते। " त्या वेळेस भावी दुःखाचे—दुःखद

+ " भारतीययुद्ध " पान १८४.

वार्तेचे सूचक, असे त्यास विकार होऊं लागले. शत्रूस कापून थर थर कांपावयास लावणाऱ्या बापड्याचें मन आज कंप पावूं लागलें! "कंठ गहिवरें भरला, शिरली हृदयांत केशवा धडकी।" अशी त्याची स्थिति झाली व, "येतें रडें वृथा कां, बा माझी प्रकृति काय गा रडकी?॥" असें तो कृष्णास विचारीत आहे. "देवा, आज तुमचा आवडता–लाडका भाचा मला कसा हो सामोरा आला नाहीं? देवा, सांगाना! तुम्ही असे गप्प कां?" अर्जुन बोलत होता. बिचारे श्रीकृष्ण त्यास काय सांगणार? तो मेला म्हणून त्यांनीं त्यास कसें सांगावें? मृताची वार्ता कोणी लवकर सांगत असतो काय? "शिबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिलें अधोवदन।" अशी शिबिरांत आल्यावरहि त्यास स्थिति दिसून आली. "उत्साह मंदिरीं न दिसे।" सगळीकडे औदासिन्याची छाया पसरलेली पाहून अर्जुन मनांत चरकलाच! कारण "तें पुत्ररत्न एकचि न निरखिलें सद्गुणर्द्धिचें सदन।" परंतु असें कुठवर चालणार? त्याच्या प्रश्नावरून शेवटीं–"भीमसेन। म्हणे संसारमाया अभिमन्य। त्यजूनि गेला स्वर्गातें।" ही वार्ता–हा वज्राघात कोणच्या पित्याच्या हृदयाला सहन होईल? "मृदुल–प्रकृति न साहे सुत–शोका जेविं न रविला पाला। शिबिरीं करी परोपरि नारायण–मित्र नर विलापाला॥" त्या वज्रघाताबरोबर "रथाखालीं पडला अर्जुन। पुत्रशोकें करी रुदन।" अशी त्याची स्थिति झाली असें श्रीधरहि सांगतात. "हाय! हाय! वज्राघाताहूनहि तीव्र अशा ह्या शोकानें माझी छाती फुटून कशी जात नाहीं? हाय! बाळा, "हा वत्सा, रक्ताक्षा, झाले त्वत्सुगुण आजि घातकसे। बा वाहिले परांचे तुजला मारावयासि हात कसे?॥" याप्रमाणें अर्जुनाचा परोपरीनें छाती पिटून विलाप चालला आहे, व हळु हळु धर्माच्या सांगण्यावरून, "होय जयद्रथ आम्हां हेतु कुमारास अंतरायास।" कारण, "आम्हां त्या क्षुद्रवरें रुद्रवरें करुनि वारिलें वाटें।" इत्यादि धर्माच्या सांगण्यावरून, या अनर्थाचें मूळ झालेल्या जयद्रथाचा त्यास संताप येऊन त्याचा चेहरा गंभीर होत आहे तोंच, "उपप्लव्य नगरीहुनी। उत्तरा सुभद्रा धांवुनी। त्वरें आल्या बसोनि वाहनीं। हृदय पिटीत अति दुःखें" आणि सगळीकडे पुन्हां त्या शोकसागराला भरती आली! "सुभद्रेतें न धरवे धीर।

आंग टाकिलें पृथ्वीवर। माझा अभिमन्यु सुकुमार। दावा एकदां पाहीन मी!॥ हे अभिमन्या कमललोचना! । हे सौभद्रा चंद्रवदना! । हे कोमलांगा मधुरभाषणा ! । ये धांवूनि मज भेटे ! ॥ " याप्रमाणें, " उत्तरेच्या गळां मिठी घालिती । सुभद्रा द्रौपदी शोक करिती । तें देखोनि पार्थश्रीपती । शोकार्णवीं बुडाले ॥" आणि ह्याला कारण धर्माच्या गप्पा मारणारे कर्णद्रोणादि मंडळी पुष्कळशी झाली—नव्हे सर्वस्वी झाली, असेंहि म्हणावयास हरकत नाहीं—हें लक्षांत घेतां त्यांच्या 'थोरपणा'ची चांगलीच ओळख पटते. पण त्याची सविस्तर हजिरी आम्ही लवकरच पुन्हां एकदां पुढें घेणार आहोंत, म्हणून इतक्यांवरच इथें थांबतों.

सुभद्रेच्या शोकास अपार भरती आली, हळूहळू त्याचें रूपांतर संतापांत व सूडेच्छेंत झालें, व " विकळ पडतां माझें किशोर । जयद्रथें दिधला लत्ताप्रहार । धिक् गांडीव धिक् तूणीर । धिक् यदुवीर पार्थ पैं ॥ " ह्याप्रमाणें ती बोलू लागली. अर्थात् अर्जुनाच्याहि अंगाचा भडका झालाच होता, त्याच्या भरांत त्यानेंहि पण उलट उत्तर दिलें—"सुभद्रेसी म्हणे पार्थ । उद्यां वधीन जयद्रथ । कौरव दल समस्त । तृणवत् जाळीन पै ॥" नाहींतर—" कृष्णदास्य व्यर्थ गेलें ! " त्यानंतर त्या बाळाचें शेवटचें दर्शन तरी घ्यावें म्हणून रात्रींच, ' पार्थ आणि घननीळ ' निघाले. " रथ वेगें चालविला । चंद्रज्योतीचा प्रकाश केला । रण शोधावया निघाला । पार्थवीर तेधवा॥" त्या बालवीरानें पाडलेल्या हजारों मुडद्यांकडे पाहून, "आश्चर्य करिती कृष्णार्जुन । " " धन्य आहे त्या बाळाची ! " अर्जुन म्हणाला, " अहाहा ! बाळ, तूं आतां कुठें असशील ? "—इतक्यांत " तों मंजुळ हरीचें स्मरण । ऐकतां हाय अर्जुन । हे जगन्निवास मन—मोहन । मधूसूदन श्रीहरी!॥" आपल्या बालकाचे कोमल शब्द कोणच्या पित्यास ओळखत नाहींत ? तावडतोब अर्जुन श्रीकृष्णासह तेथें जाऊन पोंचला. तेव्हां " सौभद्रें नेत्र उघाडले । पार्थें आंग धरणीसी टाकिलें । अभिमन्यासि पोटीं धरिलें । पार्थें मांडिलें शोकातें !" परंतु अभिमन्यूनें हलक्या व खोल गेलेल्या आवाजांत अर्जुनाच्या कानांत सांगितलें, " बाबा, मी या घोर रणभूमीवर पडलों याचें मला तिळमात्र दुःख होत नाहीं. ' व्हावें शस्त्रींचि रणीं वीरांचें गलित वपु न रोगानें ' असा भीष्मपितामहांनीं केलेला उप-

देश बाबा, तुमच्या लक्षांत नाहीं का ? मग मी त्यासाठीं कसा बरें शोक करीन ?" आपल्या बाळाच्या ह्या विलक्षण धारणाशक्तीचें कौतुक वाटून, व तो आतां थोडक्यांच क्षणांत आपणास अंतरणार हें मनांत येऊन, अर्जुनास अधिकच भडभडून आलें ! शूरांचीं हृदयें वज्राप्रमाणें कठोर असतात पण त्याजबरोबर त्यांच्या हृदयांत स्नेह, माया, दया, प्रेम इत्यादि विकारांचीहि वसति असतें व त्यामुळें त्यांनीं ढाळलेल्या अश्रूंनीं त्यांस कांहींच वैगुण्य येत नाहीं, हा बोध 'soldier's tear' नावाच्या आंग्ल कवितेंतही आपणास पहावयास सापडतो. त्या कवीप्रमाणेंच आम्हीही वाचकांस प्रार्थितों कीं, अभिमन्यूसाठीं अश्रु ढाळणाऱ्या ह्याच वीरास तुम्ही उद्यां रणांगणावर पहा, म्हणजे तुम्हांस त्याचें वज्रपंजर हृदय तेथें दिसून येईल. फार लांब कशाला ? इथेंच पहा. अभिमन्यूनें ज्यावेळेस, " मी निचेष्टित पडलों एथें । मज लत्ता–प्रहार केला जयद्रथें । तेणें सर्वांग तिडकतें । हें मज दुःख अतिभारी ॥" असें सांगितले. त्यावेळेस तत्काळ, "तुझें उसणें घेईन । कांहीं खेद न करावा ॥" असें त्यास आश्वासन देऊन तिथल्यातिथें–( कृष्णकृपेच्या जोरावरच जणुं काय )–अर्जुनानें प्रतिज्ञा केली कीं, " उद्या जरी न मारीन जयद्रथासी । तरी अग्निकाष्ठ भक्षीन निश्चयेंसी । तुझीच आण अभिमन्या ॥" खुद्द अभिमन्यूचें हृदयही क्षुद्र शरीरवेदनांची किंमत किंवा क्षिती कितीसें बाळगीत होतें हें आतांच सांगितलें, त्यावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते. असो. याप्रमाणें अर्जुनाकडून आश्वासन मिळाल्यावर, लत्ताप्रहाराच्या अपमानानें तळमळणारा त्या बालवीराचा आत्मा शांत होऊन हरिचिंतन व हरिध्यान करीत लवकरच ह्या नश्वर जगास सोडून गेला ! " न्याहाळीत कृष्णवदन । मुखीं करीत हरिस्मरण । अभिमन्यें सोडिला प्राण । श्रीकृष्ण आपण पाहातसे !" असें श्रीधरांनींहि त्याचें हृदयस्पर्शी वर्णन केलें आहे ! अस्तु.

वर सांगितल्याप्रमाणें संतापाच्या भरांत अर्जुनानें प्रतिज्ञा भोगली खरी, पण ती पुरी करणें तितकेंच कठीण होतें. खुद्द भगवंतांनीं, आपणांस न विचारतां ती प्रतिज्ञा केली म्हणून, अर्जुनास दोष दिला आहे, व द्रोणादि धेंडें त्याचें रक्षण करण्यास आहेत तोंवर ती सिद्धीस नेणें किती कठीण आहे, हेंही त्यास नीट पटवून दिले. तेव्हां अर्जुनासही तें पटून त्यास आपली

प्रतिज्ञा पार कशी नडेल, अशी मोठीच चिंता येऊन पडली. किंबहुना त्यामुळें, " निद्रा नाहीं अच्युताला । चिंताग्नींत पडियेलें ॥" अशी स्थिति झाली. अर्जुनाचा निरोप घेऊन ' स्वशिबिरीं ' जाणाऱ्या कृष्णास शेवटीं अर्जुनानें हात जोडून प्रार्थिलें कीं, " भक्तकैवारिया माधवा । पण आतां सिद्धी न्यावा । दीनबंधो करुणार्णवा । ब्रीद आपुलें सांभाळीं॥ " त्यावर, " पार्थें प्रतिज्ञा केली दुस्तर । सिद्धीस पावो सर्वेश्वर । " असें म्हणत श्रीकृष्ण स्वतःच्या गोटाकडे वळले. जसें कांहीं त्यांच्यावांचून ' सर्वेश्वर ' दुसराच कोणी होता ! परंतु प्रत्यक्ष ईश्वरावतार असूनही त्यांची ही निरभिमानता पाहून त्या प्रभूचें किती कौतुक करावें तेंच आम्हांस समजत नाहीं ! अस्तु.

शिबिरांत येऊन शयनावर निजलेल्या प्रभूस 'उद्यां अर्जुनाची प्रतिज्ञा पुरी कशी होणार' ह्या चिंतेनें मध्यरात्रपर्यंत बिलकुल झोंप येईना. चिंतेची सारखी तळमळ सुरू होती. ' शयनीं निजोनि पाहे परमेश्वर परि न तिळहि निज लागे ।' तेव्हां मग, "देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणोनी । त्यासी वदे प्रतिज्ञा पार्थाची प्रथम सर्व जाणवुनि ॥" देव म्हणाले, " दारुका, तुला काय सांगूं ? 'भक्ती जसा मदात्मा देहींहि तसा न दारुका रमला । या विजय वेद-वचना ध्याना लागे सदा रुकार मला ॥' भक्तांचें परित्राण करणें दारुका, माझें नेहमींचेंच कर्तव्य आहे. कारण असें पहा, " निज रक्षणाधिक ध्वजरक्षण राजासि दारुका पडतें । मोलें राजशिराहुनि बहु असतें काय दारु कापड तें ?॥" तसेंच दारुका, "धनंजय असे माझा प्राण । मज त्यावीण न गमेचि ॥" हीही गोष्ट लक्षांत घे! उद्यां जर अर्जुनास अग्निकाष्ठें भक्षण करण्याचा प्रसंग आला, तर—तर— दारुका, माझी स्थिति काय होईल ? " नुसत्या कल्पनेनेंही अंगावर शहारे येऊन अंग थरथरावीत देव म्हणाले, " यासाठीं दारुका, " देव पुढें म्हणतात, " उद्यां शैव्य, सुग्रीव, मेघपुष्प, आणि बलाहक ह्या चार घोड्यांस जुंपून व त्यांत शंख, चक्र, गदा, पद्मादि सर्व सतेज आयुधें ठेवून खुद्द माझा रथ अगदीं जय्यत तयार ठेव, समजलास. म्हणजे जर कांहीं पार्थास बरें वाईट होण्याची उद्यां वेळ आली, तर मी तुला खूण करीन, त्यासरशी वाऱ्याच्या वेगानें माझा रथ मला बसायला घेऊन ये, म्हणजे मग ह्या

दुष्टांच्या गमजा मी स्वतःच पाहीन! माझ्या भक्तांस विपरीत करूं पाहाणाऱ्या त्या दुष्टावर, 'सोडोनिया सुदर्शन । संहारीन कौरव दुर्जन । ' मग माझ्यापुढें उभे राहण्यास कोणाची माय व्यायली आहे तें मीही पाहून घेईन! दारुका, माझ्या भक्तांचा मी दासानुदास आहे. त्यांच्या रक्षणासाठीं झटणें माझें परम पवित्र कर्तव्य आहे. मग त्यापुढें मीं माझी प्रतिज्ञा वगैरें चटसारें पार विसरून जातो. कारण माझ्या भक्ताहून मला ह्या जगांत कांहींच प्रिय नाहीं. भीष्मानीं असाच भयंकर प्रलय करून शस्त्र धारण करण्याचा मजवर दोनदां प्रसंग आणलेला तुला ठाऊकच आहे. यासाठीं दारुका, मीं सांगितलेलें नीट लक्षांत आलेना? जा आतां; नीज जा, " ऐसें सांगोन जगन्मोहन। शयनावरी पहुडला ॥ " ईश्वराची ही चिंता—प्रभूस वाटलली भीति—कांहीं अनाठायीं नव्हती. कारण दुसरे दिवशीं तसाच जवळ जवळ प्रसंग ओढवल्याचें आपणास लवकरच दिसणार आहे. असो. परमात्मा निद्राधीन झाले आहेत, तोंवर आपण जयद्रथाची थोडीशी हालहवाल पाहून येऊं या.

हा जयद्रथ काय किंमतीचा मनुष्य होता—कसा ' क्षुद्रवर ' होता—हें आपणास पूर्ण ठाऊकच आहे झोंपडींत पांडव नाहींत, असें पाहून द्रौपदीला रथांत घालून पळविण्याचा यत्न करणारा, व चूर्णविचूर्ण मस्तक होऊन भूमीवर निश्चेष्ट पडलेल्या अभिमन्यु बालकाच्या—त्या बालवीराच्या—मस्तकास लत्ताप्रहार करणारा हा सैंधव, पक्का भ्याड आणि नीच नरपशु होता! पहिल्या नीच भागुबाईपणाचें बक्षीस त्यास तिथल्या तिथें लवकरच मिळालें. दुसऱ्या कृत्याचें बक्षीस त्यास उद्यां मिळणार आहे, व तेंच आपणास आतां पहावयाचें आहे. संशप्तकांचा वध करून आलेल्या अर्जुनास ज्यावेळीं आपला अभिमन्यु ' हिरा हरपला ' असें कळलें, त्यावेळेस त्यानें भयंकर प्रतिज्ञा करून जेव्हां आपला देवदत्त शंख त्याच रागाच्या सपाट्यांत फुंकला, व इतरही पांडवांनीं जयघोष केला, त्यावेळीं ती बातमी ऐकून जयद्रथाचें धाबें किती दणाणून गेलें असेल, व दुसऱ्या दिवशीं फांशीं जाणाऱ्या कैद्याच्या मनस्थितीशीं सदृश अशी त्याची मनस्थिति कशी झाली असेल, याची वाचकांनींच कल्पना करावी. कारण पार्थप्रतिज्ञा म्हणजे एका असामान्य धनुर्धारी वीराची व कृष्ण परमात्म्याच्या लाडक्या

भक्ताची प्रतिज्ञा होती ! ती खोटी ठरणें जवळ जवळ अशक्यच होतें. तेव्हां आपला मृत्यु २४ तासांवर येऊन ठेपला, हें पाहून त्याच्या काळजानें ठावच सोडला, व " जीव वांचविण्यासाठीं मी कोठें तरी निघून जातों " असें तो म्हणूं लागला. पण दुर्योधनादिकांनीं व खुद्द द्रोणांनीं त्याच्या रक्षणाचें आश्वासन देऊन, त्यास कसाबसा थोपवून धरला. खुद्द द्रोणांनीं हमी घेतल्यामुळें त्याच्या जीवांत जीव आला, व धैर्य धरून तो तसाच छावणींत राहिला. जयद्रथास दिलेलें हें आश्वासन द्रोणांनीं दुसऱ्या दिवशीं किती पाळलें हें, पार्थानें खरोखरच म्हटल्याप्रमाणें २४ तासांत जयद्रथाचा मुडदा पाडला यावरून दिसतेंच आहे. द्रोणानीं अगदींच घडपड केली नाहीं, असें नाहीं. किंबहुना दुसऱ्या दिवशीं त्यानीं पुष्कळच पराक्रम केला पण ते जिवंत असेपर्यंत अर्जुन त्यांच्या धुढून जयद्रथाकडे निघून जातो, व त्या कामीं द्रोण त्याची उपेक्षा करतात, यावरून तें भीष्माप्रमाणेंच—केवळ मनानेंच नव्हे, तर देहानेंही पुष्कळसे पांडवपक्षी होते—पांडवांस फितूर होते असें म्हणावयास काय हरकत आहे ? अशा तऱ्हेच्या आम्ही मागें एकदोनदां केलेल्या विधानास प्रस्तुत गोष्टीनें जास्त बळकटीच येत आहे. मध्यरात्रीपर्यंत प्रत्यक्ष भगवंतासही जी अर्जुनाच्या प्रतिज्ञापूर्तीची काळजी पडली ती उगीच नाहीं. पण ज्यांच्या भीतिमुळें ती मुख्यत्वें करून पडली, तेच आपणास फितूर आहेत, ही गोष्ट बिचाऱ्या कृष्णास काय ठाऊक ? ( किंवा ठाऊक असूनहि त्यांनीं तो वरकरणी देखावा केला नसेल म्हणून तरी कशावरून ? ). ' मला जिंकल्याशिवाय तुला जयद्रथ जिंकण्यास पुढें जातां येणार नाहीं ' म्हणून हंसत हंसत अर्जुनाचा मार्ग अडविणारे, व बराच वेळ युद्ध होऊनहि त्यास हार न जाणारे द्रोणगुरु, श्रीकृष्णाला अर्जुनाचा रथ जयद्रथाचे बाजूस सैन्यांत घालूं देतात, यांत निव्वळ ' सिद्धसाधकपणाची ' जयद्रथाची व दुर्योधनाची फसवणूक नव्हे काय ? देहानें सुद्धा पांडवांच्या पक्षास लागू असल्याशिवाय अशा गोष्टी घडत नसतात ! अर्जुनाचा बळी अनायासें पुढें चालून आला होता, व जीव जाईतों त्यास अडवून जयद्रथास दिलेल्या वचनास जागण्याची, व दुर्योधनाची सेवा करण्याच्या कर्तव्याच्या परीक्षेस उतरण्याची, वेळ द्रोणांस फार

नामी मिळाली होती. पण खऱ्या इमानी नोकराप्रमाणें–स्वतःचा मुडदा पडेतोंवर शनवारवाड्यांवर बाळाजीपंत नातूस गौरकायांचें युनिअन जॅक फडकवूं देणार नाहीं, ह्या अलोट स्वामिभक्तीच्या निश्चयानें लढणाऱ्या त्या 'पेशवाई'तील रक्षकाप्रमाणें- तें लढले काय? केवळ स्वामिभक्ति व धन्याशीं इमान ह्या नात्यापुरतें पहातां, त्या 'पेशवाई'तल्या नोकराइतकेही मार्क द्रोणांस पडणार नाहींत असें आम्ही स्पष्ट म्हणतों ! तीच गोष्ट आश्वासनाची. " आत्माहि उपेक्षावा परि रक्षावाचि बोल संतांनीं । " हा उपदेश काय त्यांस ठाऊक नव्हता? मग त्यांनीं आपला 'बोल' कितीसा राखला? स्वताचें आंग चोरून जयद्रथास तोंडघशी देणाऱ्या द्रोणांनीं त्याचा विश्वासघातच केला, असें म्हणावयास काय हरकत आहे? कारण त्यांच्याच आश्वासनावर बापडा त्या छावणींत राहिला होता! पण जाऊं द्या. कोळसा उगाळावा तितका काळाच. अर्थात् हें, व ह्याचसारखें इतर आमचें सर्व लिहिणें, जयद्रथ व दुर्योधन यांची बाजू लक्षांत घेतां त्यांच्या तर्फेनें, व रा. लिमयांनीं कर्तव्यकरण्याच्या बाबतींत भीष्मद्रोणांची–( इथें अर्थात् द्रोणांशींच आपणांस कर्तव्य आहे)–जी बाजू उचलून धरली आहे× त्यास उत्तर म्हणून, आहे. तेव्हां पुन्हा आम्ही एकदां स्पष्ट म्हणतों कीं, कर्तव्य व सत्पक्षाविषयीं प्रेम, यांचा झगडा लागला असतां तें, रा. लिमये म्हणतात त्याप्रमाणें, कर्तव्यास फारसे जागले नसून× त्यांनीं प्रेमासच जास्त प्राधान्य दिलें, पांडवांस फितूर झाले, व खुळ्या बिचाऱ्या दुर्योधनास कर्तव्याच्या अवडंबराखालीं त्यांनीं पूर्ण नागवलें ! उघड शत्रु पुरवला पण असे गुप्त शत्रू फार वाईट असतात. पांडवांचें हित करणारे–नुसतें मनानेंच चिंतणारे नव्हेत तर देहानेंहि हित करणारे–दुर्योधनाचे हितशत्रू याप्रमाणें खुद्द त्याच्या गोटांत होते! पण त्याच्या मात्र मूर्खपणाची कमाल खरी कीं, अशावरहि तो विश्वासला ! अस्तु.

अर्जुन याप्रमाणें जयद्रथाकडे निघून गेल्यावर–अथवा खरें म्हणजे द्रोणांनीं त्यास जाऊं दिल्यावर- द्रोणाचार्य मग आपल्या दुसऱ्या कर्त-

× " भारतीय युद्ध "—पान १६२–६३.

त्याकडे वळले. धर्मराजास अर्जुन दूर असतां जिवंत पकडून देण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें होतें, व त्याप्रमाणें पहिले दोन दिवस त्यानीं प्रयत्नहि केला होता. पण आयत्या वेळेस अर्जुनानें येऊन धर्माचें रक्षण केलेलें आहे, हें आपण मागें वाचलेंच आहे. तिसऱ्या दिवशीं, अभिमन्यूवध झाल्यावर, जयद्रथवधाच्या चौथ्या दिवशीं अर्जुन दूर गेल्यावर त्यांस पुन्हां ती संधी सांपडली. या खेपेस अर्जुन धर्माच्या रक्षणास येणें शक्यच नव्हतें, कारण त्यास आपलाच पण आधीं शेवटास न्यायचा होता. पण अर्जुन त्या कामीं गाफिल नव्हता. युद्धास निघण्यापूर्वीं त्यानें मागील दोन खेपेप्रमाणें ह्याहि वेळीं सात्यकीची धर्मरक्षणाचें कामीं योजना केली होती. व सात्यकीनेंही पण द्रोणगुरूंच्या अगदीं हातांत सांपडण्याच्या बेतांत आलेल्या धर्माची यावेळीं त्यांच्या कैचींतून सुटका केली. धर्म अगदीं द्रोणांच्या हातीं सांपडला होता, पण आयत्या वेळीं सात्यकी आल्यानें तो प्रसंग टळला. वरील सर्व हकीकतीवरून सात्यकी हा फार तर अर्जुनाच्या तोडीचा वीर ठरतो. पण खरी मौज पुढेंच आहे; कारण त्यानें धर्मास द्रोणांच्या तडाक्यांतून वांचविलें, इतकेंच नव्हे तर, नंतर दूरवर गेलेला अर्जुनाचा रथ दिसेनासा झाला म्हणून त्याच्या पाठोपाठ धर्मानीं सात्यकी व भीम यांस अनुक्रमें धाडिलें. पैकीं सात्यकीनें द्रोणांचा पराभव केला व तो पुढें गेला, व भीमानेंही द्रोणास विरथ केलें असें लिमये म्हणतात.+ यावरून अर्जुनाहूनही सात्यकीचा पराक्रम श्रेष्ठ ठरतो. मग दुसऱ्या दिवशीं द्रोणवध करायला त्याचीच कां योजना केली नाहीं ? ही शंका रहातेंच, व त्यास 'धृष्टद्युम्नाचे हातूनच द्रोणांचा मृत्यु होता' असल्या दैववादी उत्तराशिवाय दुसरें उत्तर रहात नाहीं. अस्तु.

पण वाचक ! बोलतां बोलतां आपण कुठवर तरी येऊन पोंचलों. त्या लढणाऱ्या भटांप्रमाणेंच आपणासहि त्याचें भान राहिलें नाहीं कीं काय, कोण जाणे. असो. पण तुम्हांला ह्या दिवसाची प्रथमची–लढाईला तोंड लागण्याचे वेळची–वीररसात्मक परिस्थिति पहायची आहे काय ? ऐका तर मगः—" सेनाग्रीं वाजविली नर–नारायण सखे दरवरा जे।

---

+ " भारतीय युद्ध '—पान १८७.

ते मोरसे, भुजगसे ऐकति होउनि सखेद रव राजे ॥ रोमांचकंचुकाला कडकडतां कृष्णकंबु कपि त्याला । पर सोडी भानाला, सिंहरवें जेंवि जंबुक पित्याला ॥ हांसोनि द्रोण म्हणे, पार्था मजला न जिंकितां आजी । जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे, मजसवें करी आजी॥" असें म्हणून लगेच ' मार्गण–वृष्टि ' करण्यास द्रोणांनीं सुरवात केली. पण त्याचा अर्थ काय, गुरु शिष्यांचे युद्धांत, गुरु न आटपूनहि ते शिष्यास जयद्रथाकडे जाण्यास कशी परवानगी देतात, इकडे धर्मास पकडणें द्रोणास कसें अशक्य होतें, व नंतर धर्माज्ञेवरून अर्जुनाचे पाठोपाठ सात्यकी व भीम कसे जातात–(याच ठिकाणीं भीमकर्णांनीं एकमेकांस मूर्छित पाडूनही अर्जुनप्रतिज्ञा व कुंतीवचन अनुक्रमें लक्षांत घेऊन एकमेकांस जिवंत सोडलें आहे)–इत्यादि गोष्टी आपण पाहिल्याच आहेत. यानंतर आतां आपणांस जयद्रथाकडे वळावयाचें आहे. पण तत्पूर्वी द्रोणांनीं, सात्यकी व अर्जुन दोघेहि तिकडे गुंतले असतां, पुन्हां एकदां धर्मास धरण्याचा प्रयत्न केला कीं नाहीं ? एवढेंच आम्हांस एथें विचारावयाचें आहे. कारण पहिले दोन दिवस अर्जुन आला, व आज एकदां सात्यकींनेंहि धर्मास त्यांच्या मगरमिठीतून सोडविलें होतें हें खरें. पण अर्जुन व सात्यकी, दोघेही जयद्रथाकडे गुंतल्यावर इकडे मागें धर्मास पकडण्याचा पुन्हां प्रयत्न करण्यास ही संधी चांगली नव्हती काय ? पण अर्जुनास जाऊं दिलें, त्याच्या पाठोपाठ सात्यकी व भीमही गेले, आणि इकडे द्रोण नुसते हात हालवीतच बसलेना ? आट्यापाट्याच्या सामन्यांत एकादा गडी फार चांगला पाट्या धरणारा, म्हणून त्यास घ्यावा–व कोंडी हटकून होणाऱ्या दुसऱ्या, तिसऱ्या पाटीवर त्यास नेमावा, पण विरुद्ध बाजूस लागू होऊन किंवा लागूं असल्यामुळें त्यानें सर्व गडी पटापट–किंवा फार तर कांहींस धरल्याचा आव आणून–सोडून द्यावे, व हात हालवीत स्वस्थ बसावें किंवा रिकाम्या पाटीवर फिरत राहावें, अशांतलाच जवळ जवळ हा प्रकार नव्हे काय ? पण अर्जुनास त्यांनीं जाऊं दिलें नाहीं, किंवा वर म्हटल्याप्रमाणें सांपडलेल्या उत्कृष्ट संधीचा दुर्योधनासाठीं पुन्हां उपयोग करण्याची निदान पूर्ण घडपड केली, तर मग तें दुर्योधनाचे, रा. लिमये म्हणातात

त्याप्रमाणें, 'इमानी सेवक' कशाचे ?+ अस्तु. पण चला वाचक ! जयद्रथाच्या बाजूस कोण रणकंदन माजून राहिलें आहे ! तर आतां आपण तिकडेच जाऊं, चला !

दुसरा दिवस—पार्थप्रतिज्ञेनंतरचा दुसरा दिवस—जेव्हां उगवला तेव्हां, जयद्रथ आज मरणार म्हणून कौरवापक्षीयांत ज्याला त्याला चिंता व काळजी वाटूं लागली, व जो तो आपापल्या परीनें त्याच्या रक्षणाचे व बचावाचे उपाय सुचवूं लागला. शेवटी राजा दुर्योधनानें, त्याला सैन्याच्या मध्यें ठेवावें, व होतांहोईतों सर्वांनीं त्याचें रक्षण करीत त्याच्या भोंवतींचा सैनिकांचा कोट फुटूं देऊं नये—मृत सैनिकाची जागा ताबडतोब जिवंत सैनिकांनीं भरून काढून, दुर्भेद्य अशा एकाद्या किल्ल्याच्या तटाप्रमाणें सैनिकांचीं कडीं किंवा वलयें त्याभोंवतीं राखावींत—अशी योजना केली, व त्याप्रमाणें जयद्रथास सैन्याच्या मध्यभागीं घालण्यांत आलें, व अघाडीवर खुद्द द्रोणाचार्य सेनापति अर्जुनास अडविण्यास सज्ज होऊन उभे राहिले. परंतु ते काम त्यांनीं किती चोख बजावलें, हें आपण वर पाहिलेंच आहे. असो. जयद्रथांकडील बाजूस कृष्णांनीं पार्थाचा रथ घातल्यावर तिकडे लढाईस चांगलेंच तोंड लागलें ! अथांग सागरांत दूरवर विहरणाऱ्या शुभ्र नौकेप्रमाणें, कौरवांच्या अथांग सेनेंत जयद्रथाचा रथ व त्यावरील फडफडणारी ध्वजा दूरवर दिसत होती! आज जयद्रथाचें रक्षण करण्यासाठीं प्रत्येक वीर जिवावर उदार होऊन लढत होता ! एक एक इंच जागा आक्रमिण्यास हजारों सैनिकांचे मुडदे अर्जुनास पाडावे लागत होते ! सूर्य मध्यान्हीवर येऊन केव्हांच पश्चिमेकडे कलला होता. परंतु अद्याप शत्रूची फळी फुटण्याचा रंग दिसेना ! दुर्योधनाच्या हुकमाप्रमाणें खरोखरच आज जयद्रथाभोंवतीं अथांग सेनेचा दुर्भेद्य कोट रचण्यांत आला होता. व त्याच्या जोरावर जयद्रथ आंत मध्यावर राहून खुशाल आपल्या रथांत बसून "युद्धस्य कथा रम्या" पहात व ऐकत होता! प्रत्येक घटकेला सूर्य जसजसा अस्ताचलाकडे जास्त जास्त जाऊं लागला,

---

+ "भा. यु." पान १६३.

तसतशी पांडवपक्षांत, अर्जुनासारख्या वीरास अग्निकाष्ठ खाण्याचा प्रसंग येऊन तो आपणास अंतरतो कीं काय, याची काळजी पडली. सर्व पांडव चिंतातुर झाले, जयद्रथ आज मरत नाहीं असें उघड उघड दिसूं लागलें. कारण अर्जुनाच्या भयंकर रणकंदनानें व 'उसन्या घाई'च्या केलेल्या 'झुंजी' नें सुद्धां त्याच्या रथाची कौरव सेनेंत फारच थोडी प्रगति झाली होता. शेवटीं, "श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हा निकट कांहीं। हें योजुनि वेढियला पार्थ, करायासि हानि, कटकांहीं॥" त्या वेळेस दमलेल्या घोड्यांस विसावा देण्यासाठीं, "त्या समयीं पार्थ म्हणे, देवा संश्रित–शुभाकरा वाजी। श्रमले, कीं श्रमशमना घडिभरि तरि रथ उभा करावा जी॥" आणि रथ उभा राहिल्यावर धन्य त्या अर्जुनाची कीं, त्यानें "करि निर्मनुष्य मंडल तो एक क्रोश आपणाभवतें॥" चढाईची व संरक्षक, अशा दोन लढाईच्या पद्धतींपैकीं दुसरीचाच अवलंब यावेळीं कौरवांस करावा लागला. कारण त्याचीच त्यांना मुख्यत्वेंकरून कमींत कमी जरूर होती. अर्थात् चढाई करतां आली असती तर त्यांस नको थोडेंच होतें? पण आमचा पार्थ सुद्धां कांहीं कच्चया गुरुचा चेला नव्हता–नव्हे तो द्रोणांचा पट्टशिष्य होता, हें आपण सुरवातीस पाहिलेच आहे. त्या धनुर्धारी वीरानें खालीं उतरून कुरुकटकास दशादिशां उधळून लावलें, व बाणांचें छत दिलेला, व बाणांच्याच झालरी व पडदे सोडलेला, असा त्यानें बाणांचा एक मंडप–'शरगृह'–निमार्ण करून त्याच्या सावलीखालीं आपल्या घोड्यांस विसांवा दिला, इतकेंच नव्हे तर, "मंत्रबळें सुसरोवर निर्मुनि" त्यांना पाणीहि पाजलें. अर्थात्, रथाचे घोडे सोडण्यापासून ते परत जोडीपर्यंतचें सर्व कार्य प्रत्यक्ष अर्जुनानें केलें नाहीं, हें उघड आहे. कारण त्या कामीं त्याचा 'खासदार' झालेला प्रत्यक्ष रमापति तिथें त्या कामासाठीं जातीनें हजर होता, व अर्जुनासहि इकडे वीरोचित झगड्याचें व कौरवकटकास त्या शरगृहापासून दूर ठेवण्याचें काम होतें. प्रभूनें या ठिकाणीं केलेली हयसेवा किती अभिलषणीय होती, त्याचें पंतांनीं फारच बहारीनें वर्णन केलें आहे. ते म्हणतातः–" प्रभुनें मुक्त करूनि हय चुचकारुनिया हळूंच कौशल्यें। निजबोधें श्रित-हृद्गत–दुःखेंशीं सकळ काढिलीं शल्यें॥ देवर्षि मुखीं घालुनि बोट म्हणे हा सुयोधना कुटिला। भक्तिबळेंचि पहा हा पर-

मेश्वर आजि अर्जुनें लुटिला ॥ पुरुषार्थद ते केले दासहय–हितोदया कर खरारे । झालासि दासदास प्रभुही तूं बा दयाकर खरा रे ! ॥ ज्याचें पदनख दासां जे सुख दे तापल्या न तें विधु तो । भगवान स्वयें अहा या विजयहया, सत्पदांस तेंवि, धुतो ॥ प्रेमें माता बाळा न्हाणी, कीं भक्त शंभुच्या लिंगा । तैसाचि नरहया हरि, कविहो याचेचि पाय आलिंगा ! ॥" यानंतर– "पीतपटपसाहि तोबरा माप। " त्यानीं कसें केलें व " हरि हरिततृणीं " कसें त्या प्रभुनें चारिलें, याचें वर्णन देऊन साहजीकच पंत विचारतात, " उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या कां न नीच तुरगांनीं । ?" अस्तु. याप्रमाणें सेवा बजावल्यावर–नारदांचेहि ' मन हरणारी ' ' खासदारी ' केल्यावर–पुनश्च प्रभूनें घोडे रथांस जुपले, व नरनारायणांची ही जोडी ताज्या व दमदार घोड्यांना दौडीत जयद्रथवधार्थ निघाली !

पण जयद्रथवध होणें किंवा करणें हें वाटलें तितकें सोंपे काम नव्हतें, याची चुणुक आम्हीं वर दाखविलीच आहे. व ताज्या दमाच्या घोड्यास दौडत निघालेल्या त्या जोडीसही पण पुन्हां त्याचा प्रत्यय आलाच. कारण चढाईच्या पद्धतीपेक्षां संरक्षक पद्धतीचें युद्ध आज कौरवपक्षीयांस अधिक खेळायचें होतें असें आम्हीं वर म्हटलेंच आहे, व ते तें किती कुशलतेनें व नेटानें खेळत होते, याचें थोडेसें दिग्दर्शनहि पण वर आलेंच आहे. झालें ! शेवटीं कपटाचा अवलंब केल्यावांचून जयद्रथ मरत नाहीं, व अर्जुनाची प्रतिज्ञा पुरी होत नाहीं, असें श्रीकृष्णास उघड दिसूं लागलें. अर्जुन तर आपल्या बालअभिमन्यूच्या विरहानें इतका वेडा पिसा झाला होता कीं, एक एक क्षण त्यास असह्य होत होता. " बाळ ! ज्या दुष्टानें तुझ्या मस्तकास लाथ मारली त्याचा आज पुरा सूड तरी घेईन, किंवा अग्नींत उडी घेऊन तुझ्या भेटीस तरी येईन ! " अर्जुन म्हणत होता, व प्रत्येक क्षणाला शेकडों सैनिकांचे मुडदे जमिनीवर पाडीत होता. परंतु प्रत्यक्ष कृतांताप्रमाणें भासणाऱ्या अर्जुनाच्या बेदम माऱ्यांतही कौरवांच्या सैन्यानें भयंकर टिकाव धरला ! यावरून कौरवपक्षीय वीर, असत्पक्षीय असले तरी किती विलक्षण शूर होते, याचा चांगलाच उलगडा होतो. सूर्य अस्ताचलाच्या अगदीं जवळ येऊन ठेपला ! सुमारें अर्ध्या प्रहरानें तो

अस्तावलाआड होणार, असें निश्चित दिसूं लागलें. त्याचीं तीं आरक्त-पीत-कोमळ किरणें सर्व कुरुक्षेत्रावर-भावी वानरतच्या पटांगणांवर-पसरलीं, व त्या कोमळ ताम्र किरणांच्या सुवर्ण तेजांत अवगाहन करणाऱ्या सर्व सेनेचीं आयुधें तळपूं लागलीं ! सर्वत्र रक्तरंगाचा जणों सागरच उसळुन राहिला होता ! सवित्याचें तेज रक्तवर्ण, रागानें लढणाऱ्या उभयपक्षीय वीरांचे नेत्र रक्तवर्ण, व लवकरच अर्जुनास उडी घेण्यासाठीं तयार केलेल्या लाकडाच्या चितेच्या ज्वालाहि रक्तवर्णच ! असा जिकडे तिकडे रक्तवर्ण पसरला होता. अर्जुनाच्या हुकुमावरून—जयद्रथवधांबद्दल निराश झालेल्या अर्जुनाच्या सांगण्यावरून—एका बाजूस लांकडांची चिता धडाड पेटली होती ! तिच्या आरक्त ज्वाला सायंकालीन उन्हाच्या कोमल ताम्र किरणांशीं मिलाफ पावून आकाशाला भेटायला जात होत्या ! 'हाय ! आतां कसचा जयद्रथ मरतो !' ह्या विचारानें निराश झालेला अर्जुन, "बाळा ! अभिमन्यो ! हा पहा तुझा पंद पिता तुझ्या भेटीस येत आहे ! अरेरे ! माझ्या कोंवळ्या पोराच्या झालेल्या अमानुष खुनाचा मला सूड देखील घेतां येऊं नयेना ! व्यर्थ मी धनुर्धारी वीर म्हणून आजवर गाजलों. नको, नको आतां हें जिणें !" असें म्हणून अर्जुनानें रथाखालीं उडी घेतली, व चितेजवळ जाऊन त्या शोकाच्या तंद्रींत, "काय बाळा ! हा मी आलों बरें !" असें म्हणून आतां तो त्या चितेंत उडी घेणार इतक्यांत श्रीकृष्णांनीं, "अर्जुना ! हा काय वेडेपणा करतो आहेस ?" असें म्हणून त्यास बळेंच मागें खेंचलें व तसेंच त्यास रथावर बसविलें, व त्याच्या कानांत कांहीं गोष्ट सांगितली. त्याबरोबर अर्जुनाचा चेहेरा आनंदानें खुलला ! क्षणार्धात् श्रीकृष्णांनीं आपल्या योगमायेनें सूर्यावर आवरण घातलें ! सर्वत्र अंधार पडला ! व 'सूर्य अस्तास गेला' असें वाटून कौरव सैनिकांची पांगापांग झाली. व त्यांचा दुर्भेद्य कोट फुटला. सूर्यास्तानंतर लढाई बंद ठेवायची, ह्या नियमाप्रमाणें दिवसभर लढून लढून थकलेले, व जयद्रथाचा बचाव झाला म्हणून आनंदलेले वीर आपापल्या निवासस्थानाकडे वळले. जयद्रथही आनंदानें व मोकळेपणीं इकडे तिकडे बेसावधपणें फिरूं लागला. परंतु इथेंच शेवटचीं 'किक' बसून 'गोल' झाला ! कारण

हीं संधी साधून अर्जुनानें कौरवसैन्य झोडपीत जो रथ दामटला, तो कुशल कृष्णसारथ्याच्या साह्यानें हां हां म्हणता–सैरावैरा विखुरलेल्या सैन्यास पुरता दमहि घेऊं न देतां–जयद्रथाच्या रथासमोर जाऊन तो उभा राहिला! लगेच योगमायेचें आवरण सूर्यावरून काढून घेऊन देव म्हणाले, "अर्जुना, हं पहातोस काय? हा सूर्य अन् हा जयद्रथ! लगाव दणका!" क्षणार्धांत अर्जुनाचा अर्धचंद्र तीव्र बाण सूंसूं करीत निघाला, व त्यानें बिचाऱ्या जयद्रथाचें मस्तक धडापासून वेगळें केलें. सूर्य अस्तास जाईपर्यंत अर्जुनानें आपल्या शरसंधानाच्या लीलेनें तें मस्तक बाणांच्या फेंकींत वरच्यावर आकाशांत झेलतें व खेळतें ठेवलें–कारण 'ज्याच्या हातून तें भूमीवर पडेल त्याच्या मस्तकाचें शतशः तुकडे होतील' असा जयद्रथाच्या पित्यानें त्यास वर दिला होता–व सायंसंध्येच्या सुमारास नदीतटाकीं संध्योपासनेस ध्यानस्थ बसलेल्या जयद्रथपित्याच्या अंकावर तो वरुणोपस्थानास उठण्याच्या सुमारास, कृष्णप्रभूच्या सांगण्याप्रमाणें अर्जुनानें तें मंत्रितशरांच्या साह्यानें अज्ञात् नेऊन टाकलें–तोंच तो पिता वरुणोपस्थानास उठला! व तें शीर त्याच्याच हातून भूमीवर पडून त्याच्या मस्तकाच्या चिंधड्या उडाल्या! 'असत्पक्षाचा उपाय त्यासच शेवटीं घातक होतो,' असें रा. लिमये म्हणतात+ तें तर खरेंच. पण आतांपर्यंतच्या एकंदर युद्धप्रकाराकडे कौरवांच्या दृष्टीनें पाहिल्यास त्यांच्या दुय्यम सेनापतीचा सुद्धां वध श्रीकृष्णाच्या मध्यें पडण्यावांचून, किंबहुना, सर्वतोपरी साह्यावांचून झाला नाहीं ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे हा झगडा मनुष्यांमनुष्यांत नसून देव आणि (मानवी दानव)मानव ह्यांच्यांतला होता व अर्थात् त्यामुळेंच पांडव विजयी झाले–त्यावांचून तें होणें अशक्य होतें–अर्जुनानें मिळविलेल्या सर्व अस्त्रांचीही घमेंड तिथें लंगडी पडत होती–ही गोष्ट चांगली प्रत्यायास येते! असो. अर्जुनाची प्रतिज्ञा एकदांचा शेवटास गेली! कृष्णाचें कपट उशीरां उमगलें गेलें! पण शेवटीं जयद्रथवधाचें कामींहि कापट्यप्रयोगच करावा लागला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे! अस्तु. पण एवढ्यानें लढाई थांबली नाहीं!

---

+ "भारतीय युद्ध"—पान १८८.

नेहमींच्या नियमाला आज–द्रोणपर्वाच्या चतुर्थ दिवशीं–अपवाद केला गेला, व दोन्ही पक्षाकडील सैन्य तसेंच मध्यरात्रींपर्यंत अंधारांतच मशाली लावून झगडत राहिलें. रात्रीचा घनघोर संग्राम मोठा पाहण्यासारखा होता. विशेषेंकरून घटोत्कचाचा पराक्रम फारच अद्वितीय झाला. एक अक्षौहिणी सैन्य त्यानें त्या रात्रीं गारद केलें!! व हा कृतांत काळ आतां सर्वांचीच क्षणार्धांत चटणी उडवतो कीं काय, अशी भीति येऊन पडली; व जेव्हां कर्णाच्या व घटोत्कचाच्या झुंपलेल्या अत्यंत प्रेक्षणीय युद्धांत, तो मायावी राक्षस कर्णास ी आटपेना, तेव्हां दुर्योधनादिकांच्या व सर्व भेदरलेल्या कौरवांच्या अत्याग्रहावरून, त्यानें शेवटीं इंद्रापासून मागून घेतलेली अमोघ शक्ति–'सोडल्यावर एका शत्रूचा निश्चयानें प्राण घेणारी' दिव्य शक्ती–शेवटीं मोठ्या नाखुशीनें त्यानें घटोत्कचावर टाकली –फेंकली व तत्काळ घटोत्कच मृत होऊन पडला! कौरवांनीं तर आनंदाचा एकच जयजयकार केला! पांडवपक्षीयांस अर्थात्च घटोत्कचमृत्यूनें वाईट वाटलें. पण त्या शक्तीचें गुपित माहीत असणाऱ्या भगवंतांनीं त्याच वेळेस अर्जुनास आनंदानें दृढालिंगन दिलें! व ते गुपित काय होतें, तें सर्वांस सांगितलें. वाचकहो! तुम्हांसही तें आम्ही सांगतोंच. चला, मध्यरात्रीचा डंका वाजल्यामुळें प्रहर दोन प्रहर इतराप्रमाणेंच विश्रांती घेण्यास गेलेल्या कर्णाचे तोंडूनच तें आपण ऐकूं.

आपल्या शिबिरांत विश्रांति घेणारा कर्ण स्वताशींच विचार करीत होता, "ती शक्ती शेवटीं मला घटोत्कचावर टाकावी लागली ना? माझ्या हाडवैरी अर्जुनासाठीं अत्यंत जपून ठेवलेली ती शक्ती, शेवटीं अशीं फुकट गेलीना? पण मी तरी काय करूं? जेव्हां जेव्हां त्याची माझी गांठ पडे तेव्हां ती त्यावर टाकण्याचे मला भानच कसें तें राहत नसे!" हें खरें आहे. कृष्णप्रभूच्या योगमायेच्या मोहिनीचें साह्य प्रत्यक्ष इथेंहि झालेलें आहे! "अरेरे!" कर्ण पुढें आत्मगत बोलला, "शेवटीं मी अर्जुनाच्या हातून मरणार म्हणायचा! असो. ईश्वरी इच्छा!" पण हीच 'ईश्वरी इच्छा' त्याला चांगली आधींच पांडवपक्षांस बोलावित होतें तेव्हां हा जर गेला नाहीं तर त्याला त्या ईश्वरी इच्छेनें काय करावें? असत्प-

क्षाचा उपाय कधीहि फळास यायचा नाहीं, हें इथेंहि उघड होत आहे! असो.

लवकरच चंद्रोदय झाला! व पुन्हा लढाईचें शिंग फुंकलें जाऊन दोन्ही सैन्यें एकमेकांवर घसरलीं! आज जणों त्यांना भयंकर रणावेशच चढून विलक्षण चुरशीस पेटलेले ते वीर, आज कांहीं तरी लढाईचा निकाल लावावयाचा ह्या निश्चयानेंच जणों विश्रांतीची फारशी पर्वा न करतां एकसारखे झगडत होते! जयद्रथवधासाठीं म्हणून युद्धाच्या चौथ्या-प्रथमपासून मोजल्यास चौदाव्या-दिवशीं जें तोंड लागलें, तें जवळ जवळ दोन दिवस व एक रात्र हा झगडा सारखा सुरू होता. कारण तें पहा, चंद्रोदयापासून पुन्हां ताज्या दमाची झुज खेळणाऱ्या त्या वीरांनीं सूर्योदयापर्यंत ती तशीच चालविली. सूर्य उदयाचलावर आल्यावर मात्र त्याच्या आरक्त कोमल किरणांच्या सुखद शोभेत सर्वांनीं आपापलीं शस्त्रास्त्रें घटकाभर खालीं ठेवलीं. व संध्यावंदनादि प्रातःकर्म त्या रणभूमीवरच उरकलें. द्रोणाचार्यांनीं आज शेवटचें संध्यावंदन करून घेतलें! कारण—हाय!—आजच त्यांचा काळ होता! द्रोणगुरूच्या आयुष्यांतला शेवटचा दिवस उगवला होता. काल मध्यरात्रीं विश्रांतीस गेलेल्या द्रोणांस दुर्योधनानें भीष्माप्रमाणेंच बरेंच झाडलें, व पक्षपातित्वाचा त्यांच्यावर आरोप केला. म्हाताऱ्याला दुर्योधनाचे शब्द फारच झोंबले, व यथामति वृद्धापकाळीं त्याची सेवा बजावीत असतां, त्या दुष्टानें कृतघ्नपणें आपणासच दोष द्यावा, या परावलंबी जीवनाचा त्यांस भीष्मांच्या सारखाच उद्वेग आला, व त्यांतच संतापाची भर पडून, त्या भरांत, "मी उद्यां जीव जाईस्तोंवर लढतों!" म्हणून त्यास आश्वासन देऊन त्यांनीं त्यास वाटेस लावलें होतें. त्याप्रमाणें द्रोणाचार्यांनीं संध्यावंदनाचे सूर्यास शेवटचें अर्घ्यप्रदान दिल्यावर त्या ब्राम्हणानें आपली शस्त्रास्त्रे व धनुष्यबाण आज सत्पक्षाविरुद्ध प्रलय करण्यास पाजळलीं—सरसावलीं; सर्व कौरवपांडवास शस्त्रास्त्रविद्या शिकविणारे गुरूच आज आपल्या प्रियतम शिष्याबरोबर लढायला तयार झाले! ही विधिघटना, ही दैवाची लीला किती विचित्र, किती अजब! पण करतात काय? "अर्थस्य दासा"ना 'ज्याची पोळी खाली, त्याची टाळी वाजविणें' भागच होतें!

कोंवळ्या अभिमन्यु बालकास अधर्मयुद्धानें ठार करून, कौरवांनीं आपल्या पापाचा घडा तेथेंच पुरा—अगदीं कांठोकांठ—भरला होता, व त्याची सव्याज फेड तेथून पुढें सुरू झाली होती, हें वाचक विसरले नसतीलच. असो.

द्रोणाचार्य म्हणजे सामान्य वीर नव्हते. पहिल्या सपाट्यासच त्यांनीं द्रुपदाचा व त्याच्या नातवांचा बळी घेऊन भयंकर कापाकापीस सुरवात केली. लवकरच द्रोणार्जुनांची -गुरुशिष्यांची—गांठ पडून अर्जुनानें बाणांनींच गुरूंना वंदन केलें! व हा अपूर्व झगडा सुरू झाला! अर्जुनाच्या पुढें त्याचे गुरु हार जाणारे नव्हते, हें आपण मागें पाहिलेंच आहे. इथेंहि पुन्हां त्यासत्याची पुनरावृत्ति झाली. तेव्हां दोघांनींही तो नाद सोडून दिला. पण इतर लढाईचें क्षेत्र काय थोडें होतें? द्रोणाचार्यांनीं सैनिकांचें पीक सपासप कापण्यास सुरवात केली, व कृष्णांनी धर्मास म्हटल्याप्रमाणें, खरोखरच अर्ध्या घटकेच्या आंत तो जमदग्नी सर्वांस भस्म करून टाकतो कीं काय, अशी वेळ येऊन ठेपली. तेव्हां ह्या अजिंक्य वीरास—तसेंच यापुढील कर्णदुर्योधनादिकांसहि, त्यांच्या अजिंक्यपण मुळेंच—मारण्यास श्रीकृष्णांस कपटाचा व अधर्म युद्धाचाच अवलंब करावा लागला. पण 'कांट्यांनींच कांटा' उपटायचा असतो. 'शठाशीं शाठ्यच' करावें लागत असतें. 'उद्धटास उद्धट व खटनटास खटनटच व्हावें लागतें.' 'विंचवाला पायांतल्या जोड्यांनींच ठेंचावा लागतो' कारण 'अधमाशीं अधमच व्हावें लागतें,' इत्यादि संतवचनांचा विचार, आपण मागें केलाच आहे. तेव्हां त्यांची द्विरुक्ति करण्याचें इथें कारण नाहीं. पण मौज अशी कीं "मूळापासूनच कौरवांचा पक्ष खोटा होता"+ ही गोष्ट कबूल असणाऱ्या, व भीष्मांवर चक्र घेऊन श्रीकृष्ण धांवले त्या प्रसंगीं—'भक्ता राखे पायापाशीं। दुर्जनाशीं संहारी' असें *सहज प्रेमोद्गाराचें वचन देणाऱ्या, रा. पांगारकरांस द्रोणवधप्रसंगीं मोठें गूढ पडून कसेंसेंच झालें आहे!

---

+ "मोरोपंत चरित्र आणि काव्यविवेचन"—पान ३५०.

* "मो. च. आ. का." पान ३३६.

कपटानें द्रोणादिकांचा वध झालेला पाहून ते म्हणतात,× "आणि ह्याला सर्वसाक्षी श्रीकृष्णाची संमति होती हें पाहिलें म्हणजे 'धर्मगति सूक्ष्म आहे' असेंच म्हणून स्वस्थ बसावें लागतें! सत्पक्षांतही दोष आहेत व असत्पक्षांतही गुण आहेत, किंबहुना त्रिगुणामधलें सर्वच पुरुष व त्यांचीं कार्यें दोषमय आहेत, ही गोष्ट व्यासांनीं आपल्या पुढें ठळकपणें मांडली आहे" इ. पण त्यानींच कबूल केल्याप्रमाणें, "कृष्णप्रभूनीं पांडवांना आपलें म्हटले होतें."+ हीही गोष्ट तितकीच खरी आहे. त्यांचा भ्रम–अथवा त्यांचा आमचा मतभेद–फक्त एकाच मुद्यावर आहे व तो म्हणजे "पांडवांचीं सर्व कर्में निर्दोष नाहींत" हाच होय. पांडवांच्या "सत्पक्षांतही दोष आहेत" असें त्यांना वाटते; पण "धर्माची नीति चांगली होती व पांडव परोपकारी होते"+ असें तेंच कबूल करतात. मग येऊन जाऊन द्रोणकर्णादि मंडळीस त्यांनीं कपटानें ठार मारलें, आणि म्हणूनच त्यांचीं कर्में 'सदोष' झालीं, असा रा. पांगारकरांचा समज दिसतो आहे. परंतु 'या कामीं' जर 'सर्वसाक्षी श्रीकृष्णाची त्यांस संमति होती' तर मग तीं कर्में 'सदोष' कशीं ठरतात? "पापविचाराच्या नुसत्या छायेनेंहि दूषित झालेल्या हृदयाच्या सिंहासनावर" जो प्रभू "क्षणभरहि विसावणार नाहीं" तोच परमात्मा अशा सदोष, वक्र व कपटी नीतीस कशी परवानगी देईल? याचा रा. पांगारकरांनीं क्षणभर तरी विचार केला आहे काय? पण "धर्म सोडून जयाविषयीं हवें तें करा अशी कुटिल नीति कृष्णानें पांडवांस शिकविली" असें विधान करून,× प्रत्यक्ष कृष्णाचें पदरींही कौटिल्य, वक्रता, कापट्य इ. बांधण्यास तयार होऊन, भक्तांस व त्यांच्या देवासही पायाखालीं घालून, त्यांच्या डोक्यावर जे आपल्या दीडशहाण्या नीतीच्या कल्पनेनें बसले, त्यांच्याशीं वाद करणेंहि अप्रशस्त आहे, कारण! "तयाशीं संभाषणहि सर्वथा। न करावें गा ॥" अशी त्या खोट्या प्रभूची आम्हांसारख्या त्याच्या अंधळ्या भक्तांस आज्ञा आहे. पण प्रश्न आलाच आहे, तेव्हां तो अर्धवट न सोडतां, आम्ही रा. पांगार-

× "मो. च. आ. का." पान ३४३.
+ "मोरोपंत–चरित्र आणि काव्यविवेचन"–पान ३५० पहा.

करास असें विचारतों कीं, " पृथ्वी स्थिर असून सूर्यासह सर्व ग्रहमाला व सर्व तारे तिच्याभोंवतीं फिरताहेत असली खुळी समजूत करून घेण्याचा हट्ट टाकून पृथ्वीच आपल्या आंसाभोंवतीं व सूर्याभोवतीं फिरत आहे " इ. खरे सिद्धांत मान्य करणें जसें बरें, तसें ज्या नीतीच्या कल्पनेनें प्रत्यक्ष परमात्माही दोषी ठरूं पाहतो, ती नीतीची कल्पनाच मुळांत चुकलेली असून खरी नीति कांहीं निराळीच असली पाहिजे, असें मानणें जास्त समंजसपणाचें होणार नाहीं काय ? यासाठीं ' शठं प्रति शाठ्यं ' ही वक्र नसून सरळ नीति आहे, यांत 'कपटाचा,' 'क्रूरपणाचा' वगैरे लवलेशहि नाहीं एवढेंच भगवंतांच्या–समर्थांच्या–तुकोबांच्या खऱ्या धर्मनीतिचें सार–'सूक्ष्म' नसून अगदीं उघडे व ठळक सार–आम्ही त्यांच्या पुढें थोडक्यांत ठेवीत आहों–( कारण त्याचा सविस्तर विचार मागें दोनतीनदां झालाच आहे )–त्याचा स्वीकार करून त्यांनीं आपला दृष्टीकोण बदलावा, व त्या मंगलमय प्रभूला दोषांत काढल्याबद्दल त्याची अनन्यभावानें क्षमा मागावी, एवढेंच आमचें त्यांस सांगणें आहे, किंबहुना 'शठं प्रति सत्यं' का ' शठं प्रति शाठ्यं ' ह्या वादास नुकतीच भरती आली असतांना जगद्गुरु डॉ. कुर्तकोटी यानीं " शठंप्रति शाठ्यं " म्हणजेच " शठंप्रति सत्यं " होय असा त्याचा जो गोड मिलाफ घातला होता तो जरी रा. पांगारकरांनीं लक्षांत ठेवला तरी बस्स् आहे. अस्तु.

तेव्हां द्रोणाचार्यांनां कपटानें मारावयाचें ठरलें. त्यांत दुसरीही एक गोष्ट अशी होती कीं, द्रोणाचार्यांसारखीं घेंडें ही केवळ 'धर्मयुद्धा'नें अजिंक्य होतीं व मनानें जरी ते किंवा भीष्माचार्य ह्यांसारखी मंडळी " पांडवपक्षी " असली, तरी देहानें ते कौरवपक्षी असल्यामुळें–व त्यामुळें ते विलक्षण संहार करून पांडवांना जय मिळणें जीव असेपर्यंत अशक्य करूं लागल्यामुळें–त्यांचे देह समरदेवतेस अर्पण करणें अगदीं जरूर होतें. यासाठीं या ठिकाणीं धर्माचा केवळ अवतार असे प्रत्यक्ष धर्मराजसुद्धां एक तऱ्हेचें असत्य भाषण करण्यास तयार झाले–" जीवरक्षणार्थ खोटें बोलणें पाप नाहीं " ह्या कृष्णाच्या सांगण्यानें मोठ्या कष्टानें तयार केले गेले, असें रा. लिमये म्हणतात. व "कृष्णांनींहीं त्यास खोटें बोलावयास कसें लावलें ?" अशी नसतीच मनचीच शंका काढून त्यावर त्यांनीं

धर्मांच्या अंगीं 'परावलंबित्वा'चा एक दोष लादला आहे.+ परंतु धर्मांच्या अंगीं इतर कांहींही दोष असले–व ते काय होते याचें प्रसंगोपात मागें विवेचन येऊन गेलेंच आहे–तरी वरील प्रकारचा दोष त्यांच्या अंगीं होता असें आम्हांस वाटत नाहीं. भीमद्रौपदीचा द्वैतवनांत त्यांवर भयंकर भडिमार झाला त्या प्रसंगींसुद्धां जो धर्मात्मा न डगमगतां ज्यानें "प्राणास तुम्हांसहि मी त्यजिन व धर्मास पळहि सोडीन" म्हणून त्यांना खडखडीत बजावलें, तोच मनुष्य इथें परावलंबित्वानें व केवळ जीव बचावण्यासाठीं खोटें बोलण्यास तयार झाला असेल, हें आम्हांस बिलकुल खरें वाटत नाहीं. "त्रैलोक्याच्या राज्यासाठींसुद्धां धर्म खोटें बोलणार नाहीं" हा द्रोणांचा विश्वास योग्यच होता. मग धर्मराज कां खोटें बोलले ? जीव वांचविण्यासाठीं ? रणांगणांवर हातांवर शीर घेऊन उभा राहिलेला धर्मात्मा धर्म जीव वांचविण्यासाठीं खोटें बोलला ? ही गोष्टच किती हास्यास्पद दिसते ! ती युक्तिजुक्तीस मुळींच जमत नाहीं. मग धर्म कां खोटें बोलले ? त्रैलोक्याच्या राज्यप्राप्तीसाठींसुद्धां खोटें न बोलणारा धर्म क्षुद्र इंद्रप्रस्थाच्या राज्यासाठीं खोटें बोलला काय ? ही गोष्टसुद्धां बुद्धीस पटत नाहीं. धर्मास जीवच वांचवायचा होता तर त्यांनीं रणयज्ञास सुरवातच केली नसती म्हणजे तें कार्य अनायासेंच साधत होतें. अस्तु. मग धर्म कां खोटें बोलले ? अर्थात् त्रैलोक्याच्या राज्याहूनहि सत्य, न्याय व मानवी हक्क यांच्या रक्षणासाठीं–( ईश्वराच्या अवतारकार्यांतील गोष्टी सिद्धीस नेण्यास मदत करण्यासाठीं–) ते खोटें बोलले हेंच उघड होत नाहीं काय ? कारण झगडा विशिष्ट गोष्टींचा किंवा गोष्टीसाठीं नसून, त्या केवळ निमित्तास पुढें करून, वर सांगितलेल्या तत्त्वांची पायमल्ली करणाऱ्या नरपशूंना धुळींत गाडून, ह्या तत्त्वांचा व तीं तत्त्वें धारण करणाऱ्या अर्थात् सत्पक्षाचा विजय व्हावा–त्या प्रभूंनीं घालून दिलेल्या व युगायुगाचे ठायीं उपदेशिलेल्या तत्त्वांचा डंका सर्वत्र विजयनिनादानें चिरकाल व शाश्वत वाजत राहावा–म्हणूनच केवळ धर्मराज खोटें बोलले आहेत, अशी आमची दृढ समजूत आहे. शिवाय

---

+ " भारतीय युद्ध "—पान १९१.

जपणारे व केवळ त्यासाठीं खोटें बोलणारे ते रा. लिमयांच्यासारखे लेचे-पेचे वीर नव्हते हें त्यांनीं पूर्ण लक्षांत ठेवून नसते दोष त्यांच्या अंगीं त्यांनीं लावूं नयेत अशी आमची त्यांस नम्र विनंति आहे. (बाकी ते दुर्दैवानें स्वर्गवासी झालेले असल्यामुळें तसें होणेंहि अशक्यच. त्यांच्या मृत्यूची खबर त्यांच्या पुस्तकाचे प्रारंभींच वाचून *आम्हांस फार वाईट वाटलें. कारण आम्हांस प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचे कामीं त्यांचें बिनमोल सहाय्य झालें आहे, व त्याबद्दल आम्हीं त्यांच्या स्वर्गस्थ आत्म्याचे सदैव कृतज्ञ अ होंत. ईश्वर त्यांच्या आत्म्यास सुखांत ठेवो! अशी आमची त्या प्रेमळ प्रभूजवळ अनन्य प्रार्थना आहे.)

पण धर्मराज खोटें बोलले खरे. पांडव सैन्याची धुळधाण उडवणाऱ्या व अजिक्य अशा त्या विप्रानें युद्धाच्या सुरवातीसच धमराजास सांगितलें होतें कीं, कांहीं अनिष्ट बातमी कानावर येऊन शस्त्र खालीं टाकून मी दुःखानें स्वस्थ बसेपर्यंत माझा वध होणें शक्य नाहीं. ही गोष्ट श्रीकृष्णही विसरले नव्हते, व यासाठीच " अश्वत्थामा मेला " असें द्रोणांस कळवून त्या वृद्ध विप्राच्या नाजुक मर्मस्थानावर घाव घालण्याचें त्यांनीं ठरविलें. लहानपणीं लाह्यांचे पिठाचें पाणीच दूध म्हणून पिऊन आनंदानें बागडणाऱ्या एकुलत्या एक अश्वत्थाम्यावर द्रोणांचें किती प्रेम असेल—दारिद्र्यांतही आपल्या गुणांनीं बापास सुख देणारा तो सुलक्षणी बालक त्यांचा किती जीव कीं प्राण असेल—याची वाचकांनींच कल्पना करावी. "आत्मावैपुत्रनामासीत्" अशी श्रुति आपणास हेंच सांगते. त्यांतून तो मुलगा सुलक्षणी व एकुलता एक असल्यावर तर त्याच्या मृत्यूच्या वार्तेनें त्याच्या पित्याच्या हृदयाची किती घालमेल होत असेल, याची कल्पना द्रोणासारख्या त्याच्या दुर्दैवी पित्यावांचून इतरांस कशी होणार ? पण हीच घालमेल करून त्यांस निशस्त्र करण्याचें श्रीकृष्णांनीं—खुद्द श्रीकृष्णांनीं—ठरविलें. कारण ब्राह्मणाच्या जन्माला येऊन युद्ध करणारा तो विप्र असत्पक्षाची कड घेऊन सत्पक्षाकडील सैन्यास सारखा धूळ चारीत होता—

---

* "भारतीय युद्ध"—आवृत्ती ३ री.—' तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना '—पान ९ पहा.

कृतांत काळ होऊन कोणासच आटपेनासा झाला होता. वास्तविक "आपुल्याचेनि कैवारें" श्रीकृष्णांनीं जर दोनतीनदां प्रतिज्ञा मोडलीच होती तर ती पुरी मोडून सर्व दुर्जनकौरवांचा संहार त्यांनीं एकट्यांनीं सुद्धा करण्यास कांहीं हरकत नव्हती. म्हणजे मग कापट्यवधाचे प्रसंग तरीं त्यांच्या पांडव भक्तांवर पडले नसते. पण एक तर मुळापासूनच असत् व कपटी अशा प्रतिपक्षास व त्यास साह्य करणाऱ्या दुर्जनांस कपटानें मारले म्हणून तरी काय बिघडलें, हा विचार कृष्णांच्या मनांत आला असला पाहिजे; दुसरी गोष्ट दोन्ही पक्षांचा झगडा लागून युद्धाची मौज त्यांत दिसली नसती व आपल्या भक्तांची विजयी वीर म्हणून ख्याती झाली नसती असें त्यांस वाटलें असेल, व तिसरी गोष्ट खुद्द पांडवांची लढण्याची तयारी होती. तेव्हां त्यांस लढवून शक्य तिथें मदत करून भल्याबुऱ्या मार्गांनीं कृष्णांनीं हा झगडा शेवटास नेला आहे. कादंबरीच्या दृष्टीनेंही असेंच होण्यांत रसाचा जास्त उठाव होता, हेंहीं व्यास जाणून होते. यांत आमच्यामतें प्रतिपक्षाचे प्रमुख वीर मारण्याचें कामीं मात्र पांडवांचें शौर्य बिलकुल दिसलें नाहीं हें आम्हीं मागें सांगितलेंच आहे. बाकीच्या गोष्टी मात्र थोड्याबहुत साधल्या आहेत. असो.

अर्जुनास ही खोटें बोलण्याची गोष्ट ठाऊक होती कीं नाहीं ह्याबद्दल रा. लिमये व रा. पांगारकर यांचा मतभेद दिसतो. पण ती ठाऊक असो वा नसो. 'ध' चा 'मा' करून धृष्टद्युम्नानें द्रोणांचें शिर उडवल्याचें जेव्हां अर्जुनास कळलें—अथवा त्याच्या डोळ्यांदेखत तें कापलें गेलें—तेव्हां त्यास साहजीकच फार वाईट वाटलें आहे; कारण तो फार गुरुभक्त होता व पंतांनीं त्याच्या हृदयाचा शोक फार सुंदर वर्णिला आहे. तो वाचीत असतां त्याशीं एकजीव होणार नाहीं असा एकही पामर पृथ्वीवर नसेल. विशेषेंकरून शेवटची आर्या तर फारच हृदयस्पर्शी आहे! गुरूंच्या मृत्यूनें दाटलेल्या शोकावेगाच्या कंठानें अर्जुन म्हणतो, "राज्यपद अनर्थास्पद केवळ याच्या धरूनि लोभातें। गुरुपद गमाविलें कीं, गेलें घेऊनि सत्य शोभा तें॥" पण द्रोणांचा वध कसा झाला तें आपण आधीं थोडक्यांत पाहूं. अश्वत्थाम्याच्या मृत्यूची खोटी वार्ता द्रोणांस सांगण्यास वरीलप्रमाणें पुढें शोक करणारा धनंजय—

त्यांचा पट्टशिष्यच—तयार होणें शक्यच नव्हतें. तेव्हां हें काम आमच्या आडदांड भीमानें उचललें. मालवाधिप इंद्रवर्म्याचा ' अश्वत्थामा ' नांवाचा हत्ती स्वतःच्या गदेनें ठार करून तो द्रोणांच्या जवळ गेला व " अश्वत्थामा ठार मारला ! " म्हणून त्यानें ओरडून सांगितलें. तेव्हां म्हाताऱ्याचें धैर्य थोडेसें खचलें. परंतु धर्माच्या सत्यनिष्ठेवर त्यांचा फार भरंवसा होता, म्हणून त्यांनीं त्याच्याकडे अपील नेलें. " अश्वत्थामा खरोखरच मारला काय ?" द्रोणांनीं सडेतोड प्रश्न टाकला ! उत्तर देणारे धर्मराज होते. प्रसंग मोठा आणीबाणीचा होता ! पण शेवटीं एका दृष्टीनें धर्मराज हरले. खालच्या कोर्टाचीच शिक्षा त्यांनीं कायम केली—सत्याचा लपंडाव केला. " अश्वत्थामा हत" म्हणून धर्मराज इन्साफ बोलून गेले ! पण असत्य भाषणाचें प्रथमच पाप करणाऱ्या धर्माचे ओठ त्यावेळीं थर-थर कांपत होते, अंगास दरदरून घाम सुटला होता. त्यांची सत्यवादी मनोदेवता त्यांस कायमची गप्प बसूं देणें शक्य नव्हतें. अडखळत अड-खळत—सावकाश व हळू " गज " असा शब्द त्यांच्या मुखावाटें बाहेर पडलाच ! पण त्याचा उपयोग काय होता ? " नरोवा कुंजरोवा"ची लटपट करणाऱ्या ह्या न्यायाधिशाच्या इन्साफाप्रमाणें फांशीच्या शिक्षेची तिकडे तयारीही झाली होती ! कारण तें पहा, वरील शब्द प्रत्यक्ष धर्माच्या तोंडून ऐकल्याबरोबर म्हाताऱ्याच्या डोळयांत टचकन् अश्रु उभे राहिले, व पुत्रशोकानें विव्हल झालेल्या द्रोणांनीं आपलीं शस्त्रें टाकून देऊन ते एखाद्या अबलेप्रमाणें ढळढळा शोक करूं लागले ! आपल्या पित्याच्या व पुत्रांच्या वधास कारण झालेल्या द्रोणांचा सूड घेण्यासाठीं धृष्टद्युम्नाची स्वारी त्यांच्यावर याच सुमारास चालून येत होती. अर्थात् ही संधी अनायासें त्यास मिळाल्याबरोबर तो त्यांच्या—द्रोणांच्या—रथावर चढला व शोकसमाधींत निमग्न होऊन शस्त्रसंन्यास करून बसलेल्या त्या ८५ वर्षांच्या वृद्ध गुरूंची शेंडी धरून त्यानें आपली तरवार उपसली ! अरेरे ! कोण तो भीषण प्रसंग ! " हां ! हां ! गुरूंना जिवंत धरा ! मारूं नका ! " म्हणून अर्जुनानें व पांडवपक्षीयांनीं ओरडा केला ! पण आपल्या बापाचे पांच पाट काढून त्यास आपल्या पायांवर नमविणाऱ्या व शेवटीं नातवांसकट त्यास ठार करणाऱ्या त्या म्हाताऱ्या ब्राह्मणास तो

तसा थोडाच सोडणार ? त्यानें "ध"चा "मा" केलाच व आपल्या तरवारीच्या फटकाऱ्यानें–अरेरे–त्या अजिंक्य वृद्ध वीराचें मस्तक छाटून तें त्यानें कौरवसेनेपुढें फेंकून दिलें !

शेवटीं द्रोणाचार्यांच्या वधाची वार्ता संजयमुखानें ऐकणाऱ्या धृतराष्ट्रानें त्यांसाठीं केलेल्या हृदयस्पर्शी विलापाचें पंतकृत वर्णन देऊन आम्ही हें प्रकरण पुरें करणार आहोंत. "धृतराष्ट्र विलाप करी" पंत म्हणतात, "बहु आपण आपणासि निंदुनि घे। स्मृति हरपे करपेचि न तन्नयनांतूनि अश्रुबिंदु निघे ॥ बहुजन बुडवुनि शोकीं, दुष्टा दुर्योधना बुडालास। मकरालय लंघाया मत्ता मशका कसा उडालास ?॥ गज गोष्पदीं बुडाला, हा दैवा ! सिंधु शोषिला मशकें। न शके सोसाया हें वधिला तो केसरी कसा शशकें ? ॥" याप्रमाणें धृतराष्ट्रानें बहुत विलाप केला आहे. अर्जुनाचा विलापहि वर आलाच आहे. आणि द्रोणासारख्या असत्पक्षीय झाल्या तरी वृद्ध ब्राम्हण वीराची वरीलसारखी अमानुष वधकथा ऐकून कोणास बरें क्षणभर वाईट वाटल्यावांचून राहवेल ? ते देहानें जरी दुर्योधनाच्या 'अर्थाचे दास' होते तरी त्यांचें मन निस्संशय पांडवांचेंच कल्याण चिंतीत होतें. पण असें असूनहि बापड्या वृद्ध गुरूंना त्यांच्या शिष्यांकडूनच मृत्यु यावा, ही विधिघटना किती विचित्र आहे ! किंबहुना, अशा विचित्र विधिघटनेचीं चित्रें आपणास भारतांत किती तरी दृष्टीस पडतात. भीष्मद्रोणादिकांचीं देह व मन ह्यांच्या फारखतीच्या स्थितींत कितीही ओढाताण झालेली असो, व दुर्योधनाच्या दृष्टीनें फितुरी किंवा बेइमानी,+ व सत्पक्षाच्या दृष्टीनें

+ कारण, "मी धर्माला धरून देईन; मात्र त्यावेळीं अर्जुन जवळ नसला पाहिजे." ही अट तरी त्यांनीं कां घालावी ? ह्या त्यांच्या अटींतही, कर्तव्याला जागणारे सडेतोड इमान दिसत नसून आपल्या पट्टशिष्याबद्दलचें प्रेमच दिसत नाहीं काय ? अर्थात् ते रा. लिमये म्हणतात त्याप्रमाणें (भा. यु. पा. १६२–६३ पहा.) 'आपल्या कर्तव्यास जागले' नसून 'कर्तव्य कीं प्रेम' ह्या झगड्यांत त्यांनीं प्रेमासच जास्त प्राधान्य

(पुढें चालू)

ते कितीही ' दुर्जन ' ठरोत–आणि ते तसे ठरतातच हें मागें आम्हीं जागोजाग दाखविलेंच आहे–तरी पण ते जे वागले तं अनिश्चयपूर्वक असलें–निश्चयात्मिका बुद्धीनें जरी वागले नसले–तरी जे वागले तें प्रामाणिक समजुतीनें तसें वागले, त्यांच्या दृष्टीनें प्रामाणिकपणेंच त्यांनीं आपला मार्ग स्वीकारला होता, ही गोष्ट महाभारताच्या सूक्ष्म अवलोकनानें कोणासहि पटणार आहे. कर्तव्याकर्तव्याचा किंवा दोन गोष्टींची निवड करण्याचा प्रसंग येऊन पडला असतां त्यांची बुद्धि शबल झाली असेल–आणि अशी न होणारे महात्मे फार विरळा–पण त्यांच्या वागणुकींत एक प्रकारचा प्रामाणिकपणा दिसतो–निदान त्यांचें हृदय तरी त्यांस तसें सांगत आहे, असें दिसतें. कारण सदसद्विवेकबुद्धीस पायाखालीं तुडवून त्यावर नाचणारे ते दुर्योधनादिकांसारखे नरपशु नव्हते. आणि म्हणूनच–वर सांगितलेल्या ह्या त्यांच्या हृदयस्थ खरेपणाबद्दलच–त्यांच्याविषयीं सहानुभूति वांटून त्यांच्या मृत्यूमुळें साहजीकच मन क्षणभर विषण्ण होतें ! पण आपणांस आतां हें दुःख आवरून पुढील कथाभागाकडे वळले पाहिजे.

खुद्द अश्वत्थाम्यास–रणभूमीवर दुसरीकडे झगडणाऱ्या द्रोणपुत्रास–आपल्या पित्याच्या मृत्यूनें–पुत्रवत्सल तातांच्या निधनवार्तेनें किती शोक झाला असेल, व " हा तात !" म्हणून त्यानें केवढा टाहो फोडला असेल, याचें चित्र रंगवणें फारच कठिण आहे ! सूडाच्या भावनेनें भरारलेल्या अश्वत्थाम्यानें भयंकर " नारायणास्त्र " सोडून पांडवसेना जाळण्याचा सपाटा लावला. शेवटीं कृष्णांच्या सांगण्यावरून शस्त्रें खालीं

---

दिलें आहे ह्या आमच्या मागील विधानांस ह्याही उदाहरणानें बळकटीच येत आहे ! अर्थात् हें आमचें सर्व लिहिणें दुर्योधनाचा पक्ष लक्षांत घेऊन आहे हें सांगणें नकोच. अर्थात् असें असूनही रा. लिमयांनीं त्यांच्या कर्तव्यपालनाचा जो दिमाख दाखविला आहे ( भा. यु. पा. १६२–६३ पहा ) तो किती फोल आहे हेंच आम्हांस ह्याही प्रसंगावरून वाचकांस पटवून द्यायचें आहे, व वाचकांनाही आतां तें पटले असेल अशी आमची खात्री आहे ! असो.

ठेवून जेव्हां सर्वांनीं त्या अस्त्राला नमस्कार केलें, तेव्हां कोठें तो अग्नि शांत झाला. नंतर कृष्णार्जुनांवर त्यानें "आग्नेयास्त्र" टाकलें, पण ब्रह्मास्त्रानें त्याची अर्जुनानें शांति केल्यावर, बापडा रणांतून दूर निघून गेला ! लवकरच सूर्यास्त होणार, म्हणून लढाईहि थांबली. कारण दोन्ही सैन्यें दोन दिवस व एक रात्र सारखीं झगडत असल्यामुळें अगदीं थकून गेलीं होतीं ! वाचक ! आपणही त्यांच्याबरोबर थोडा विसांवा घेऊं या !



# भाग ७ वा.



मागील भागाच्या शेवटीं अश्वत्थामा रणांतून हतवीर्य होऊन निघून गेला म्हणून सांगितलें. परंतु तेवढ्यानें त्याच्या मनांतील सूडाची भावना शमली असें कोणीही समजूं नये. कारण लवकरच कोपानें खवळून जाऊन कृतांताप्रमाणें पांडवांचा सूड घेण्याची त्यानें भयंकर प्रतिज्ञा केलेली व ती शेवटास नेण्याचा डावहि जवळ जवळ साधल्याची हकिकत पुढें येणारच आहे. पण तत्पूर्वी आपणास 'कर्णपर्व' व 'शल्यपर्व' पहाणें आहे..

तसेंच गेल्या भागाचे अंतीं, द्रोणवधप्रसंगीं युधिष्ठिर धर्मांनीं जे असत्य भाषण केलें त्यामुळें जमिनीपासून–पापी जनांच्या स्पर्शानें विटाळलेल्या भूमीपासून–सत्यवक्त्या धर्माचा रथ जो चार अंगुळें उंच अंतरावरून चालत असे तो, "कोण मारलाहो ?" ह्या प्रश्नावर जी त्यांनीं "नरोवा कुंजरोवा" (म्हणजे मनुष्य किंवा हत्ती–पण अश्वत्थामा म्हणून कोणीतरी मेला खरा) अशी असत्यपूर्ण मखलाशी केली त्याबरोबर खाड्दिशी जमिनीस टेकला, व धर्मास असत्य भाषणाच्या परिणामाचा पहिला हदरा बसला ! ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कारण तीवरून खऱ्या सत्याची किंमत किंवा योग्यता किती आहे, व त्यांत अल्पशा असत्याची भेसळहि कशी चट्दिशी बाहेर पडते, हें चांगलेंच दिसून येतें. उघडच आहे; उदाहरणार्थ उद्यां जर महात्मा गांधींनीं एखादें असत्य विधान केलें तर त्यांची किती नाचक्की होईल, याचा क्षणभर विचार केल्यास वरील गोष्टीचा नीट उलगडा होतो. असो.

पण चला वाचक, तिकडे अंगदेशाधिपति कर्णास सेनापत्याचा अभिषेक होऊन त्यानें मोठ्या उत्साहानें आपला शंख फुंकून व विजयधनु सरसावून तो रथांत बसून रंगभूमीकडे निघाला सुद्धां ! युद्धास प्रारंभ

होऊन १५ दिवस पुरे झाले, तरी यशाचा बहुतेक वांटा पांडवांकडेच जातो ह्या विचारानें थोड्याशा नाउमेद झालेल्या दुर्योधनानें आपल्या सर्वस्वाचा आधार जो कर्ण त्यास आज सेनापत्य दिलें होतें. कर्ण हा अनेक वगुणांचें एक मिश्रण होता. कृतज्ञता, औदार्य, व शौर्य हे गुणांगुण त्याचे अंगीं होते. परंतु त्याजबरोबर नकुळानें त्यास बजावल्याप्रमाणें, धर्मानीं अर्जुनास सांगितल्याप्रमाणें, व खुद्द भगवंतांनीं अर्जुनास कर्णाशीं गांठ घालण्यापूर्वीं म्हटल्याप्रमाणें, कर्ण हा भारतांतील सर्व अनर्थाचें एका दृष्टीनें खरोखर मूळ आहे असे आम्ही साफ म्हणतों. आणि म्हणूनच अनाठायीं वेचलेल्या त्याच्या औदार्यपूर्ण कृतज्ञतेची व मैत्रीच्या दार्ढ्याची आम्ही कवडीइतकीहि किंमत समजत नाहीं. कारण त्याची मैत्री—दृढमैत्री—ही खास संत्सगाति व सन्मैत्री नव्हती! पापी कृत्याच्या मद्याचे प्याले दुर्योधनास पाजून शेवटीं त्याच्या सर्वस्वाचा नाश करणारा तो ' तळीराम ' होता ! मित्र कोणास म्हणावें याची व्याख्या कर्णाची तरफदारी करणारांसच कळते आणि आम्हांस काय कळत नाहीं. ! कर्ण हा दुर्योधनाचा वरवर पहातां मित्र दिसत असेल. पण तो त्याचा सन्मित्र नव्हे. " तो मित्र होय बापा ! पापाचागंत जो बुडो नेदी । " ह्या मित्राच्या व्याख्येंत कर्ण बिलकूल येत नसून, उलट कृष्णांनीं त्याच्या मृत्युप्रसंगीं त्यास दाखविलेल्या सर्व पापांच्या व अनर्थांच्या कोलती दुर्योधनाचे हातांत देऊन त्याच्या घरास आग लावणारा तो आग्यावेताळ होता ! तळिरामास सुधाकराचा जितपत मित्र म्हणतां येईल, तितपतच कर्णासहि दुर्योधनाचा मित्र म्हणतां येणार आहे. कारण प्रत्यक्ष लढाईच्या प्रारंभाच्या वाटाघाटीच्या वेळची जरी गोष्ट घेतली, तरी त्याच वेळीं आम्ही म्हटल्याप्रमाणें, कर्णानें ' आधींच मर्कट ' अशा दुर्योधनास आपल्या घमेंडखोर दुजोऱ्याचे 'मद्य' पाजले आहे. असा हा 'थोर' ' मित्रत्वाचा " पुतळा होता ! पंतांनीं केलेली थोरांची व्याख्या असल्या अधमांना खास लागू पडत नाहीं, अशी आमची समजूत आहे. नाहीं तर दुर्योधनाच्या आज्ञेनें द्रौपदीचें वस्त्रास हात घालणाऱ्या नीच दुःशासन सही थोर म्हणावें लागेल. त्याना थोर म्हणून ज्यांना डोक्यावर घेऊन नाचायचें असेल त्यांनी खुशाल नाचावें! पण आम्हांस तर तो वरीलप्रमाणें दिसत आहे.

पण कर्णाची तरफदारी करणाऱ्या रा. पांगारकरांस तो मोठा सद्गुणशाली दिसत आहे! पण त्यांनींच सांगितलेल्या ' चार प्रश्नांचा ' उलडा कर्णानीं स्वतःशीं कसा केला होता—विशेषेंकरून शेवटच्या तीन प्रश्नांचीं उत्तरें त्यानें काय दिलीं तीं आम्हांस ते सांगतील काय ? आणि तीं उत्तरें तरी त्यानीं कितपत बरोबर पाळलीं बरें ? आमच्या मतें तीं उत्तरें समर्पक देतां येणेंहि कठिण किंबहुना अशक्य आहे ! " केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोस्मि तथा करोमि" असे दुर्योधनाचेहि उद्गार आहेत. म्हणून तेवढ्यावरून जसें कोणी त्यास साधुत्वाच्या कोटींत घालणार नाहीं, तीच गत कर्णाची होईल असें आम्हांस वाटते. कर्ण जर एका दृष्टीनें थोर असेल तर दुसऱ्या दृष्टीनें तो तितकाच " नीच " होता असें खुद्द भगवंत त्यास म्हणत आहेत ! बेकनप्रमाणें त्याच्या ठिकाणीं स्थिति होती. अधिक खोल शिरून बोलायचें तर त्याच्या ठिकाणीं सद्भावनांचीं बीजें होतीं, पण तीं असत्पक्षाच्या स्वीकारामुळें निंद्य झालीं. दरोडेखोराच्या शौर्याची स्तुति किंवा बुद्धिमत्तेची तारीफ करण्याप्रमाणें हें होणार आहे. पण कर्णासारख्या मंडळींची व त्यांच्या स्तुतिपाठकांची या कामीं, प्रामाणिकपणानेंच कां होईना, पण दिशाभूल झालेली आहे असें आम्हांस वाटतें. क्षणैक पाहिजे तर तुम्हीं त्यांची स्तुति करा—स्वतंत्र गुणांच्या दृष्टीनें करा. पण जेव्हां वर्गीकरण करण्याची व थोरांनीचांची व्याख्या करण्याची वेळ येते तेव्हां " नीचां"ना " थोरां"च्या कोटींत नेऊन बसवूं नका एवढेंच आमचें म्हणणें आहे. पण पक्ष कोणचाही असो; त्यास चिकटलेल्या मनुष्यानें एकदां चिकटल्यावर आमरण त्यासच चिकटून रहावें व इमानेंइतबारें त्याच्यासाठीं—त्याच्या कल्याणासाठीं झटावें व झगडावें ह्याप्रमाणें पहातां—हीच जर उच्च नीति असेल तर—त्याप्रमाणें कर्ण पुष्कळसा वागला असें म्हणावयास हरकत नाहीं. पण असत्पक्षाच्या बाजूचा स्वीकार करणें हीच गोष्ट आधीं उच्च नीतींत पडत नाहीं! मग त्यासाठीं झटणें व झगडणें कसें पडणार ? सत्पक्ष व त्याची बाजू हीच जगांत कोठेंहि व केव्हांहि गेलें तरी श्रेष्ठ आहे, व देह जरी दुर्दैवानें असत्पक्षाच्या बाजूस असला तरी आत्म्याची व मनाची ओढ, आणि म्हणूनच देहाच्याहि शक्य तितक्या क्रिया, असत्पक्षास बेइमान होऊनहि सत्पक्षाच्याच बाजूकडे झुकल्या

हल्यात, हीच गोष्ट भीष्मद्रोणादिकांनीं सिद्ध करून दिली आहे. निर्भेळ नीती-प्रमाणें देहाच्या दास्याच्याहि शृंखला तोडून उघड उघड राजिनामे देऊन सत्पक्षाचाच स्वीकार करणें केव्हांही अधिक बरें झालें असतें, ही गोष्ट तर खरीच. पण तसें नच जमलें, व "खाल्लेल्या अन्नाचें मिंधेपण" फारच आड येऊं लागलें, तरी सुद्धां "हें अन्न आम्ही शेवटीं त्या श्रीहरीचें खात आहों, "तो राम आम्हाला देतो" आहे तेव्हां त्याच्या कार्यांतच शेवटीं देहानें सुद्धां शक्य तितकी मदत केली पाहिजे" अशी भावना ठेवणें हेंच सर्वांचे खरें कर्तव्य ठरत नाहीं काय? नाहीं तर शिवाजीनें पंत गोपीनाथासारख्यांस व रामदासांनीं वरील बचनद्वारें— "आम्ही काय कुणाचे खातोंरे" ह्या बचनद्वारें व इतरहि उपदेशांनीं— सर्व लोकांस जो उपदेश केला तो कमी प्रतीचा ठरून कर्णासारख्या असत्पक्षाच्या "कुत्र्यांना" भीष्मद्रोणांच्याहि डोक्यावर बसवावें लागेल! पण वर आम्ही सांगितलेल्या ह्या खऱ्या नीतिमत्तेनें भीष्मद्रोणच कर्णाहून शतपटीनें श्रेष्ठ ठरत आहेत! त्यांनीं वारंवार व भीष्मांनीं तर शरपंजरींसुद्धां, तसेच पुढें अश्वत्थाम्यांनीं व कृपाचार्यांनीं, दुर्योधनास नाना तऱ्हेनें उपदेश केलेला आहे. ह्या सर्वांनीं सत्पक्षाविरुद्ध शस्त्र सुद्धां उचलण्याचें साफ नाकारावयाचें होतें, एवढेंच आमचें त्यांच्या बाबतींत जास्त म्हणणें आहे, व तें आम्हीं मागें बोलून दाखविलेंच आहे. कारण सत्पक्षाच्या दृष्टीनेंच विचार करतां सत्पक्षाच्या बाजूनें लढणाऱ्या एकाहि सैनिकाचा मुडदा तरी त्यांनीं काय म्हणून पाडावा? तो सत्पक्षाच्या बाजूनें लढला म्हणून, कां आपण असत्पक्षाच्या अन्नावर पोट जाळलें म्हणून? पण ह्या "दास्याची"च कल्पना त्यांच्या थोडीबहुत आड आली हें उघड आहे, व ती एकदां कबूल केली कीं, वरील नीतिप्रमाणें त्यांचें वागणें कसें चोख होतें, हें आतांपर्यंत आपण पाहिलेंच आहे. कारण दुर्योधनाशीं जिथें जिथें बेइमान, तिथें तिथें सत्पक्षाशीं—सत्याशीं—श्रीहरीशीं त्यांनीं इमानच राखलें, हें विसरून चालणार नाहीं. दुर्योधनाशीं केलेल्या सेवक ह्या नात्याच्या त्यांच्या बेइमानीपणावर जी आम्ही झणझणीत टीका केलेली आहे ती अर्थात् तेवढयाच दृष्टीनें असून ती सत्पक्षाच्या दृष्टीनें त्यांची गर्भित स्तुतीच ठरते, हें विचारी वाचक जाणतीलच. आतां आपण कर्णाकडे वळ-

त्यास कर्ण त्याप्रमाणें वागला काय? असा आमचा प्रश्न आहे. कुंतीला वचन देऊन त्यानेंहि थोडीशी बेइमानी केली असें आम्हीं मागें म्हटलेंच आहे. पण हा पुढला भाग झाला, व कदाचित् कर्ण हा बेइमानी झाला हें विधान सुद्धां कित्येकास आवडणार नाहीं. पण आम्ही असें विचारतों कीं, भीष्म द्रोणाप्रमाणें कर्णानीं सत्पक्षासाठीं दुसरी काय खटपट केली? पहिल्यापासून —" चारुनि विषान्न भीमा " एथपासून—अधर्मासच उत्तेजन दिलेंना ? चांडाळचौकडीचे अग्रणी बनून कपटद्यूत, द्रौपदीचा छळ व अपमान, इत्यादि गोष्टी त्यानेंच करविल्याना ? व शेवटीं इतर्का मंडळी—कृष्ण, भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र व्यास, गांधारी, इत्यादि मंडळी—सांगत असतां युद्धाची आग असत्पक्षाकडून त्यानेंच सर्व कुरुक्षेत्रावर पाखडाविलीना ? " धर्मराजच राजा होण्यास सर्वथैव योग्य आहे " ह्या त्याच्या उद्गारावरून त्यास धर्माधर्म कळत होतें असें दिसतें. पण तो नुसता शाब्दिक पंडित होता ! असो. कोळसा उगाळावा तितका काळाच ! तो सन्मित्र कसा नव्हता, हें आम्हीं वर दाखविलेंच आहे. एकंदरींत कर्ण हा असा होता ! पण तो जसा होता तसाच त्यास घेऊन आपणांस ' कर्णपर्व ' संपवलें पाहिजे. कर्ण रणांगणावर जाऊन पोंचलाही असेल! चला वाचक, आपणहि तेथें जाऊन काय काय झालें तें पाहूं.

कर्णाच्या शौर्यासंबंधीं विचार करतां तो शूरापेक्षां घमेंडखोरच जास्त होता, असें दिसून येतें. युद्धाच्या वाटाघाटीचे वेळीं त्यानें " मी एकटा तुला जय मिळवून देईन, अन् यंव करीन अन् त्यंव करीन " अशा त्यानें खूप लंब्या लंब्या बाता मारल्या होत्या. त्याच्या सेनापत्याच्या दुसऱ्या दिवशीं आपल्या सारथ्याजवळ—शल्याजवळहि त्यानें अशाच "वल्गना" केलेल्या आहेत. पण त्यानेंच नकुलास म्हटल्याप्रमाणें, " शूर पुरुष पराक्रमाच्या वल्गना करीत नसतात. " ही गोष्ट तो साफ विसरला. आपण दुसऱ्यास केलेला उपदेश आपण स्वतःच किती पाळतो, याची सुद्धां त्याला बिचाऱ्याला आठवण राहिली नाहीं. तेव्हां त्याच्याच वचनाप्रमाणें तो " शूर " ठरत नाहीं. यावरून तो भ्याड होता किंवा वीर नव्हता, असें आमचें केव्हांहि म्हणणें नाहीं. तो असामान्य वीर होता यांत शंका नाहीं. येथें एकच शंका उद्भवते, व ती म्हणजे

अर्जुनाची व त्याची तुलना केल्यास शौर्यांत ती कशी होईल ? घोषयात्रेच्या वेळेस व गोग्रहणाचे वेळेस कर्ण पराभूत झालेला आहे, व 'विजया'चें वरचढ विजयीपण त्यावेळीं प्रस्थापित झालें आहे—दिसून आलें आहे. पण असें म्हणावें, तर कर्णास तो रथचक्र उद्धरीत असतां—अर्जुनांनीं कां मारावें याचा उलगडा काय ? याचा उलगडा श्रीहरिमुखानेंच झाला आहे, व तो म्हणजे " कर्ण हा अर्जुनाहूनहि कांकणभर जास्तच शूर होता." पण मग " हें त्याचें शौर्य मागें वर सांगितलेल्या प्रसंगीं कोठें गेलें होतें" हा भीष्मांनीं व शल्यानीं केलेला प्रश्न राहतोच. व त्याचा समाधानकारक उलगडा होत नाहीं!

कोणीहि कोणापेक्षां शूर असो, किंवा दोघेहि तुल्यबल असोत; शूरांना शौर्याची घमेंड असतेच. पण आमच्या कर्णाच्या वल्गना फारच. त्या ऐकून शल्यासच नव्हे तर कोणासही त्याचा वीटच आला असता. 'गर्जेल ते पडेल काय ?' म्हणतात त्याप्रमाणें याचें आपलें गर्जणेंच जास्त. पण तें असो. पहिल्या दिवशीं कौरवसेनेचा मकरव्यूह व पांडवांचा अर्धचंद्रव्यूह होता. पांडवांच्या व्यूहाच्या एका टोकास भीम होता. त्यानें क्षेमधूर्तीस त्याच्या हत्तीसह गदेनें ठार केलें. नकुलानें लहान तोंडीं मोठा घांस घेऊन कर्णास युद्धास आव्हान केलें, व पुष्कळ वेळ तो त्याशीं बरोबरीनें झगडला. पण कर्ण हा किती केला तरी असामान्य व कसलेला योद्धा होता. त्यानें लवकरच त्यास निःशस्त्र व विरथ केलें व तो पळून जाऊं लागला तेव्हां त्याच्या गळ्यांत धनुष्य अडकवून असा लहान तोंडीं मोठा घास न घेण्यास व आपल्या बरोबरीचा पाहून युद्ध करण्यास त्यास बजावून कुंतीस दिलेल्या वचनासाठीं त्यास धनुष्यासकट जीवदान दिलें. नंतर धर्म व दुर्योधन यांची चांगलीच जुंपली. त्यांत धर्मांनीं खूपच पराक्रम करून एका महाशक्तीनें दुर्योधनास रथांतच घायाळ व मूर्छित केलें. पण हा ' वांटा ' भीमाचा आहे असें जाणून त्यांनीं आपला हात आंखडतां घेतला, व त्यास जिवंत जाऊं दिलें. याप्रमाणें मुख्य युद्धें झालीं. याशिवाय संकुल युद्धें व किरकोळ समान युद्धें सुरूच होतीं. कांहीं वेळानीं सूर्यास्त व्हावयाच्या सुमारास दोन्ही सैन्यें आपापल्या छावणीकडे परतलीं.

दुसरा दिवस उगवला. कर्णासारख्या वीराला सारथीहि तसाच कुशल

हवा असणें साहजीक आहे. गवयाला उत्तम साथीची जितकी जरूर त्याहूनहि कांकणभर जास्तच उत्कृष्ट सारथ्याची योद्धयाला जरूर असते. कर्णानें दुर्योधनास ही गोष्ट सांगितली, व शल्य कृष्णाच्या तोडीचा सारथी आहे, तो जर माझें सारथ्य करील, तर मी तुला खात्रीनें जय मिळवून देईन, असें तो म्हणाला. गरजू दुर्योधन शल्याकडे गेला व कांहींशी भीत-भीतच त्यानें ती गोष्ट त्याजजवळ काढली. शल्य हा किती झालें तरी मद्रदेशचा राजा होता. तेव्हां साहजीकच त्याला या म्हणण्याचा राग आला—" सिंहासनोचिताला मज सारथ्याधिकार हा नीच । इच्छिसि नृपा कराया मत्तेजाची जनांत हानीच॥" शल्य त्या रागाच्या आवेशांत म्हणाला " अरे, 'हे दास सूत बंदी यांहीं आम्हां नृपांसि वानावें । सारथि होउनि उच्चें जो नीच रथीं तदुक्त मानावे ? ॥ " असें म्हणून शल्य त्या रागाच्या सपाट्यांत स्वदेशास जाण्यास निघाला. पण दुर्योधन मोठा कार्यसाधु होता. त्यानें शल्यापाठोपाठ धांव घेतली, व त्याच्या चरणीं मिठी घालून त्याची परोपरीनें स्तुति केली. त्यांतील "हय–हृदय कृष्ण जाणे त्याहुनि तूं द्विगुण जाणसी माम्या । भुजयुद्धींहि परिसिली न बळाची तुझिच आण-सीमा म्यां ॥" ही गोळी बरोबर लागू पडली ! असें दिसतें. स्तुतीमाऊ-लीचा प्रभावच तसा आहे ! दुर्योधनानें–शकुनीच्या भाच्यानें–केलेल्या मिष्ठास स्तुतीनें शल्याची कळी खुलली ! "शल्य म्हणे राया मज राजसमूहांत हात जोडोनी । म्हणसी कृष्णाधिक हें दुर्भल यश जात नाहीं सोडोनी ॥" तेव्हां–" झालों प्रसन्न तुज मी वर देतो घे करीन सारथ्य । " पण इथेंच शल्यानीं एका विलक्षण अटीची खुंटी पिरगाळलीच–" पथ्य अपथ्य न म्हणतां परि सोसावें मदुक्त हें तथ्य ॥" "कबूल, बाबा, कबूल ! " दुर्यो-धन व कर्ण एकदमच म्हणाले. करतात काय ? 'अडली गाय अन् फटके खाय.' हा शल्य प्रथम पांडवांच्याच बाजूनें लढण्यासाठीं निघाला होता. पण दुर्योधनानें आदरातिथ्यानें त्यास वाटेंतच गार करून मग तें आदरा-तिथ्य पांडवांचें नसून–कारण शल्य तसेंच समजत होता–आपलें आहे अशी त्यास ओळख दिली. अर्थात् प्रसन्न शल्यानें आधींच कबुली दिल्यामुळें त्यास दुर्योधनाकडे राहावें लागलें. दुर्योधनानें कर्णासहि " यावज्जीव असावी त्वन्मैत्री स्थिति धरून शैलाची ।" ही केलेली वरवर

पाहतां साधीच मागणी खरोखरी किती बळकट होती–तिचे अदृश्य पाश किती दृढ होते–व त्यांत त्या दुष्टानें कर्णासारख्या उधारधीच्या औदार्याचा फायदा घेऊन त्या मोहऱ्यास कसें कायमचें जखडून टाकलें होतें, हें आपण मागें पाहिलेंच आहे, व त्यावरून त्या कपटपटु दुर्योधनाच्या दूरदर्शित्वाची कमाल खरीच, असें क्षणभर वाटल्यावांचून राहत नाहीं.

पण आमचा शल्य इतक्या मोकळ्या, उदार व दिलदार वृत्तीचा नव्हता ! तो मनांतून पांडवांचाच जय इच्छीत असल्यामुळें त्यानें दुर्योधनास सांगितलेल्या अटींचा चांगलाच फायदा घेतला. व खुद्द धर्मानीं युद्धारंभींच केलेल्या प्रार्थनेप्रमाणें कर्णाचें सारथ्य त्याजकडे आल्यापासून त्याचा जागोजाग 'तेजोभंग' करून तो त्याचा रणोत्साह खचवूं लागला. पण शल्यानें तरी सत्पक्षाच्या दृष्टीनें तसें करण्यास कां कमी करावें ? ज्याला प्रत्यक्ष क्षमेनेंहि–( क्षमा=पृथ्वी )–क्षमा केली नाहीं त्या पापाच्या कांद्याची उपेक्षा इतरांनीं तरी कां करावी ? असत्पक्षाच्या बाजूनें ज्याचें वीर्य फुरफुरूं लागलें व ओठ भलभलतें प्रलपूं लागले, त्यास तिथल्या तिथेंच चोख उत्तर मिळावयास नको होतें काय ? बरें, शल्यानें ही अट उघड उघड घातली असतांना ती दुर्योधन–कर्णानीं मान्य कां करावी ? व मागून उगाच कां चरफडावें ? दुर्योधनास प्रथम दिलेलें वचन सेनापत्याचें होतें व तें त्यानें चांगलें पाळलेंहि, हें आपण लवकरच पाहाणार आहोंत. पण 'सूता' चा 'सूत' होण्यास कांहीं तो बांधलेला नव्हता. तथापि स्तुतीनें भुलून म्हणा, किंवा सत्पक्षास मदत करण्यासाठीं–कर्णाचा तेजोभंग करून धर्माची इच्छा पुरी करण्यासाठीं–म्हणा, पण त्यानें ती गोष्ट कबूल केली हें खरें. पण त्याच वेळेस त्यानें दुर्योधनास व कर्णास खडखडीत बजावलें होतें. त्यानें जर ते उमगलें नाहींत व त्याच्या म्हणण्यास जर ते कबूल झाले, तर सत्पक्षासाठीं त्याचा उपयोग करणारा शल्य निदान कापस्याचा तरी धनी होत नाहीं–दोषी ठरत नाहीं, हें उघड नाहीं काय ? अर्थात् दुर्योधनाचे बाजूनें बोलल्यास तो कांहीं अंशीं दोषी ठरतो, किंबहुना–सत्पक्षास फितूर असल्याचें पाप त्याच्या बोडक्यावर पुरें बसतें हें केव्हांहि खरेंच आहे. पण इमानानें लढण्याचें कामीं

त्यांनीं पुढें भीष्मद्रोणाहूनहि जास्त इमान दाखविलें, आहे असें निदान त्याच्या झगड्यावरून वाटतें. असो.

शल्यानें कर्णाचा केलेला तेजोभंग व त्यास दिलेलीं उत्तरें "सज्जनसंमत, हित, सत्य, श्राव्य" होतीं असें पंतहि म्हणतात. पंतांनीं तीं मोठ्या बहारीनें वर्णिलीं आहेत. तेव्हां त्याचा थोडासा मासला वाचकांपुढें ठेवून मग पुढील कथानाकाकडे वळूं. "मी आज अर्जुनाला असा जिंकीन अन् तसा जिंकीन. माझें भुजशौर्य असें आहे अन् तसें आहे!" इत्यादि वल्गना करणाऱ्या, व स्वतांपुढें भीष्मद्रोणासहि तुच्छ लेखणाऱ्या घमेंडखोर कर्णास शल्य म्हणतोः—"पार्थपयोधर गर्जे स्पर्धा मंडूक तूं किती करिशी। त्याच्यापुढें टुरुटुरु टरों टरों शब्द हे किती करिशी॥ श्वान स्वपोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे। जिकडे वनांत गर्जे शार्दूल तया दिशेकडे पाहे॥ ...शशमंडळांत कोल्हा म्हणतो मी सिंह वल्गना करितो। जोंवरि न पाहिला गज—मुक्ताफळ—कवळ—भक्षिता हरि तो॥" ह्याप्रमाणें त्याला शल्यानें सणसणीत झाडलेंच; पण त्याच्या आधीं त्याच्या पराक्रमाची तरी किंमत काय आहे, हेंहि त्याला पटवून दिलें. भीष्मद्रोणांच्या पराक्रमासहि तुच्छ लेखून, "पार्थप्रताप साहे आहे मज वेगळा असा कोण?। गंगासुत वृद्ध भला, तो ब्राह्मणही पुरातन द्रोण॥" याप्रमाणें उन्मत्तपणाच्या घमेंडींत त्यांना—भीष्मद्रोणांच्या शौर्यासुद्धां—कमी लेखून नांवें ठेवणाऱ्या, व स्वशौर्याच्या संनिपातांत वाटेल तशी बडबड करुन बरळणाऱ्या कर्णास शल्यानें झणझणीत उत्तर देऊन त्याच्या शौर्याची जाणीव त्यास करून दिली. "नरवर अर्जुन कोठें पुरुषाधम सूत—पुत्र तूं कोठें। वाचाळा नाचावें सत्स्तवनीं न स्ववर्णनीं ओठें॥ तुज नित्य घोष—यात्रा—स्मरण असों दे, परंतु हा मद तो। आहेचि विस्मृतीचें बीज, म्हणुनि लेशमात्र मी वदतों॥ तूं प्रथम पळालासि प्राण—क्षय—भय धरूनि मनिं मागें।जिंकोनि बद्ध केला दुर्योधन खचरनायकें रागें॥ बद्ध—विमुक्त सुयोधन तेव्हां त्वां कीं धनंजयें केला?। राधेय अन्य तूं तो अन्यचि जाणो पळोनि जो गेला!॥ त्या गोग्रहप्रसंगीं भीष्मद्रोणादि सर्व एकानें। केले भग्न दशा ते तुमची क्षण आयकों नयें कानें॥ तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया! कां न जिंकीला शस्त्रें?। अस्त्रें गेलीं होतीं कोठें, नेलीं हिरोनि जैं वस्त्रें?॥" या-

प्रमाणें शल्यानें त्याचें खरें स्वरूप त्याच्यापुढें मांडलें. पण खरें हें नेहमींच कटू असतें, व तें ' सांगणारे व ऐकणारेहि दुर्लभच ' असतात—'श्रोता-वक्ताच दुर्लभः ' हेंच खरें.

पण कर्ण हा खरा वीर होता, ही गोष्ट तितकीच सत्य आहे. दुर्योधनानें मागेंच म्हटल्याप्रमाणें वाक्शरांचें ताडन किंवा आघात सहन करणारा तो धैर्य—मेरू होता. कटु वागग्नीच्या भट्टींत घातलें तरी तावून सुलाखून निघणारें त्याचें शुद्ध शौर्यसुवर्ण होतें. व त्या दृष्टीनें पहातां क्षणैक शल्याची बाजू किती काळी व कर्णाची उज्वल दिसते ! असो. "एक वर्षांत स्वराज्य मिळवून देईन" म्हणण्यास तरी महात्मा गांधीसारखींच आत्मविश्वासाचीं निधडीं हृदयें लागतात. त्याचप्रमाणें कर्णाचें पुढील उत्तर आहे हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. कर्णहि तोंडीस तोंड उत्तर देऊन म्हणतोः—" दोघांची काय कथा जरि कृष्णार्जुन सहस्र येतील। तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हिरोनि घेतील ॥ तुज भेदिलें परानीं स्पष्ट म्हणुनि बोलसी असें खोटें। " इ. असो. यावरून कर्णाच्या शूर अंतःकरणाची चांगलीच परीक्षा होते. " कृष्णाला कर्ण न भी तनु टाकुनि एकदां असे जाणें ! । " ह्याप्रमाणें हातावर शीर घेऊन त्याच्या समजुतीप्रमाणें कां होईना, पण मित्रकार्यार्थ लढाईचा झगडा चालवणारा तो वीर होता. प्रत्येक घटकेला—पावलोपावलीं—तेजोभंगानें त्याचीं पावलें शल्य मागें खेंचण्याचा यत्न करीत असूनहि, त्यास दाद न देतां तो अलौकिक वीर भयंकर रणकंदन माजवीत राहून शेवटीं कालमुखांत पडला आहे. त्याचें शौर्य पाहून प्रत्यक्ष कृष्णांनींहि त्यास एकदां शाबासकी दिल्याची व मुक्तकंठानें त्याबद्दल त्याची स्तुति केल्याचीहि एक गोष्ट सांगतात. ती अशी—अर्जुनानें बाण मारून कर्णाचा रथ ४० योजनें मागें हटविला, पण त्यावेळीं श्रीकृष्ण अर्जुनाच्या स्तुतिपर कांहींच बोलले नाहींत. उलट कर्णाच्या तीव्र बाणानें अर्जुनाचा रथ सारा चार हातच मागें हटला तरी श्रीकृष्ण " शाबास कर्णा, शाबास ! " असें म्हणालें. अर्जुनाला याचें मोठें वैषम्य व चमत्कार वाटला. " देवा, हें हो काय ? " अर्जुन विषादानें म्हणाला, " मी एवढें ४० योजनें त्याचा रथ हटवतों पण मला एकही उत्साहदायक शब्द नाहीं. व तो सारा ४ च हात माझा रथ रेटतो तर

त्याच्यावर स्तुतीचा नुसता वर्षाव ! देवा, असेंच करायचें असलें तर मग आपले त्या कर्णाच्या रथावरच कां जाऊन बसाना ! मी आपला लढतच नाहीं जा ! " असें म्हणून फणकाऱ्यानें अर्जुनानें आपलें गांडीव धनुष्य खालीं टाकून दिलें ! " अरारारा ! तुला खराच राग आलासा दिसतो !" देव हंसून म्हणतात, "पण अर्जुना, मीं त्याची स्तुति केली ती उगीच नाहीं. तुझ्या रथावर सर्व जगाचा आधार—परमात्मा बसला आहे. तेव्हां त्या रथाचें ओझें किती अपरंपार असेल याची तूंच कल्पना कर ! आणि तुला हातोहात प्रत्यंतरच पाहायचें असेल तर हें पहा ! " असें म्हणून देव रथाखालीं उतरले, व कर्णास पुन्हां बाण मारण्यास सांगितला. त्या बाणाच्या तडाक्यासरशीं अर्जुनाचा रथ ४०० योजनें मागें नुसता गिरक्या खातच गेला ! व अर्जुन त्यांत बेशुद्ध होऊन पडला ! त्यास सावध करून देव म्हणाले, " पाहिलेंस अर्जुना, कर्णाचा कसा दणका आहे तो ? " या ठिकाणीं कर्ण हा एका दृष्टीनें अर्जुनाहूनही कसा सरस वीर होता, हें परमात्म्यानें सर्व जगास मनमोकळेपणानें पटवून दिलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

पण अशा शूर कर्णानेंहि औदार्याचें-दानव्रत स्वीकारून दुर्योधनाची एक प्रकारें हानीच केली असें होत नाहीं काय? एकतर दुर्योधनास दिलेल्या मैत्रीच्या प्रत्ययादाखल त्यानें "जो जें मागेल तें देण्याच्या व्रताचा स्वीकार करणेंच किती चुकीचें होतें. कारण मैत्रीच्या दृढतेचा व त्या व्रताचा एका दृष्टीनें अर्थाअर्थी कांहीं सुद्धा संबंध नाहीं. किंबहुना, असल्यास विरोधच आहे. कारण जिवांत जीव असेपर्यंत एकीकडे दुर्योधनाची मैत्री करण्याचें वचन, व एकीकडे जो जे मागेल—मग त्यांत प्राणसुद्धां आलेच—तें त्याला देण्याचें व्रत घेऊन तोच जीव जगांतल्या कोणच्याही प्राण्याच्या हवाली करण्याच्या तयारीचा खुळेपणा ! यांचा मेळ कसा घालणार ? अर्थात् त्याच्या ह्या व्रताचा फायदा घेऊन इंद्रानें त्यास ब्राह्मणवेषानें कसा नागवला, हें आपण मागें पाहिलेंच आहे. तेव्हां दुर्योधनास दिलेल्या मैत्रीच्या वचनास हें व्रत किती पुष्टिदायक होतें याचा वाचकांनींच विचार करावा ! व्रत घ्यायचेंच तर तें पुष्टिदायक नसलें तरी अपायकारक तरी नसावें. व असें—म्हणजे एखादा पदार्थ वर्ज्य करण्यासारखें बिन-

अपायकारक दुसरें कोणचेंहि व्रत त्यास घेतां आलें नसतेंच असें नाहीं. कर्णाच्या औदार्यव्रताचा स्वतंत्रपणें विचार करतां, व तें जर जन्मादारभ्यच असतें, तर आम्हींहि त्याची स्तुति करूं व केली असती; व अर्जुनहि एका दृष्टीनें क्षणैक करतों. पण तें व्रत ज्या प्रसंगीं धारण केलें आहे तो प्रसंग त्यास मुळींच जुळता नाहीं, केवळ पुढील गोष्टीच्या सांखळीचा एक दुवा किंवा पूर्वतयारी म्हणून कसेंबसें–तें कर्णाच्या तोंडांत व्यासांनीं कोंवलें आहे, असें आम्हास वाटतें, एवढेंच आमचें म्हणणें. कुंतीला वचन दिल्यामुळें पांडवांपैकीं केवळ अर्जुनास मारण्याची प्रतिज्ञा व वरील व्रत, याप्रमाणें त्याच्या दृढ–मैत्रीव्रताच्या काहींशीं उलटच जातात. आतां बाकीच्या त्याच्या गोष्टींचा विचार करूं. परशुरामापासून फसवून मिळविलेली विद्या त्यास आयत्या वेळीं उपयोगीं पडणार नव्हतीच, कारण तसा परशुरामांचा त्यास शाप होता. गाय मारल्यामुळें ब्राह्मणानें दिलेल्या शापानें पृथ्वी त्याच्या रथाचें चाक आयत्या वेळीं गिळणार होती. कवचकुंडलविरहित होऊन अमरत्वहि गेलें होतेंच. येऊन जाऊन एक परशुरामाचें विजयधनु त्याजजवळ होतें. तें नुसतें घेऊन काय हलवीत बसायचें ! पण भार्गवास्त्र व इतरही सणसणीत बाण त्याजजवळ होते. पण अर्जुनासारख्या वीरास ठार मारणारा असा एकच बाण त्याजजवळ होता, व तो म्हणजे अश्वसेननागाचा. खांडववन–दहनप्रसंगीं निसटलेला हा अश्वसेन नाग अर्जुनाचा गुप्त शत्रू होता. व गुप्त मारेकऱ्याप्रमाणें मागील त्रासाचें उट्टे फेडून घेण्यकरतां तो कर्णाच्या एका बाणांत त्याच्या न कळत जाऊन बसला होता. त्याचप्रमाणें घटोत्कचावर शक्ति टाकली त्यावेळींच रा. लिमये यांचे म्हणण्यांवरून पहातां कर्णार्जुनांची गाठ पडत होती असें सिद्ध होतें. पण " कार्य बहुत्वासाठीं गांठि न पडली तयासवें मागें । " ह्या पंतोक्तीवरून तें खोटें ठरूं पहातें. कदाचित् त्याचा अर्थ " सध्याप्रमाणें " हे शब्द मागें जोडून कसाबसा करून घ्यावा लागेल. पंतांचें म्हणणें एका दृष्टीनें खरें दिसतें. पण उलटपक्षीं परमेश्वरी योगमायेचें सामर्थ्यही खरें नव्हे काय ? कारण "देव तारी त्याला कोण मारी " हेंहि तितकेंच खरें आहे. अस्तु. कांहीं असले तरी हे किरकोळ प्रश्न असल्यामुळें आपण त्यांस येथेंच सोडून देऊं.

वर सांगितल्याप्रमाणें अर्जुनापेक्षां कर्णाची "उपकरणां"च्या दृष्टीनें—कशाहि कारणानें असो, व ती पुष्कळशी स्वकृतदोषानें व खुळेपणानेंच होती—बरीच नडवणूक झालेली असूनहि " सतां सिद्धिः सत्वे भवति " ह्या न्यायानें तशाहि स्थितींत जर त्याशीं " धर्मयुद्धा" नेंच अर्जुन झगडतां व कृष्णमध्यें न पडते, तर तशाहि स्थितींत त्यानें त्यांस पाणी पाजलें असतें, ही गोष्ट निर्विवाद दिसते—अशाही कर्णास अधर्म युद्धानेंच ठार मारला आहे, ह्यावरूनच सिद्ध होतें.

आमचे धर्मराज शूर होते यांत वाद नाहीं. कारण कर्णपर्वाच्या पहिल्याच—कालच्या—म्हणजे युद्धाच्या १६व्या दिवशी त्यांनीं दुर्योधनास भयंकर शक्ती मारून मूर्छित केलें व शेवटीं तो भीमाचा वांटा म्हणून त्यांनीं त्याला सोडून दिलें, हें आपण वर वाचलेंच आहे. त्याचप्रमाणें खुद्द शल्यासहि त्यांनीं पुढें ठार केलें आहे. परंतु कर्णद्रोणांसारख्या कसलेल्या वीरांपुढे मात्र त्यांची मात्रा चालत नसे, किंबहुना ते त्यावेळीं म्याड ठरत. द्रोणांनीं धर्मास कचाट्यांत धरण्याचा कसा दोनतीनदां डाव साधला होता हें आपण मागें वाचलेंच आहे. खुद्द कर्णानेंहि आज त्यांची तीच स्थिति केली. आज दिवसाच्या पहिल्या अर्धांत ज्या लढाया झाल्या त्यांत कर्णानें धर्मास खूपच फजीत करून व घायाळ करून जीवदान देऊन सोडून दिलें! बिचारा धर्म वेदनांनीं विव्हळ होऊन आपल्या शिबिरांत द्रौपदीच्या अंथरुणावर लोळत पडला, व कुशल शस्त्रवैद्य त्याच्या सेवाशुश्रूषेस लागले. पण इकडे भीमदादा कर्णाशीं बाणांनीं, व इतरांशीं गदेनें, खूपच भिडून राहिले होते. संशप्तकांनीं एकीकडे नेहेमींप्रमाणें अर्जुनास घेरला होता. नागास्त्रानें त्यास अर्जुनानें बद्ध केलें, पण सुपर्णास्त्रानें त्यांनीं सुटका करून घेतली. शेवटी ऐंद्रास्त्रानें अर्जुनानें त्यांचा फडशा पाडला, व अश्वत्थाम्याच्या कचाट्यांत सांपडलेल्या धृष्टद्युम्नास सोडवून त्यानें आपला रथ कृष्णाच्या इच्छेप्रमाणें धर्माच्या शिबिरांत नेऊं दिला. कर्णाकडून अवमानित झालेला बिचारा धर्म कसा विव्हळत पडला होता, हें आपण वर पाहिलेंच आहे. तेव्हां त्याला साहजिकच वाटलें कीं, त्या दुष्ट कर्णाला मारून ती विजयाची बातमी सांगण्यास अर्जुन आला आहे; पण अर्जुनाचें उत्तर ऐकून त्या कामीं त्याची निराशा झाली. व त्यास कधीं न येणारा राग येऊन-

" अहारे दिवट्या ! मग ते गांडीव धनुष्य तरी कशाला बाळगलें आहेस? तें कुणाला देऊन तरी टाक!" असें त्या रागाच्या सपाट्यांत किंवा भरांत तें बोलून गेले. अर्जुनाचा पण पडला, " असें म्हणेल—गांडीव देऊन टाक म्हणेल—त्याची गर्दन छाटण्याचा." त्यानें आपली तरवार सपकन् म्यानांतून उपसलीच ! पण " गुरूणामवमानोहि वधमित्यभिधीयते । " असें वचन कृष्णांनीं सांगून धर्मास "अरेतुरे" करून बोलण्यास सांगितलें. अर्जुन तसें बोललाही; पण कधीं नव्हे ती वाचा तोंडून निघाल्याबद्दल त्यास इतकें वाईट वाटलें कीं, त्याच तरवारीनें तो स्वताची गर्दन छाटून घेण्यास तयार झाला. त्यावरही कृष्णांनीं " आत्मस्तुति करणारास आत्महत्येचें पाप " लागण्याचें वचन सांगून त्यांतून त्याची—त्याप्रमाणें करावयास लावून—सुटका केली. इकडे धर्मावर अर्जुनाच्या वाग्बाणांचा इतका परिणाम झाला होता कीं, तो खरोखरच कोठेंतरी काळं करण्यास निघाला. पण कृष्णांनीं त्यास सर्व वस्तुस्थिति समजावून देऊन त्याचें समाधान केलें, व " कर्णाला मारल्याशिवाय मी आज र ांतून परत फिरत नाहीं !" म्हणून धर्माजवळ अर्जुनानें प्रतिज्ञा करून कृष्णार्जुन पुन्हां रथांत बसून निघाले.

कर्णवधाची प्रतिज्ञा करणें सोपें होतें. पण ती अमलांत आणणें तितकेंच कठिण होतें. त्याच्या नुसत्या विचारानेंच अर्जुनाचें मुखमंडल घामानें डबडबून गेलें ! पण कृष्णांनीं त्यास धीराचे व उत्तेजनपर चार शब्द सांगून त्यास पुन्हा स्फूर्ति आणली. पण खुद्द कर्णवधाकडे वळण्यापूर्वीं आपणांस आधीं दुःशासनवध पाहणें आहे.

आजच्या दिवसाच्या पहिल्या अर्धाची लढाई स्थूलमानानें आम्ही वर दिलीच आहे. दुसऱ्या अर्धाच्या लढाईत 'दुःशासनवध' व' कर्णवध' ह्याच दोन गोष्टी मुख्य आहेत. त्यांपैकीं दुःशासनाचा व भीमाचा रथ समोरासमोर आल्याबरोबर त्यांचें मोठ्या आवेशानें युद्ध चाललें, व पहिल्या झपाट्यांतच भीमानें दुःशासनाचें धनुष्य तोडलें, ध्वज मोडला, सारथ्याचें शिर उडविलें, व खुद्द दुःशासनास कपाळांवर बाण मारून मोठी जखम केली. पण धन्य त्या दुःशासनाची कीं, तशाहि स्थितींत स्वतः रथ संभाळून त्यानें दुसरें धनुष्य घेतलें, व एका अमोघ बाणाचा

असा सणसणीत मार भीमास दिला कीं, भीम प्रेतवतच रथांत पडला ! पण लवकरच सावध होऊन भीमानें भयंवर गर्जना केली, व कदाचित् बाणांच्या युद्धांत हा आपणास आटपणार नाहीं व अशा नीचाला पालथा पाडूनच ठार केला पाहिजे, असें वाटून एक भयंकर आरोळी देऊन व गदा घेऊन भीम त्याच्या रथाकडे धांवला ! कमरेस तरवार लटकत होतीच. नऊ हजार हत्तींच्या बळावर लढणाऱ्या भीमाच्या बळा-पुढें जगांतला कोणचा मल्ल टिकला असतां ? बकासुर, किर्मीर, जरासंध, कीचक, इत्यादि धेंडांना त्यानें माती चारलेली आपण मागें वाचलीच आहे. आजचा प्रसंग त्यांतलाच होता ! द्रौपदीच्या सभेंतल्या विटंबनेची फेड आज त्यास करायची होती. ज्या हातानें द्रौपदीच्या पवित्र वस्त्रास स्पर्श केला तो उखडून आज त्याला गिधाडापुढें टाकायचा होता ! दुःशासनानें तिची वेणी धरून तिला भरसभेंत फरफरा ओढीत आण-ल्याचा देखावा त्याच्या नेत्रापुढें अजून त्यास दिसत होता. द्रौपदीची ती केंविलवाणी मुद्रा आठवल्याबरोबर त्याचें रक्त सळसळूं लागलें, मस्त-काच्या शिरा ताठ झाल्या, व हाताच्या मुठी वळल्या गेल्या. नेत्रांतून अंगा-रच बाहेर पडतो आहे कीं काय, असें वाटूं लागले. त्याची मुद्रा इतकी भयंकर दिसत होती कीं, ती पाहून प्रत्यक्ष कृतांतही दचकला असता ! क्रोधानें खवळून गेलेला भीम आज शत्रूस प्रतिकृतांत भासूं लागला. दुःशासनाच्या नरडीचा घोट घेण्यासाठीं तो धांवतच निघाला. वरच्या दातानें खालचा ओंठ काडकन् फोडून भीम स्वतःशींच म्हणाला, "दुष्टा ! आतां कुठें जाशील या भीमाच्या तावडींतून ?" भीमाच्या नुसत्या पळ-ण्याच्या वेगांत वायूच्या सोसाट्यानें कित्येक वीर ( ! ) जमिनीला दंडवत घालूं लागले ! " आयरे दुरात्म्या !" भीम खवळून एखाद्या भुकेलेल्या सिंहाप्रमाणें गर्जत होता, व शत्रूंचीं मस्तकें सपासप गदेनें उडवीत होता. लवकरच तो दुःशासनाच्या रथाजवळ पोंचला, व अनिवार क्रोधाच्या सपाट्यांत एकाच हिसक्यास त्यास रथावरून खालीं ओढून त्यानें त्यास उताणा पाडला, व त्याच्या नरडीवर तो पाय देऊन उभा राहिला! यावेळीं क्रोधानें त्याला मागील अपमानाचें ब्रह्मांड आठवलें ! " आः ! दुष्टा, दुरात्म्या, नरपशो! सांग कोणच्या हातानें त्या पवित्र अबलेची वेणी धर-

लीस, सांग ?" असें म्हणून, नंतर हा भयंकर युद्धचमत्कार पहाण्यासाठीं क्षणैक आपापलें युद्ध थांबवून उभे राहिलेल्या कौरवपांडवांकडील सर्व योध्यांवर आपल्या दृष्टींतील आगीचा लोळ फेंकीत तो सर्वांस आव्हान करून म्हणाला, "आज या दुष्ट दुःशासनाचा कंठनाळ चिरून मी त्यांतलें ऊन ऊन रक्त पिणार ! कोणाची माय व्यायली असेल त्यांनीं पुढें यावें, आणि ह्या भीमाच्या तडाक्यांतून ह्याला सोडवावें ! कौरव-पांडवांपैकीं कोण मायेचा पूत माझ्यापुढें उभा रहातो तें पाहूं दे !" अर्जुनास ते उद्गार ऐकून साहजीकच थोडासा राग आला, व तो आपल्या शौर्याच्या एकप्रकारें होणाऱ्या अपमानाचा सूड घेण्यासहि तयार झाला होता म्हणतात. पण श्रीकृष्णांनींच त्याला सांगितलें कीं, "बाबा, तूंच काय पण प्रत्यक्ष कृतांतासही तो सध्या आटपायचा नाहीं. तेव्हां जिवंत रहायचें असेल तर जास्त शहाणपणा न करतां स्वस्थ बसून रहा !" याप्रमाणें आव्हान ठोकून कोणीच पुढें येत नाहीं असें पाहिल्यावर तो खदखदां हंसला, व "सगळेच कसेरे तुम्ही भ्याड भागुबाई बनलात. बांगड्या तरी भरा त्या हातांत !" असें म्हणून क्रोधकंपित अशी त्यानें एक भयंकर आरोळी दिली, व "दुष्टा ! भोग आतां आपल्या अनन्वित पापाचें फळ !" असें म्हणून तरवारीच्या एका फटकाऱ्यासरसे त्यानें दुःशासनाचा कंठ व वक्षस्थळ फोडलें व त्यांतील उष्ण रक्त घटघटां पिऊन त्याच्या रक्तानें ओंजळ भरून भैरवासारखा भीम अत्यानंदानें नाचतच निघाला ! व धांवत येऊन त्यानें श्रीकृष्णास प्रथम कडकडून भेट दिली! त्या जगन्नायकानींहि उत्साहानें व योग्य स्तुतीनें त्याचें स्वागत केलें ! "शाबास भीमा !" देव म्हणाले, "वीर असावा तर असा !" श्रीकृष्णाच्या ह्या स्तुतीनें जणों मूठभर मांस येऊन अधिकच आनंदानें तो तसाच द्रौपदीकडे धांवला, व "द्रौपदी ! चल, त्या दुष्टाच्या रक्तानें माखलेल्या या माझ्या हातांनीं मला तुझी एकदां वेणी घालूं दे. कारण ज्या नरपशूनें तुला छळलें-दीन गायीसारखा तुझा केशपाश खेंचून तुला फरफरा ओढलें-त्याच्या नरडीचा घोट घेऊन माझी प्रतिज्ञा मीं आज पुरी केली आहे !" असें म्हणून खरोखरच भीमानें आपल्या रक्त-हस्तांनीं तिची वेणी घातली ! भीमानें आपली भयंकर प्रतिज्ञा पुरी

केली ! पंतांनींही प्रस्तुत प्रसंगाचें मोठें सुंदर वर्णन केलें आहे ! तेव्हां तें, व त्यावरील रा. पांगारकरांचीही सुंदर टीका दिल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. पंत म्हणतातः–"ऐसें मनांत आणुनि पांडव टाकी उडी रथावरुनी । दयितेची मूर्तिमती कुरुहननाशा गदा करीं धरुनी ॥ कुरुसेनेसी घाली जेव्हां समरांगणीं गदा फुगडी । तैं काळदृष्टि झडकरि पक्ष्मकपाटें पहावया उघडी ॥ गरुड जसा गगनांतुनि वेग उतरोनि पन्नगा झडपी । तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी ॥ मग कंठनाळ चर चर तो सत्य करावया बिरुद कापी । मिटक्या देऊनि मटपट घटघट त्या स्वाहितासृगुदका पी ॥ रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती । किति पडती, किति दडती, कितीएकांचीं धृतायुधें गळतीं !॥ "म्हणति मनुष्य नव्हे हा राक्षस कीं काळ हा खवळलाहो । " रा. पांगाकर पुढें म्हणतात, "हें भीमाचें शब्दचित्र किती बहारीचें आहे ! द्रौपदीच्या वस्त्रहरणापासून भीमाच्या मनांत जो तडफडाट चालला होता तो या वेळेस दुःशासनरक्ताची अंजलि भरून व मागील त्याच्या सर्व दुष्कृत्यांचा पाढा वाचून भीनानें ओकून काढला. वाचकांच्याही मनाच्या वृत्ति भीमाच्या वृत्तीसारख्याच होऊन जातात. व 'शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख' असा भीम 'प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युतानिकट' तेव्हांच्या त्याच्या उग्र मूर्तीचें ध्यान प्रेमादरास्पद वाटल्यावांचून रहात नाहीं !! दुःशासनाच्या पापाची उत्तम प्रकारें फेड झाली. जशास तसें झालें ह्यांत शंका नाहीं. ह्या घोर कर्मांत दया दिसत नसली तरी न्याय झाला असें वाटतें. "+ येथें हा "दया" शब्द पांगारकरांनीं कोणच्या अर्थानें वापरला आहे कोण जाणे ! पण "दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें॥" ही तुकोक्ति ते विसरले नसतीलच! अस्तु.

यानंतर कर्णपुत्र वृषसेन व नकुल यांची झटापट सुरू झाली. वृषसेन शौर्याच्या बाबतींत आपल्या बापाला साजण्यासारखाच मुलगा होता. त्यानें सपाट्यासरशीं नकुलाचा सारथी व घोडे ठार करून त्याचा रथही मोडला, व हातांत तरवार घेऊन नकुल लढूं लागतांच तीही मोडून

---

+ "मोरोपंत-चरित्र आणि काव्यविवेचन"—पान ३४५ पहा.

उडवून दिली, व त्याच्या हृदयावर बाणानें जखम केली. तेव्हां घाबरा-घुबरा झालेला नकुल भीमाचे रथावर चढला! अशा शूर पोरावर कोणच्या बापाचें प्रेम असणार नाहीं? कर्णाचा तो किती लाडका व प्रिय असेल याची कर्णासारख्या शूरासच कल्पना येईल! पण ह्या लाडक्या मर्मावर घाव घालून—त्यास ठार मारून—अर्जुनानें कर्ण—भुजंगाच्या शेपटीवरच पाय दिला! त्याबरोबर तो फूत्कारून चाल करून आला व दोघांचे रथ एकमेकास भिडून हें अद्वितीय युद्ध सुरू झालें. नव्यानवसानें दोघांच्याही गांठी पडल्या होत्या! दोघांचेहि पांढरे घोडे, कृष्ण—शल्य सारथी, व कर्णार्जुनासारखे वीर, असा तो असामान्य सामना होता. व तो खरोखर धर्मयुद्धानेंच निकलांत निघाला असतां तर काय बहार झाली असती! पण आमचे अर्जुन पडले मोठे दांडगे योद्धे! त्यांचें शौर्य कायतें लुंग्या सुंग्या सैनिकांवर पाहून घ्यावें, पण भीष्म, द्रोण, कर्ण, तर राहोतच, पण भगदत्त व जयद्रथ यासारख्यांना मारायला सुद्धां त्याला कृष्णांची मदत लागली! पण यावर आम्हीं मागें दोनचारदां लिहिलेंच आहे. तेव्हां प्रस्तुत गोष्टीकडे वळून बोलायचें म्हणजे अर्जुनास भगवंतांच्या उपदेशानुसार त्यास अधर्मयुद्धानेंच मारावें लागलें. कारण कर्ण हा वीर सरस होता—भारी होता. पण कितीही सरस वीर झाला तरी तो शेवटीं असत्पक्षीय असल्यामुळें व सत्पक्षाच्या उत्कर्षासाठीं अशाहि वीराचा बळी घेणें भाग पडल्यामुळें भगवंतांनीं तो घेण्याची व्यवस्था केली.

कर्णाचें युद्धकौशल्य असामान्य होतें. "काढी जोडी ओढी सोडी शर कर्ण लाघवास्तव तें। न दिसे; दिसे शरासन—मंडळ, हत शत्रुबळहि त्या भंवतें ॥" भिंगरीसारखें फिरणारें तें 'शरासनमंडळ' किती कौशल्यपूर्ण हस्तांनीं धरलें असेल? असो. लढाई जुंपली. पण त्याच्या आधीं तिकडे अश्वत्थाम्यानीं दुर्योधनाकडे जाऊन अजून तरी धर्मास शरण जाऊन जीव वांचवून आनंदानें रहाण्याचा उपदेश केला. पण कर्णाचा मुडदा अजून पडायचा असल्यामुळें तें त्यास कसचें रुचतें? इकडे लढाई सुरू झाली होतीच, तेव्हां "कौतुक पाहति कौरव—पांडव—पक्षस्थ आणखी अमर।" मुसळधार पावसाप्रमाणें बाणांची आणि शस्त्रास्त्रांची फेंकाफेंक सुरू झाली! त्यांचें आकाशस्थ पिते—इंद्रसूर्य—आपापल्या

पुत्रांचा विजय इच्छूं लागले! कर्णानें नमनालाच अर्जुनास दहा बाण मारून युद्धास सुरवात केली! कारण भुजंगाच्या शेपटीवरच अर्जुनानें पाय दिला होता, असें आम्ही वर म्हटलेंच आहे. पण त्या भुजंगाचे बहुतेक दांत दैवानीं पाडलेले होते. एकच दांत–अत्यंत विषारी दांत–त्याजजवळ होता व त्याच्याच जोरावर तो आज अर्जुनास डंख करण्यास–पुष्कळ दिवसांचा निष्कारण व सकारण डाव धरून–धांवला होता. ह्याच दांताचें- अश्वसेन नागानें भरलेल्या बाणाचें–वर्णन त्यानें शल्याजवळ, “ पार्थवधाचें साधन आहे तें सांगतों ” म्हणून केलेलें आहे. अस्त्रांच्या फेंकाफेंकीची झटापट कांहीं वेळ झाल्यावर हाच ‘ अहिमय ’ व अमोघ ‘ सायक ’–बाण हातांत घेऊन तो–अर्जुनासाठीं किती दिवस राखून ठेवलेली ती मृत्यूची करालदाढा–त्यानें “ हतोसिवैफाल्गुन ” ( अर्जुना, मेलासरे मेलास! ) म्हणून त्याच्यावर मोठ्या त्वेषानें सोडली. केवढा भयंकर प्रसंग ! मृत्यूचेंच संकट तें ! त्याला वारणारा अर्जुनाजवळ एकहि बाण नव्हता. पण त्याचा कुशल व सर्वज्ञ सारथी त्याच्या रथावर होता तोंवर त्याला प्रत्यक्ष मृत्युपासून सुद्धां भय नव्हतें. कृष्णांनीं ताबडतोब रथ एक वीत खालीं दाबला व घोड्यांचेहि पाय टेकले. त्याबरोबर तो बाण अर्जुनाच्या कंठावर किंवा वक्षावर न लागतां त्याचा देदीप्यमान किरीट मात्र उडाला! पण ‘ शीर सलामत तो पगडी पचास ’ ‘ जीवावरचें शेपटीवरच गेलें!’ असा विचार करून डोकीस पांढरा फेटा बांधून अर्जुन पुन्हा लढूं लागला. अश्वसेनाचें अर्जुनाशीं पुरें हाडवैर असल्यामुळें तो नाग पुन्हा कर्णाकडे गेला; पण असा ‘ परभृत ’पणा शौर्याचे कामीं स्वीकारण्याचें कर्णानें नाकारल्यावर तो नाग मग आपण होऊन स्वतंत्रच अर्जुनावर चालून आला; पण अर्जुनानें क्षणार्धांत बाणानें त्याचे तुकडे केले! हा समरप्रसंग पाहण्यास मलमपट्ट्या वगैरे लावून आमचे धर्मराजही रथांत बसून आले होते ! असो.

वरील शेवटचाही दांत पडल्यावर त्या दंतभग्न सर्पास कृष्णार्जुनांनीं कसा ठेंचला व मारला, एवढेंच आतां पाहणें आहे. आज बापड्याचा मृत्यु अर्जुनाच्या हातून होता म्हणून त्यास अर्जुनावांचून कांहीं सुचतच नव्हत.

शल्याजवळच्या सगळ्या बडबडींत हेंच जास्त! रावण, कंस इत्यादिकांचेही मृत्युप्रसंगादिन आले तेव्हां असेंच झालें म्हणतात. तें असो. पण शेवटीं ह्या अलौकिक धनुर्धारी वीराचा अंतकाळ जवळ आला तेव्हां काय झालें तें आपण पंतमुखानेंच ऐकूं.–" तों आला वधसमय द्विज शापहि भू-मुखेंचि तो डावें। गिळवी रथचक्र, म्हणे रामास्त्रा प्रेमतूंहि सोडावें॥" याप्रमाणें दोन्हीकडून दगा झाला! ऐन विपत्तींत सोडून जाणाऱ्या मित्राप्रमाणें त्याची स्थिति झाली. पंत म्हणतात,–"चक्र क्षितिनें गिळितां न स्मरतां भार्गवास्त्र रवि जाला। स्वर्शे विषाद, म्हणती बळ तेजोनाश हेतु कवि ज्याला॥" त्यानंतर "तो वृष भूमिग्रस्त स्यंदनचक्रासि उद्धरायातें। उतरे स्वरथावालें करुनि असें अतुल युद्ध राया तें॥ उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांनीं धरूनि चक्रातें। परि पृथ्वी सोडीना, जाणों व्रत घेतलेंचि नक्राचें॥" कर्णाच्या भुजदंडांचें सामर्थ्य तर पहाः–" सप्तद्वीपा पृथ्वी वृष उचली चार अंगुळें वरती!। बडिशासि जशी मत्स्यी नुगळी चक्रासि कांपली परि ती" ऐनवेळीं पृथ्वीनें असा दगा दिला व कांहीं केलें-रक्ताचें पाणी करून तिच्यासकट रथचक्र चार बोटें वर उचललें-तरी सुद्धां ती चाक सोडीत नाहीं, हें पाहून कर्णास किती वाईट वाटलें असेल याची कल्पना, ऐनवेळीं ढाल तुटून कमरेचा शेला हातास गुंडाळून झगडावें लागणाऱ्या तानाजीसारख्या वीरासच करता येईल! कवि सहृदय असतात! त्यांना मानवी हृदयाशीं एकजीव होऊन ते ते भाव वाचता येतात, व सहानुभूतिपूर्वक प्रगटहि करितां येतात. पंत सहृदयत्वानें म्हणतात–"त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रांसि वृष म्हणे हाय!। काय करील न साहे ते बहु मर्मींहि साहिले घाय॥" ही आर्या किती हृदयस्पर्शी आहे! कर्णाचा असत्पक्षीयपणा याठिकाणीं खरोखर क्षणैक विसरला जातो, व रथउद्धरणाचे कामीं गुंतलेल्या कर्णावर–खिंडींत एकटा–असहाय गांठून एखाद्या गरिबावर हल्ला करणाऱ्या दरोडेखोराप्रमाणें–कर्णावर–आपल्या बरोबरीनें झगडून सगळ्या पृथ्वीस चार अंगुळें वर खेचणाऱ्या वीरावर–एकाद्या भ्याड भागुबाईप्रमाणें बाणांची वृष्टि करून त्याच्या देहाला क्षतें पाडणाऱ्या अर्जुनाचा व त्यास त्या कामीं उत्तेजन देणाऱ्या भगवंतांचाहि क्षणैक राग येतो! पण दुसऱ्याच क्षणीं कृष्णांचें हें करणें मनास पटतें.

प्रत्यक्ष 'क्षमे'नें देखील क्षमा न करून ज्याचें चाक गिळण्यास प्रारंभ केला त्यानें किती अधर्म आचरला असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. या अधर्माचा कर्णाला विसर पडला होता, पण भगवंतांनीं त्याला त्याची योग्य आठवण दिली. पृथ्वीच्या पोटांत गडप होणारें चाक कर्ण वर उचलीत आहे अशी संधी पाहून कृष्णांनीं अर्जुनास त्यावर बाण मारण्यास सांगितलें तेव्हां, "निःशस्त्र व पादचारी वीरावर सशस्त्र व रथारूढ योद्ध्यानें बाण मारणें हा अधर्म आहे" "साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुध व्यथाकुल जा (ज्या)।" व "रक्षावा धर्म बुधें कुशळाचा धर्म हा निधी राहे।" इत्यादि कर्ण वेदांताच्या, धर्माच्या, व साधुत्वाच्या लंब्या लंब्या गप्पा मारूं लागला! पण आजपर्यंत त्याला कधीं धर्म व साधुत्व आठवलें होतें ? सैतानानें बायबलांतल्या वचनाचा आधार द्यावा त्याप्रमाणें ही कृति होती! कृष्णपरमात्मा साहजीकच त्यानें खवळून गेले. "बदमाष !" भगवान् संतापून म्हणतात, "तुला आतां धर्माच्या गोष्टी सुचतात काय ? मागील पापांचा तुला विसर पडला वाटतें ? पांचाळीचा देह उघडा करण्यासाठीं त्या नरपशूनें जेव्हां तिच्या वस्त्रास हात घातला तेव्हां, कर्णा, तुझा धर्म कुठे शेण खायला गेला होता ? कपटाच्या फांशांवर पांडवांना भिकेला लावणाऱ्या तुम्हांला धर्माच्या गप्पा कशास पाहिजेत ? कोंवळ्या अभिमन्यूनें तुम्हांला कित्येक घटका पाणी पाजून तो धरणीवर मूर्छित होऊन पडला असतां त्याच्या डोक्यांत गदा घालून त्यास ठार करण्यास तुम्हां दुष्टांचा हात शिवशिवला, तेव्हां तुम्हाला धर्माची आठवण झाली होती काय ? आणि धर्मच म्हणशील तर मूर्तिमान 'धर्म'च आम्ही रक्षण करीत असतां आम्हाला दुसऱ्या धर्माची भिजास काय ? पण तुम्हाशीं असल्या गोष्टीहि शहाण्यानें बोलूं नयेत. कारण तुम्ही माणसें कशाचीं ? तुम्ही मानवी राक्षस किंवा नरपशू आहांत नरपशू! समजलेत ? तुमच्यासारख्या काळसर्पांना असेंच ठेंचले पाहिजेत! हं, अर्जुना पाहतोस काय ? लगाव दणका !" पण कर्णहि असामान्य वीर होता हें आपणांस ठाऊकच आहे. कर्णानें तशीच स्वरथावर झेंप घेऊन एक सणसणीत बाण हातांत घेतला. व तो "शर सोडिला रविसुतें" त्याबरोबर—" त्या खरशरप्रहारें विव्हळ झाला महेंद्रसुत राया। जरि होता

निकट कुशल मंत्री प्रभु बाण—सर्प उतराया ॥" नंतर कर्ण पुन्हां रथांवरून खालीं उतरून चाक वर उचलूं लागला. कारण त्या दुष्टेचें—पृथ्वीचें—चाक गिळण्याचें काम एकीकडे चालूच होतें ! ज्या पृथ्वीवर कर्णाचा रथ उभा ती पृथ्वीमुद्धां अशा रीतीनें पांडवांस फितूर झाली ! पण धन्य एकप्रकारें त्या कर्णाची कीं, पंचमहाभूतेंहि विरुद्ध गेलीं तरी तो वीर हटला नाहीं. पण त्याचें वीर्य व मैत्रीचें दार्ढ्य हें असत्पक्षीय होतें तेव्हां क्षमाशील पृथ्वीनें किंवा पृथ्वीच्या क्षमेनीं-म्हणजेच खुद्द 'क्षमे'नेंहि-त्याचा त्याग करावा-त्यास क्षमा करण्यास तयार नसावें हें योग्यच आहे. पंत म्हणतात "ऐसा निजभुजविक्रम दावुनि सर्वां भटांस शुद्ध रणीं। उत्तरे वृष दावाया भूग्रस्त-रथांघ्रिच्याहि उद्धरणीं ॥ बहुयत्न करी प्रार्थी परि धरिलें सोडिनाचि चाक रसा। द्विजशाप मान्य पतिसा, गुरु कर्ण न मान्य तीस चाकरसा ॥" झालें; याप्रमाणें सर्व यत्न विफल होऊन कर्ण रथचक्रतळाशीं धडपड करीत बसला आहे, तोंच अखेरची घटका भरली ! अर्जुनानें कर्णहननार्थ एक सणसणीत बाण आपल्या गांडीवधनूस जोडला "केतु छेदुनि पार्थ द्युमणि—सुताचे हरावया प्राण। जोडी गांडीवगुणीं शत्रुहरहरायुधा असा बाण॥" त्यावर सर्व सत्कृतींचें व सदाचाराचें पुण्य घातलें, व त्याचें स्मरण करून तो बाण सोडला. पंत म्हणतात—"योजुनि महास्त्रमंत्रितशर विजय म्हणे जरि स्वगुरु सर्व। तोषविले असतील, ज्ञानबळाचा नसेल तिळ गर्व ॥ विधिनें जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा। तरि या शरें वृष मरो हरिचीच पुरो, पुरो न तपनाशा ॥" याप्रमाणें योजलेला बाण अर्जुनानें 'आकर्ण' ओढला—'कर्णांता'पर्यंत ओढला व त्यानें अर्थातच 'कर्णांत' झाला ! "अरिवरि सायक—नायक जाय कराया क्षय त्वरित" व त्यानें "कुरुबळ—विजय प्रासादाचा" "रविप्रभ कळस!" आज तुटून पडला ! अर्जुनाच्या सूं सूं करीत निघालेल्या बाणानें क्षणार्धांत कर्णाचें मस्तक उडालें ! व त्याचा आत्मा अनताकाशांत विलीन झाला—त्याच्यांतील सूर्याची दिव्य प्रभा रविमंडळाशीं मिळून गेली—समरस झाली ! पितापुत्रांची भेट झाली ! पृथ्वीवरील एक अलौकिक धनुर्धर वीर नाहींसा झाला ! या असामान्य मोहऱ्याच्या हरपण्यानें खुद्द भगवंतांसहि क्षणभर वाईट वाटलें असेल ! असो.

# भाग ८ वा.



कर्णवधाच्या नंतर आपण जवळ जवळ भारतीय-युद्धाच्या शेवटापर्यंतच येऊन पोंचलों असें म्हणावयास हरकत नाहीं. कर्ण पडल्यावर कौरवसैन्य दशदिशां पळूं लागलें. दुर्योधनानें कसेबसे २५००० लोक जमवून युद्ध चालविलें पण भीमार्जुनांनीं क्षणार्धांत त्यांचा नाश केला. सूर्यहि अस्तास जाण्याचा सुमार झाला! शेवटीं कौरवपक्षांकडे शकुनि व त्याचे १०००० गांधार स्वार, कृप व त्यांचें हत्तींचें सैन्य, सुशर्मा व त्याचे कांहीं संशप्तक, शल्य व त्याचे अनुयायी, अश्वत्थामा, व खुद्द दुर्योधन, इतकी मंडळी शिल्लक राहिली. तीं सायंकाळीं शिबिराकडे परतलीं. लढाईला सतरा दिवस पुरे झाले! उद्यांचा १८ वा दिवस हा शेवटचाच होय. पण अजून तरी दुर्योधन ऐकतो काय हें पाहावें म्हणून कृपाचार्य त्याजकडे गेले. यावेळीं मात्र दुर्योधनानें दिलेल्या उत्तरांतील कांहीं भाग हृदयस्पर्शी आहे! तो आम्ही वाचकांस सादर करतों. "भीष्म, द्रोण, कर्ण, दुःशासन, जयद्रथ, इत्यादि वीरांनीं माझेसाठीं प्राण अर्पून मजवर उपकार केले तें ऋण मला फेडलें पाहिजे. मला आतां राज्य घेऊन काय करायचें आहे? आपले स्नेही, भाऊ, गुरु, पुत्र, पितामह, या सर्वांच्या संहारास मी कारण झालों. मी आतां जिवंत राहून राज्यसुख भोगूं? मला आतां प्राणांची किंवा राज्याचीहि पर्वा नाहीं! रणांत लढत लढत मृत्यु यावा एवढीच आतां मला इच्छा राहिली आहे!"

अश्वत्थाम्यादि वरिष्ठ योद्धयांच्या संमतीनें मद्रदेशचा राजा शल्य हा दुसऱ्या म्हणजे अठराव्या दिवशीं सेनापति झाला व अगदीं शेवटपर्यंत झगडा चालवण्याच्या दुर्योधनाच्या संकल्पास त्यानें हातभार लावला! युद्धाचा शेवटचा दिवस उगवला! शल्यानें व्यवस्थित सैन्यरचना केली व

तो प्रबल वीर झुंजण्यास तयार झाला. वास्तविक आतां त्या समरांगणांवरील मोठमोठे हिरे हरपल्यामुळें तें उजाडच झालें होतें. पण मरतां मरतांही प्राणज्योत जशी प्रज्वलित होते किंवा मालवणारा दीप जसा शेवटीं मोठा होऊन मालवतो, त्याप्रमाणें ह्या रणयज्ञाची ही शेवटची प्रभा—रणदीपाची—रणदिव्याची—ही शेवटची ज्योत आज शेवटली झगझगली—मोठी झाली—व मालवली ! सात्यकी, नकुल, सहदेव, भीमसेन व खुद्द धर्मराज असे पांच योद्धे एकट्या शल्याशीं झटापट करीत असतां तो कसलेला वीर त्या पांचांसही पुरून उरला ! काडीच्या आधारावरहि आपण जगूं असें बुडणाऱ्या मानवास वाटतें त्याप्रमाणें सर्वांस थक्क करून सोडणाऱ्या शल्याच्या ह्या पराक्रमानें, स्वर्गाकडे चाललेल्या दुर्योधनाच्या आशेचें मुख पुन्हां पृथ्वीकडे वळलें! पण असें कुठवर चालणार ? धर्मानें पुन्हा व्यवस्थित मांडणी केली. वीर जास्त भिडून उभे केले, व पुन्हां निकराचा हल्ला चढवून धर्मानें शल्याचा सारथी व घोडे ठार करून ध्वज मोडून पाडला ! पण अश्वत्थाम्यानें त्यास बचावून दूर नेलें. पुन्हा दुसरा रथ घेऊन शल्य आला व त्यानें तोडीस तोड करुन धर्माचाहि रथ कुंठीत केला ! पण विजयावेशानें लढणाऱ्या पांडवांपुढें त्याचें काय चालणार ? भीमानें त्याचें चिलखत फोडून त्यास विरथ केलें. तेव्हां ढाल तलवार घेऊन शल्य धर्माचे रथावर चालून आला. पण एका अमोघ शक्तीनें धर्मानें त्यास ठारच केला ! त्याचे सातशे योद्धे त्याच्या पाठोपाठ गारद झाले!

यानंतर लढाईची सूत्रें जणों शकुनि मामानें आपल्या हातांत घेतली. व त्यानें आपल्या दहा हजार गांधार स्वारांसह धर्माच्या पिछाडीवर हल्ला केला. पण रणभूमि म्हणजे कपटद्यूतगृह नव्हे, याची त्यांना आठवण नव्हतीसे दिसतें! त्यांच्यावर धर्मांनीं धाडलेल्या सहदेवानें त्यांचे चार हजार स्वार यमसदनीं पाठविले. नंतर आमचे फासेबहाद्दर फासेपारधी मामा आपल्या द्यूतांतल्याच चिकाटीनें राहिलेल्या सहा हजार गांधार स्वारांसह धृष्टद्युम्नाच्या पिछाडीवर घसरले. पण तिथेंहि त्यांना हग्या मार बसून त्यांच्याजवळ सारे ७०० लोक शिल्लक राहिले ! सुशर्म्याच्या संशप्तकांशीं झगडणाऱ्या अर्जुनानें धर्माच्या आसपास उडालेली ही शकुनीच्या

द्यूताची धूळ पाहून सुशर्म्यास सपाट्यासरशीं ठार केलें व तोही झपाट्यानें तेथें येऊन पोंचला. इतक्यांत शकुनीचा काळ–खुद्द सहदेव–याचा व शकुनीचा रथ पुन्हा एकमेकास भिडले. व सर्व भावी अनर्थांचें मूळ असा हा कांटा–हा 'राजमंदिरीं शिरलेला कवडा'–हातांत भाला घेऊन सहदेवावर चालून येत असतां त्यास सहदेवानें तेव्हांच उपटून टाकला ! राहिलेलें सैन्य थोडेसें लढलें; पण लवकरच जिकडे तिकडे पळापळ सुरू झाली ! वरील लढाईच्या भाऊगर्दींत खुद्द दुर्योधन–भाऊसाहेब पेशव्या-प्रमाणें–घोड्यावर बसून दिसेनासा झाला होता. पण तो गांधार सैन्या-मागें लपून होता. वरील पळापळींत जिवंत राहिले असे अश्वत्थामा, कृत-वर्मा, कृपाचार्य आणि संजय. संजय पांडवांच्या हातीं लागला होता पण त्यांनीं त्यास जीवदान दिलें. बाकीचे तिघे वीर आधींच जीव घेऊन –मल्हारराव होळकराप्रमाणें–त्या पानिपतच्या रणभूमीवरून पळाले होते. बिचारा दुर्योधन याप्रमाणें एकटा सांपडला. त्याचा घोडाहि त्या गर्दींत ठार होऊन हा भारतेश्वर पादचारी झाला ! त्यास विदुराच्या उपदेशाचे शब्द आठवले ! पण आतां त्याचा काय उपयोग होता ? थकल्या भाग-लेल्या त्या बापड्यास विश्रांतीसाठीं घटकाभर कोठें बसण्याचीहि सोय नव्हती. कारण विजयनिनादानें पांडव–सैन्य निर्मनुष्य झालेल्या त्या रणभूमीवर हिंडत होतें. खांद्यावर गदा टाकून दुर्योधनानें पूर्व दिशेस धूम ठोकली ! एक मैलावर त्यास एक तळें दिसलें. 'आपण जिवंत असून तळ्यांत विश्रांति घेत आहोंत' असा निरोप तेथेंच भेटलेल्या संजयाहातीं धृत-राष्ट्रास सांगून तो पाण्याच्या तळाशीं गेला, व मायेनें पाण्याचें स्तंभन करून आंत स्वस्थ विश्रांति घेत पडला !

संजयाकडून अश्वत्थामादिकांस ही बातमी लागतांच ते तिथें आले. व पुढें काय करावें याबद्दल त्यांचें बोलणें सुरू झालें. पण इतक्यांत त्याच तळ्यावर पाणी पिण्यास म्हणून आलेल्या व हें भाषण ऐकणाऱ्या भीमाच्या पारध्यांनीं तें, दुर्योधन शेवटीं हातचा निसटला ह्या थोड्याशा खेदानें आपल्या शिबिरांत परतलेल्या, पांडवांस जाऊन सांगितलें. तेव्हां आनंदानें जयघोष करीत सर्व पांडव तिकडेच निघाले. त्यांचा तो जयघोष व ध्वनि ऐकून अश्वत्थामा वगैरे मंडळी निघून गेली, व दुर्योधन तसाच तळ्यांत

धुन्हां दडून राहिला. पांडव येऊन पाहतात तों मायेनें पाण्याचें स्तंभन करून भारत-सम्राट आंत लपून बसला आहे ! धर्मानें त्यास आपल्या भाषणानें बाहेर यावयास लावले. " अरे, तूं एवढा शूर आणि पाण्यांत दडून बसतोस ? वीरासारखा बाहेर पडून आम्हांपैकीं कोणासही ठार मार, तरी सुद्धां आम्ही तुझें वर्चस्व कबूल करूं ! " धर्माची पुन्हा जुवेबाजीच सुरूं झाली म्हणावयाची!+ कारण बाहेर आलेल्या दुर्योधनास गदा-युद्धांत जिंकील असा कोणीहि नव्हता. " कुंतीच्या पोरांच्या नशिबीं वनवासच कायमचा लिहिलेला दिसतो ! " कृष्णप्रभु निराशेनें म्हणाले. व जरी आमचे भीमदादा गदा घेऊन त्याच्याबरोबर लढण्यास सज्ज झाले तरी धर्मयुद्धानें त्यास ठार मारणें अशक्य, ही गोष्ट श्रीकृष्णास पुरी ठाऊक होती. कारण भीमदादांची शक्ति जास्त असली तरी दुर्योधनाचें 'प्रॅक्टिस' जास्त असल्यामुळें त्याचें कौशल्य अधिक होतें; तथापि आमचे भीमदादा गदायुद्ध खेळण्यास तयार तर झालेच. इतक्यांत त्यांना त्या कामीं शिक्षण देणारे व कोणताच पक्ष न घेतां तीर्थयात्रेस गेलेले बळरामदादा तेथें आले. त्यास आदरसत्कारानें बसविल्यावर त्यांच्या 'अंपायरशिप्'खालीं-त्या तळ्याचे काठीं हा झगडा-शेवटचा झगडा-भारतसम्राटपदाचा निकाल लावणारें युद्ध सुरू झालें. धर्मयुद्धानें दुर्योधन आटपणें शक्य नव्हतें हें आम्हीं वर सांगितलेंच आहे, व हीच गोष्ट कृष्णांनीं अर्जुनास सांगून भीमाच्या भर दरबारांत केलेल्या प्रतिज्ञेची त्यास आठवण दिली. त्याबरो-बर डाव्या मांडीवर थाप मारून अर्जुनानें दुर्योधनाच्या गदेचे रट्टे खाणाऱ्या भीमास इशारत दिली. त्यानेंहि संधी साधून-कमरेच्या खालीं प्रहार करायचा नाहीं हा गदायुद्धाचा नियम मोडून-प्रतिपक्ष्याचे वार चुक-

---

+ ह्या जुवेबाजाचे मागाल घोर परिणाम वाचक विसरले नसतीलच. धर्माचे ठिकाणीं खरोखरच हा भयंकर दुर्गुण गुप्तपणें वास करीत होता- "There was hidden deep in him the evil vice of dice" असे किंवा अशा अर्थाचे उद्गार मिसेस ॲनिबेझंटनींही आपल्या "The Great War" नामक पुस्तकांत त्याप्रसंगीं काढलें आहेत.

—ग्रंथकर्ता—

चण्यासाठीं वर उड्या मारणाऱ्या दुर्योधनाच्या मांडीवर एक सणसणीत गदाप्रहार केला, त्याबरोबर दुःखानें ओरडतच तो दुरात्मा भूमीवर पडला! भीमाचा क्रोध अनावर झाला! त्या पवित्र द्रौपदीस आपली डावी मांडी उघडी करून दाखवून त्यावर थाप मारणाऱ्या व आपल्या पाजीपणाचें प्रदर्शन करणाऱ्या त्या नरपशूच्या मस्तकावर त्यानें एक सणसणीत लत्ताप्रहार केला! व लाथेच्या एका ठोकरीनें त्याचा मुकुट दूर उडवून देऊन धूळ खात पडलेल्या त्या दुष्टास तो म्हणतो, "दुष्टा! द्रौपदी तुझ्या मांडीवर बसायला पाहिजे होती नाहीं कां? भोग आतां आपल्या पापाचीं फळें!" असें म्हणून त्यास पुन्हां लाथ मारून तो परत आला. धर्मास—फाजील दयाळू धर्मास—त्याबद्दल वाईट वाटून ते त्याचें शांतवन करण्यास दुर्योधनाजवळ गेले. व "सुयोधना! रणभूमीवर पडून तूं मात्र स्वर्गसुख भोगणार पण आम्हांस मात्र धृतराष्ट्राच्या सुनांचे आणि नातसुनांचे विलाप ऐकत राहावें लागणार!" ह्याप्रमाणें त्यांनीं त्याचें खरेंच सहृदय समाधान केलें! इकडे हें अधर्मयुद्ध पाहून बळरामदादा—हे किती शीघ्रकोपी होते हें आपण मागें पाहिलेंच आहे—संतापले व त्यांनीं आपलें 'लांगल' सरसावलें! कृष्णांनीं त्यांचें समाधान करण्याचा यत्न केला. पण त्यांचें समाधान न होतां ते तसेंच तावातावांनीं द्वारकेस निघून गेले! धर्मांनींही भीमास राग अनावर झाल्यामुळें त्याच्या हातून हा प्रमाद घडला म्हणून त्यास क्षमा केली. हा सगळा 'सिद्धसाधकपणा' झाल्यावर सर्व मंडळी शिबिराकडे परतली. याप्रमाणें अगदीं शेवटीं सुद्धां—लढाईच्या शेवटच्या प्रसंगींहि अधर्मयुद्धाचा व कपटाचा आश्रय केल्यावांचून पांडवांस गत्यंतरच नव्हतें. कारण आपल्या बेटांतून बाहेर पडलेल्या नेपोलियनानें आपल्या 'शेवटच्या १०० दिवसांत' जशी धुमश्चक्री उडवून दिली व जयाचें पारडें उलटवलें, तीच स्थिति दुर्योधनही धर्मयुद्धानें करण्यास पूर्ण समर्थ होता. कारण त्याच्या अंगीं तसेंच अलोट व अचाट कौशल्य होतें. पण कृष्णांनीं त्यास म्हटल्याप्रमाणें व वेळोवेळीं सांगितल्याप्रमाणें, 'मायेशीं माया, कपटाशी कपट' हाच कृष्णाचा व त्याच्या भक्तांचा धर्म होता!

। दुर्योधन याप्रमाणें धूळ खात पडल्याची बातमी अश्वत्थामादि त्रयीस ।..त्याबरोबर ते तिथें आले. अधर्मयुद्धानेंच शेवटीं दुर्योधनाचाही बळी

घेतलेला पाहून अश्वत्थाम्याचा शोक पार दूर झाला, व सूडाच्या भावनेनें संचारून तो म्हणतो—" राजा, ह्या कृत्याचा मी पक्का सूड घेऊन आजच्या आज सर्व पांडव त्यांच्या उरलेल्या सैन्यासह ठार करतों! तूं कांहीं काळजी करूं नको!" दुर्योधनास तें ऐकून व त्याची ही आपल्या ठिकाणची अलोट स्वामिभक्ति पाहून त्यास सानंद गहिंवर आला, व कृपाचार्यांकडून जवळच्या तळ्यांतलें पाणी आणवून ' आपला शेवटचा सेनापति ' म्हणून दुर्योधनानें अश्वत्थाम्यास अभिषेक केला! मोठ्या कष्टानें दुर्योधनास–त्या भारतसम्राटास—तेथेंच विवळत टाकून तिघांनींहि त्याचा निरोप घेतला.व ते एका विस्तीर्ण वटवृक्षांखालीं रात्रीचा विसांवा घेण्यासाठीं जाऊन राहिले. युद्ध करून थकलेभागलेलें कृपाचार्य व कृतवर्मा हे लवकरच निद्राधीन झाले! पण पांडवांचा सूड कसा घ्यावा ह्या विचारानें अश्वत्थाम्यास मुळींच झोंप येईना! मध्यरात्रीचा सुमार झाला होता! जिकडे तिकडे शांत निस्तब्ध होतें. लढाईचा शेवट गोड झाला ह्या आनंदांत लढाईच्या थकव्यानें दमलेलें पांडववीर निद्रासुखांत मग्न झाले होते! श्रमपरिहारिणी व दुःखविस्मरणकारिणी निद्रेचा अंमल सर्व जगावर बसला होता! परंतु याचवेळीं त्या तळ्याचे कांठीं दुरात्मा दुर्योधन आपल्या वेदनांनीं, व अश्वत्थ वृक्षाखालीं त्याचा एकनिष्ठसेवक अश्वत्थामा चिंतेनें, व्याकुळ होऊन पडला होता.सर्व जगावर शांतीचें साम्राज्य पसरलें होतें तरी अश्वत्थाम्याच्या चित्तास शांति नव्हती! रात्रीचा गर्द काळोख सगळीकडे भरून राहिला होता.अ काश प्रांगणांत नक्षत्रांची रांगोळी सृष्टिसुंदरीनें घातली होती; पण हंड्यांतल्या ग्लासांतील दीपाप्रमाणेंच त्या तारकासमूहांचाहि प्रकाश मंदप्रभच होता! अश्वत्थाम्याच्या अंगाचा रागानें व सूडाच्या अमर्याद इच्छेनें नुसता आगडोंब झाला होता! " सूड, सूड!" ह्यावांचून त्यास दुसरें कांहीं सुचत नव्हतें. " हाय! बाबा! तुम्हास कपटानें मारणाऱ्या त्या दुष्टांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून तुमच्या स्वर्गस्थ आत्म्यास शांति देईन तरच तुमचा बच्चा!" अश्वत्थामा स्वतःशींच पुटपुटला. त्याची प्रतिज्ञा म्हणजे प्रति भीष्मप्रतिज्ञाच होती! शत्रूला कृतांताप्रमाणें भासणारा तो कर्दनकाळ वीर लुंगासुंगा नव्हता. द्रुपदाचा पुरा सूड उगविणाऱ्या द्रोणांचा तो पुत्र होता. तेव्हां

…णाचार्यांचें दृढप्रतिज्ञत्व त्याच्याहि ठायीं उतरलें असल्यास नवल नाहीं. व त्यानें केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें बहुतेक घाट अचानकपणें जुळवूनहि आणला. तो असा कीं, वरील विचारांत तो तळमळत पडला असतां अकस्मात् एक घुबड तेथें येऊन त्या झाडावरील सर्व कावळे हळूंच पाय न वाजविता पटापट मारून टाकून त्यास त्यानें जणों गुरूपदेशच दिला. कारण त्याबरोबर तो पहा, अश्वत्थामा ताडकन् उठून बसला! व त्यानें त्या निद्रिस्त दोघांस-कृतवर्मा व कृपाचार्यांस—जागे करून आपला विचार सांगितला. "असें करणें पाप आहे!" असें कृपाचार्य म्हणतात तोंच रागानें व सूडानें उसळून जाऊन अश्वत्थामा म्हणतो, "पाप ? आणि पांडवांनीं काय पाप करावयाचें बाकी ठेवलें आहे ? आचार्य, आपण भारतीय युद्धाच्या गेल्या अठरा दिवसांवरून एकदां नजर फिरवा, आणि कोणचा प्रबल योद्धा त्यांनीं धर्मयुद्धानें मारला तें मला सांगा पाहूं ? तें कांहीं नाहीं. अशा अधार्मिक पांडव पांचाळांना मी आज छापा घालून ठार करणार—सफा कापून काढणार! पापाशीं पाप करण्यास काय हरकत आहे ? हा मी निघालों पहा ! " असें म्हणून आपला रथ तयार करून तो निघालाच ! त्या दोघांसही समदुःखी म्हणून त्याचेबरोबर जाणें भागच होतें. निशाचराप्रमाणें सूडवृत्तीनें पिशाचासारखा अश्वत्थामा झपाट्यानें निघाला ! रात्रीचा काळोख त्याच्या मदतीस धांवून आला. अकस्मात् त्यानें त्याच झेपेंत त्याच वेळीं पांडवसैन्याच्या छावणीवर छापा घातला, व शिबिराच्या द्वारावर कृप—कृतवर्म्यांस ठेवून, नाकेबंदी करून, त्यानें जी विलक्षण लांडगेतोड सुरूं केली, त्याचें वर्णन करणेंहि कठिण आहे. सर्व पांडव—सैन्यच्यासैन्य त्या कृतांत—काळ द्रोणपुत्रानें गारद केलें ! एक सैनिकही बाकी ठेवला नाहीं ! त्याच्या हातून कोणी निसटलाच तर तो कृपकृतवर्म्यांच्या तरवारीस बळी पडे ! कोण तो भयंकर प्रसंग ! सूडवृत्तीचें केवढें हें दारुण चित्र ! याप्रमाणें धृष्टद्युम्न, शिखंडी, युधामन्यु, उत्तमौजा, व द्रौपदीचे पांची पुत्र, इत्यादि सर्व मंडळी त्या कृतांतानें लाथाबुक्यांनीं व तरवारीनें ठार केलीं ! तेव्हां कोठें त्याच्या चित्ताची थोडीशी शांति होऊन हें आनंदाचें वर्तमान सांगण्यास तो दुर्योधनाकडे गेला. कंठाशीं प्राण आलेल्या दुर्योधनास तें ऐकून त्यांतल्या—

त्यांत हर्ष झाला, व " आजपर्यंत कोणींही गाजविला नाहीं असा पराक्रम गाजवून तुम्हीं मला मरणसमयीं आनंद दिला; तुमचें कल्याण असो ! आतां तुमची आमची स्वर्गांत भेट !" असें म्हणून त्यानें प्राण सोडला !

अश्वत्थाम्यानें प्रचंड सूड घेतला—उगवला—खरा पण ह्या त्याच्या सर्व कृत्यास फोल ठरविण्यासाठींच कीं काय—श्रीकृष्णांनीं जणूं हें आधींच जाणल्यामुळें म्हणा— सात्यकी, कृष्ण, व पांच पांडव हे ' कांहीं मंगल कृत्य करावयाचें आहे' म्हणून दूर एका नदीवर आधींच जाऊन राहिले होते. त्यामुळें ते जिवंत राहिले, व कृपाचार्यांच्या तडाक्यांतून त्यांतल्या-त्यांत सुटलेल्या धृष्टद्युम्नाचें एका सेवकानें जेव्हां ही हकीकत त्यांस येऊन सांगितली तेव्हां क्षुल्लक चुकीमुळें सर्व यशाचें अपयश झालें, म्हणून धर्मास फार वाईट वाटलें. कारण बाप, भाऊ व मुलगे ठार झालेल्या द्रौपदीस आतां तोंड दाखविण्यास जागाच नव्हती ! उपप्लव्य नगरीहून द्रौपदीस आणविल्यावर "ज्या दुष्टानें माझे भाऊ व पुत्र मारले त्यास तुम्हीं ठार केल्याशिवाय मी तोंडांत पाणीहि घालणार नाहीं !" असें ती म्हणाली, व दुष्टसंहारार्थ अवतरलेल्या भीमाकडे तिनें दृष्टिनिक्षेप केला. द्रौपदीच्या दुःखाचा, छलाचा व अपमानाचा खरा कळवळा जर कोणास येत असेल तर आमच्या वीर भीमासच येत असे ! हें आपण आतां-पर्यंत पाहिलेंच आहे. बाकीच्यांनीं कांहीं सबबी तरी सांगण्याचा प्रयत्न केला, पण आमचा भीम तत्काळ निघालाच ! बायकांची अब्रू घेऊन, त्यांना छळून, त्यांना दुःख देणाऱ्या नरपशूंच्या नरडीचे घोट घेणारे असे भीम प्रत्येक देशांत जितके असतील तितके चांगलेंच आहे ! अभागी आर्यावर्तास एके काळीं असा वीर लाभला होता ! व कर्णपर्वांतली कर्णार्जुनांची लढाई सुद्धां आपल्या पराक्रमापुढें फिक्की पाडण्या-इतका प्रताप त्यानें वेळोवेळीं गाजवून दाखविला होता. तथापि सगळीकडेच नुसत्या शक्तीनें कामें होत नसतात. म्हणून अर्जुनासह श्रीकृष्णही त्याचे पाठोपाठ रथांतून निघाले. गंगेच्या कांठीं व्यासादिकांचे समाजांस धूलि-धूसर दर्भवस्त्र नेसून बसलेला अश्वत्थामा पहातांच भीमानें आरोळी दिली व धनुष्य सरसावलें ! अश्वत्थामा घाबरला व मूठभर गवताच्या काड्या 'ब्रह्मशिरस्' मंत्रानें अभिमंत्रित करून 'अपांडवाय !' म्हणून त्यानें

सोडल्या! कृष्णांनीं हें त्याच्या चेहऱ्यावरून आधींच जाणून अर्जुनाकडून उलट तेंच अस्त्र 'अस्त्रानें अस्त्र शमो !' म्हणून सोडविलें. सगळ्या विश्वांत वणवा पेटला ! समुद्रमंथनकाळच्या हालाहलाची आठवण झाली. व्यासादिकांच्या सांगण्यावरून अर्जुनानें आपलें अस्त्र परत घेतलें. पण निजलेल्या वीरांचे मुडदे पाडणाऱ्या अश्वत्थाम्याची तपश्चर्याच फार दांडगी (!) पडल्यामुळें त्यास तें परत घेतां येईना ! तेव्हां पापाच्या इंड्यांत शेवटचा हप्ता म्हणून पांडववंशांतील गर्भिणी स्त्रियांच्या उदरांतील गर्भांवर त्यानें तें सोडलें! निरुपाय जाणून कृष्णव्यासांनीं तें कबूल केलें. तीन हजार वर्षें रक्त व पू यांच्या रौरव नरकांत अश्वत्थामा पृथ्वीवरच भटकत राहिला ! पण हें 'पापाचें प्रायश्चित्त' भोगण्यापूर्वी चुंबित आपला मस्तकींचा मणी काढून देणें त्यास भागच होतें. तो मणि दाखविल्यावर, व प्रत्यक्ष ठार नाहीं तरी 'जिवंत असुनिहि मेल्या'सारखा अश्वत्थामा झालेला ऐकून द्रौपदीनेंही मग फारसा आग्रह धरला नाहीं. तिच्या विनंतीवरून व गुरुप्रसाद म्हणून धर्मानीं तो मणि आदरानें स्वमस्तकीं धारण केला !

म्हाताऱ्या धृतराष्ट्राचे शंभरच्या शंभर पुत्रांचाहि त्यांच्या अधर्मप्रवृत्तीमुळें लढाईत भीमाच्या गदेस बळी पडला असूनहि म्हातारा अजून पुरा उमगला नाहीं. त्यास वैराग्य यावयाचे ऐवजीं ज्या भीमानें त्यांना ठार मारलें होतें त्याचा त्याला अत्यंत राग आला, व त्याचें रूपांतर सूडेच्छेंत होऊन भीमास कडकडून आलिंगन देण्याचे मिषानें–वरकरणी प्रेमाच्या भेटींत अफजुलखानानें शिवाजीस दाबला तसा–त्यास वेंघेंत दाबून मारावा, असा म्हाताऱ्यानें मनांत डांव धरून रणभूमीकडे निघालेली सर्व मंडळी–कौरवस्त्रिया व पांडवांकडील स्त्रिया व इतर जन–ही गंगानदीचे कांठीं क्षणैक थांबली असतां, पायांपडण्यास आलेल्या धर्मास त्यानें कसें बसें आलिंगन दिलें, व "भीम कुठें आहे?" म्हणून तो मोठ्या उत्सुकतेनें विचारूं लागला ! श्रीकृष्णांनीं–सर्वांतर्यामी प्रभूंनीं–ही गोष्ट तेव्हांच जाणली, व पायां पडून आलिंगन देण्यास जाणाऱ्या भीमास त्यांनीं बाजूस सारलें, व दुर्योधनानें गदायुद्धाचें सरावासाठीं पूर्वी तयार केलेली भीमाची लोखंडी प्रतिमा पुढें केली. 'प्रज्ञाचक्षु' सांचल्या

धृतराष्ट्रास तें समजणें शक्यच नव्हतें. त्यानें त्या पुतळ्यास भीमच समजून सर्व शक्ति एकवटून आलिंगन दिलें. पण 'चोरावर मोर' अशा श्रीकृष्णाच्या युक्तीनें भीम जिवंत राहिला, व ती प्रतिमा मात्र भंगून गेली. कारण त्या आंधळ्याची—शंभर कौरवांच्या त्या बापाची—शक्ति प्रचंड होती. प्रतिमा भंगली, व तो दुष्ट म्हाताराही या विलक्षण भेटीनें हृदयास झालेल्या जखमेनें रक्त ओकत खालीं पडला ! इथेंहि श्रीकृष्णांनीं खोट्याचाच अवलंब केला ही गोष्ट खरी. पण कपटी, खोट्या, व नीच अशा माणसांशीं 'शठंप्रति शाठ्यं' याच उपायाचा अवलंब करावा लागतो हें आपण मागें पाहिलेंच आहे. तेव्हां त्यांत वावगें तें काय झालें? राज्यलोभाला बळी पडून, मुलांच्या मागें दडून, ज्या थेरड्यानें असल्या अधर्मास उत्तेजन दिलें, भारतीय युद्धासारखा भयंकर रणसंग्राम करण्याची पाळी आणली, व हजारों स्त्रियांना व मुलांना नाहक उघडें पाडलें, त्याच्या, वरून प्रेमाच्या भेटीखालीं असणाऱ्या, भयंकर सूडप्रवृत्तीला असेंच प्रायश्चित्त मिळणें जरूर होतें ! असो. भीम जिवंत राहून अशा दुष्ट म्हाताऱ्यासहि जेव्हां तो शुद्धीवर आल्यावर त्यानें पुन्हा वंदन केलें तेव्हां मात्र म्हाताऱ्यास कृतकर्माचा पश्चाताप झाला, व त्यानें खऱ्या प्रेमानें भीमास आलिंगलें. गांधारीमातेसहि असेंच दुःख होऊन त्या क्रोधाच्या भरांत तिच्या दृष्टीच्या तेजानें बिचाऱ्या धर्माचीं—तिला वंदन करावयास गेलेल्या धर्माच्या पायाचीं—नखें जळून काळीं झालीं ! पुढें मात्र गांधारीचा क्रोध शांत होऊन, तिनें सर्व पांडवांस दिलदार मातेप्रमाणें प्रेमानें कुरवाळलें ! असो.

भारतीय युद्धाची भीषण लढाई संपून ज्या हक्कासाठीं व न्यायासाठीं पांडवांनीं एवढा प्रळय केला तें राज्य—"मारतां मारतां घ्यावें। राज्य आपुलें॥" ह्या समर्थोक्तीप्रमाणें—त्यांनीं प्राप्त करून घेतलें खरें. परंतु वाचक ! त्याच कुरुक्षेत्राच्या मैदानाकडे आतां दृष्टिक्षेप केल्यास—रंगभूमीवरून आंत गेलेल्या पात्राप्रमाणें—आपणास पहावेसें सुद्धां वाटणार नाहीं ! भयंकर रक्ताच्या नद्या वहात आहेत, मांसाचा चिखल झाला आहे, चतुरंग दल व १८ अक्षौहिणी सैन्य सफा कापून निघाल्यामुळें, हत्ती, घोडे, उंट व सैनिक यांच्या कोट्यावधि प्रेतांचा तेथें नुसता खच झालेला असून गिधा-

डांना ती एक मेजवानीच झाली आहे. व त्या प्रेतांच्या राशींतून आपापल्या आप्तेष्टांचीं प्रेतें शोधून काढीत गंगातटाकांहून आलेल्या शेकडों राजस्त्रिया व वीरस्त्रिया विलाप करीत हिंडत आहेत! कुणाचा पति, कुणाचा बाप, कुणाचा भाऊ, ह्याप्रमाणें प्रत्येक घरांतून कोणीना कोणी समरदेवतेस बळी पडलेलें आहे. मराठ्यांनीं पानपतास—म्हणजे याच ठिकाणीं—पुढें जी लढाई मारली त्याचें ज्याप्रमाणें "एक लाख बांगडी फुटली" असें वर्णन आहे तीच स्थिति सध्याही पण झालेली आहे! करुण रस व भयानक रस मूर्तिमंत त्या क्षेत्रावर दिसून येत आहेत! त्या राजस्त्रियांचा विलाप ऐकून ज्याचें हृदय गहिंवरणार नाहीं असा पाषाण-हृदयीं कोणी असेल काय? पंतांनींही 'स्त्रीपर्वांतील' हा प्रसंग मोठा सहृदयपणें रेखाटला आहे! शंभर पुत्र मेलेले पाहून गांधारीच्या—"पोटीं बहु भडभडलें, गडबडलें चित्त, जें विमळ मळलें।" पतिसुतशोकार्त झालेल्या स्त्रिया, "मुख हुंगिती सुतांचें, पतिवर कर फिरविती, पहावेना!" अरेरे! कोण तें करुण दृश्य!! उत्तरेचा विलाप असाच हृदयद्रावक आहे! "अंकीं मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें! चिबुक धरुनि बोलविते 'लिहिलें ऐसें कसें महापतितें॥'...हा सातवा परिचया मास पहा, गणुनि लोटले साच। इतुक्यांत कसें विटला? साधु म्हणति सख्य साधुशीं साच॥ आयांतें दायांतें म्हणते "मज लाविली बळेंच सवें। कां मोडितां तुम्हीच? क्षण आतां स्वपतिवेगळें नसवें॥ पतिजवळुनि कां नेतां नेउनि हितबोध करुनि खोलींत। तुमच्याहि असें अंतर कां गे पडलें क्रियेंत बोलींत॥!" अभिमन्यूचें एकंदर चरित्रच करुणकाव्याचें एक चित्र आहे ह्यांत शंका नाहीं! कर्णपत्नीहि भूमातेच्या अंकीं पहुडलेल्या आपल्या पतीचें मस्तक मांडीवर घेऊन विलाप करीत आहे—"भूमाते! तूं माताना? मातेची ममता आपल्या लेकरांवर किती असते हें मीं काय सांगावें? मग असें असतां तूं आपल्या लेंकरास असा कां बरें दगा दिलास! मुलाचे शेकडों अपराधहि माता पोटांत घालते ही गोष्ट खरीना? 'पिता जरि विटे 'विटो न जननी कुपुत्रीं विटे' हें खरेंना? मग भूमाते! तूंच कशीग ह्याला अपवाद झालीस? तिकडचा एक अपराध सुद्धां तुला क्षमा करवला नाहींना? अरेरे 'आईच जर आपल्या लेंकरांस मारूं

लागली तर कुणाला शरण जायचे ?' पण दुष्टे ! " बोलतां बोलतां तिचा शोक क्रोधांत रूपांतर पावत होता,– " मज कां गिळिलें नाहीं ? पापे ! रथ चक्र गे कसें गिळिलें ? । दे उत्तर ऐको दे ! कां न वदसि ? तोंड काय गे खिळिलें ? ॥" याप्रमाणें सगळीकडे 'शोकार्त हाहारव' सुरू होता. त्या राजस्त्रियांचे व वीरस्त्रियांचे विलाप व दुःखपूर्ण हावभाव पहावत सुद्धां नाहींत ! यासाठीं या करुणदृश्यरसाचा एथेंच शेवट करून आपण पुढील हकीकतीकडे वळूं या !

राजा धर्मानें चंदन, अगरु व इतर लांकडे, व रथ, हत्यारें वगैरे घालून चिता रचविल्या, व सर्वांच्या देहांस शास्त्रोक्त अग्नि देववून स्नानासाठीं सर्व मंडळी गंगेवर आली. कर्ण हा आपला थोरला भाऊ, हें त्यावेळीं कुंतीकडून कळल्यावर, ही गोष्ट आपणास आधींच कळती तर हा समरप्रसंग खास टळता, असें धर्मानीं मोठ्या दुःखानें उद्गार काढले, व त्याचें व इतरांचें योग्य और्ध्वदेहिक उरकलें, व कांहीं दिवस सर्व मंडळी तेथेंच गंगेच्या कांठीं राहिली.

नंतर राज्याभिषेकाचा प्रश्न निघाला. पण लढाईच्या दणदणाटात अविचलित राहिलेले पण जात्याच कोमलप्रकृति असलेलें धर्माचें हृदय– धर्माचें मन–ह्या कार्यास प्रवृत्त होईना. साधूंची वृत्ति बालकाप्रमाणें कोंवळी असते. एवढ्याशा धक्क्यानें व दंग्यानेंहि ती रडूं लागते–विटून जाते. माँटगॉमरी नांवाच्या आंग्ल कवीनें 'ब्लेनहिमची लढाई' या नांवाच्या लिहिलेल्या कवितेंत वर्णिल्याप्रमाणें लढाईनंतरचा भीषण व करुण देखावा पाहून व राजस्त्रियांचीं विलापपूर्ण भाषणें ऐकून धर्माच्या हृदयास कसेंसेंच झालें होतें, व अर्जुनास राज्य देऊन टाकून आपण वनवास पत्करावा असें त्यास वाटलें. हें त्याच्या दृष्टीनें ठीक झालें. पण त्यानें भीमादि पांडवांच्या व द्रौपदीसारख्या स्त्रीच्या हृदयाकडे यांत बिलकूल लक्ष दिलें नव्हतें. ज्याच्यासाठीं–ज्याच्या आशेसाठीं–द्रौपदीची छळणूक, विटंबना व द्वेष मनांतल्या मनांत दडपून सहन केली; व ज्याच्यासाठींच केवळ वनवास व अज्ञातवास यांतील अनंत हालअपेष्टा व विटंबना भोगल्या त्याच धर्मानें त्या सर्वांचा पुरा सूड घेतला जाऊन 'शेवट गोड' होण्याची वेळ आली असतां असा काढता पाय घ्यावा, हें

पाहून त्यांना किती वाईट वाटलें असेल व धर्माचा किती राग आला असेल, याची वाचकांनींच कल्पना करावी. शिवाय रक्तमांसांचा चिखल तुडविल्याखेरीज कोणासही स्वराज्यप्राप्ती होत नाहीं व स्वराज्याचा मुकुट मस्तकावर बसण्यास रक्ताच्या पायघड्याच घालाव्या लागतात, हें शाश्वत सत्य राजा धर्म पार विसरून गेला होता. शेवटीं सर्वांनीं त्याची समजूत केल्यावर तो राज्याभिषेकास कबूल झाला, व रथांत बसून राजा धर्माची स्वारी हस्तिनापुराकडे निघाली ! भीम रथ हांकतो आहे, अर्जुनानें त्याचेवर छत्र धरलें आहे, व नकुल सहदेव त्यावर चवऱ्या वारीत आहेत, अशा थाटांत नगरप्रवेश झाला ! त्याप्रसंगीं नागरिकांनींही गुढया तोरणें उभारून त्याचें सुस्वागत केलें ! खुद्द भगवान् श्रीकृष्णानें स्वहस्तानें आपल्या पांचजन्यांतलें पवित्र उदक त्याच्या मस्तकीं शिंपिलें व त्यास राज्याभिषेक केला ! धर्मच राजा झाल्यावर त्याच्या धर्मराज्यांत—यमराज्याच्या उलट सर्व स्थिति असावी—सगळीकडे अन्नछत्रपणें, धर्मशाळा, पाणपोया, योग्य राज्याधिकारी, वगैरे वगैरे सोयी व्हाव्यात व लोकांना तें प्रति 'रामराज्य'च वाटावें यांत नवल काय !

वास्तविक एखाद्या गोड कादंबरीप्रमाणें किंवा सुखपर्यवसायी नाटकाप्रमाणें प्रस्तुत कथानकाचा ह्याच ठिकाणीं शेवट व्हावयास पाहिजे, असें सहज वाटतें. व ही जर एकादी कादंबरी किंवा निव्वळ नाटकच असतें तर व्यासांनींहि तो तसाच केला असता, व प्रत्येकास लागला असूनहि त्याचें कल्पना सृष्टींतसुद्धा भय वाटणाऱ्या मृत्यूचे व इतर देखावे व्यासांनीं आपणास कदाचित् दाखविलेहि नसते. परंतु ही कादंबरीच असल्यास खरी कादंबरी आहे—नाटकच असल्यास प्रत्यक्ष घडलेलें नाटक आहे ! 'जयो नामेतिहासोऽयं' ह्या व्यासोक्तीप्रमाणें हा प्रत्यक्ष ( इति+ह+आस ) 'इतिहास' आहे व इतिहासाचीं पानें लिहिणारास जसे सुखाचे तसेच दुःखाचे, जसे उत्पत्तिस्थितीचे तसेच विलयाचे प्रसंगहि वर्णावे लागतात. कारण जगांतील यच्चावत् वस्तूस उत्पत्ति, स्थिति आणि लय ह्या तीन अवस्था लागलेल्याच आहेत—"The paths of Glory lead but to the grave" हें ग्रेचें वचन अगदीं अक्षरशः खरें असून कोणत्याही वैभवाचें वर्णन शेवटीं त्याच्या नाशाचें वर्णनावांचून पुरेंच होत

नाहीं, असा ह्या मर्त्य जगास विघिघटनेचा जणों खडतर शापच असल्या-मुळें इतिहासकारासही शिवाजीच्या व मराठ्यांच्या रम्य कालाचे पाठो-पाठ मोठ्या कष्टानें कां होईना, 'पण' म्हणून शेवटीं त्या वैभवास नाशाच्या समाधींत पुरावेंच लागतें! बिचाऱ्या व्यासांसही इतिहासकार या नात्यानें तसेंच करावें लागलें व आम्हांसही निरुपायानें त्यांचेंच अनुकरण करावें लागत आहे, त्याला ते, आम्ही, किंवा वाचक, तुम्ही तरी काय करणार? आयुष्याच्या 'एकच प्याल्या'च्या प्रारंभीं नितांत रम्य बाल्याची माधुरी, मध्यंतरीं तारुण्याची व प्रौढावस्थेची दुःखमिश्रित सुखाची खमंग चव, व अगदीं तळाशीं—अगदीं शेवटीं—मृत्यूचे चारच कटु जहर थेंब असतात! पण हा 'एकच प्याला' ज्यानें ओठाला लावला त्यास मधुर व खमंग रसापाठो-पाठ हे चार थेंबही कसेबसे गिळावे लागतात त्याला कोण काय करणार? उलट त्यांतूनही जितकी उच्चता काढतां येईल तितकी काढावी—मृत्यूंत, मृत्युशय्येवर, व मृत्यूनंतर सुद्धां जितकें शिकतां येईल तितकें शिकावें हीच आर्यांची खरी कसोटी आहे—उच्च ध्येय आहे—व त्याप्रमाणें व्यासांनीं यापुढील कांहीं कांहीं गोष्टींत तें शिकविलेंहि आहे.

पहिलेंच उदाहरण घ्या! शरपंजरीं पडलेल्या आमच्या भीष्मांना वाचक विसरले नसतीलच. युद्धाचे शेवटचे आठ दिवसांचा दंगल व वरील राज्या-भिषेकाची मौज चालू असतां आपला अंतकाळ जों जों समीप येत चालला व त्यामुळें शरीरास विकलता व बुद्धीस चांचल्य हीं जों जों अधिकाधिक वाढूं लागलीं तों तों कृष्णप्रभूंच्या त्या एकनिष्ठ भक्तानें हृदयाच्या अधिकाधिक तळमळीनें त्या जगन्निवासाकडे आपल्या हृद-याचा लय लावला! सर्वांतर्यामी प्रभूस ही गोष्ट कळल्यावांचून कशी राहील? त्यांनीं राजा धर्मास इतर पांडवासह व उरल्या सुरल्या क्षत्रिय राजांसह, जेथें भीष्माचार्य उत्तरायणाची वाट पहात पहुडले होते, तेथें नेलें. सूर्य दाक्षिणायनांतून उत्तरायणांत जाण्यास अद्याप जवळ जवळ दोन महिने—५६ दिवस—अवकाश होता. श्रीकृष्णानीं आपल्या भक्ताचें यश वाढविण्यास भीष्माचार्यांना धर्मराजास राजनीतीचा व धर्मनीतीचा वगैरे उपदेश करावयास सांगितलें. "माझें शरीर विकल झालें आहे, गात्रें गलित झालीं आहेत, बुद्धीस चांचल्य आलें आहे, तेव्हां मला तो करतां येणार नाहीं

याबद्दल कृष्णा, मला क्षमा असावी!" असें भीष्म पितामह म्हणाले. आपल्या भक्ताची ही दशा पाहून प्रभूस गहिंवर आला! एकाद्या क्षुद्र 'रंकानें' सुद्धां 'काकुळती' धांवण्यास हांक मारली असतां प्रभु धांवतात ना? "आणि भक्तांहि तेचि दशा ?। मग भक्तीचा सोसू कायसा ?।" भक्ताची सुद्धां जर त्या 'रंका' प्रमाणेंच स्थिती झाली तर मग त्यानें भक्तीचा 'जोंजार' तरी कशाला करावा? प्रभूस हें कसें खपेल? "ज्ञानिया आत्मा माझा!" असें छातीठोक म्हणणाऱ्या देवास आपल्या भक्ताची ही दुःस्थिति कशी पाहवेल? "तुमची सर्व विकलता जाऊन बुद्धीसहि हुशारी व तरतरी येईल बरें! तुम्ही कांहीं काळजी करूं नका." गहिंवरलेल्या कंठानें प्रभू म्हणाले! आणि खरोखरच प्रभूंच्या आशीर्वादानें भीष्मांस बरें वाटून त्यानंतर प्रश्नोत्तर–उर्फ–शंकासमाधान रूपानें भीष्मगांगेयांचा वाक्गंगौघ सारखा अस्खलित ५६ दिवस वहात राहिला! त्यालाच 'शांति' आणि 'अनुशासन' अशीं योग्य नांवें भारतांत आहेत!

प्रथमतः राजधर्म ह्मणजे काय व राजा कोणास ह्मणावें व राजाचें वर्तन कसें असावें याबद्दल भीष्म सांगतातः–"यथाहि गर्भिणी हित्वा स्वप्रियं मनसोऽनुगं। गर्भस्य हितमादत्ते तथा राज्ञाप्यसंशयं–॥ वर्तितव्यं कुरुश्रेष्ठ सदा धर्मानुवर्तिना। स्वप्रियं तु परित्यज्य यद्यल्लोकहितं भवेत् ॥' तसेंच ज्याच्या राज्यांतले लोक 'आपण बापाच्याच घरांत जणों नांदत आहोंत' असें मानतात तोच राजा खरा राजा होय. तसेंच चारी वर्णांचीं कर्तव्यें नीट रीतीनें होण्यासही राजाच कारण आहे. कारण धर्मा, "कालो वा कारणं राज्ञः राजावा कालकारणं। इति ते संशयो माभूद्राजा कालस्य कारणं॥" बाबारे कृतयुग कृतयुग म्हणून कांहीं वेगळें कां आहे? राजानें स्वकर्तव्य चोख बजावल्यावर कृतयुगच काय पण त्या प्रजेस प्रत्यक्ष स्वर्गसुखहि तुच्छ वाटणार नाहीं काय? तसेंच धर्मा, दुर्बलांच्याकडे कधींहि दुर्लक्ष करूं नये बरें. कारण दुर्बल जनांच्या विलापाकडे जो लक्ष देत नाहीं अशा राजाच्या सद्दीस क्षयरोगच झाला असें खास समजावें!" ह्या बिनमोल उपदेशापासून सर्व राजांनीं अथवा राज्यकर्त्यांनीं–सर्वकाळ आपला चिरंतन फायदा करून घ्यावा अशाच लायकीचा हा खरोखर उपदेश आहे! पण त्याकडे किती राजे लक्ष देत असतील बरें?

यानंतर—क्षत्रियानें समरांगणीं कसें वागावें याबद्दल भीष्म पितामहांनीं सांगितलेलें बिनमोल वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे.—" धर्मेण निधनं श्रेयः" ते म्हणतात, "न जयः पापकर्मणा। अधर्मयुक्तो विजयो ह्यध्रुवोऽस्वर्ग्य एवच ॥" पांडवांना शेवटीं स्वर्ग मिळाला आहे ही गोष्ट लक्षांत घेतां त्यांनीं अधर्मयुद्ध केलें नाहीं—( तर 'शठास शाठ्य' या न्यायानें धर्मयुद्धच केलें आहे )—ह्याच आमच्या म्हणण्यास खुद्द भीष्मांचा हा वरील श्लोक बळकटी आणीत नाहीं काय ? असो.

यानंतर सामान्य धर्माकडे वळून भीष्म म्हणतात, " मात्रा पित्रोर्गुरूणांच सेवा बहुमता मम ॥ " साहजीकच आहे. पित्याच्या सुखासाठीं ज्यांनीं अलोट स्वार्थत्याग केला त्यांच्या मुखांतूनहि असाच उपदेश यावा हें योग्यच आहे. योग्य वचन योग्य मुखांत साजत आहे यांत शंका नाहीं! भीष्मांची वाणी नेहमीं सक्रिय व म्हणूनच वजनदार असते त्याचें कारण हेंच. तरी पण " त्यांनीं पितृभक्तीच्या उसळींत जी प्रतिज्ञा केली तीच आधीं चूक होती " असें " भीष्मांची भयंकर भूल " लिहिणारे रा. दिवेकर म्हणतातच. खरेंच ! एकाद्या सुंदर कुमारिकेशीं लग्न लावून तिच्याशीं प्रणयालाप करायचे टाकून आमच्या वेड्या भीष्मानें हें काय केलें कोणास ठाऊक ! पण दुर्दैव बापड्याचें कीं, त्यास तसा उपदेश करणाराच—आमच्या दिवेकरासारखा—कोणी भेटला नाहीं ! असो. भीष्मांनीं सर्व—सामान्य धर्माचें केलेलें विवेचन फारच गोड आहे ! ते म्हणतात, " पूज्यपणा, नम्रपणा, भक्ति, इत्यादि गूणच सदाचरणाचा व समाजसुस्थितीचा पाया आहे ! मातापित्याहूनही दिव्य जन्म देणाऱ्या गुरूची योग्यता अधिक श्रेष्ठ आहे ! " यानंतर भीष्म दुसऱ्या गोष्टीकडे वळून म्हणतात, " अर्थाचें मूळ धर्मांत व कामाचें अर्थांत आहे ! ":—म्हणजे धर्मानें अर्थप्राप्ति, व धर्मार्थांची हानि होणार नाहीं असें विषयसेवन, केल्यास त्या सर्वांची " त्यागातें समान " च योग्यता आहे. " तसेंच धर्मा, " नास्तिसत्यात्परोधर्मः नानृतात्पातकं परम् " हेंहि तूं कधींहि विसरूं नकोस ! " याप्रमाणें सोज्वळ व दिव्य उपदेश करून, छपन्न दिवस झाल्यावर भीष्मांचा अंतकाळ आला तेव्हां मागें सांगितल्या-

प्रमाणें त्यांनीं श्रीकृष्ण प्रभूची स्तुति केली, व त्यांच्या गुणगानांत आत्मा रंगला असतांनाच योगबळानें त्यांनीं आपला प्राणवायु हळू हळू वर खेंचला व शेवटीं एक तेजोमय ज्योत त्यांच्या मस्तकांतून आकाशांत निघून गेली—आकाशोदरांत विलीन झाली! याच तेजोमय ज्योतीनें त्यांचा देह, वाणी व मन इतकें तेजस्वी केलें होतें!

कुरुकुलाचा आधारस्तंभ भीष्मपितामह याप्रमाणें दिवंगत झाल्यावर त्यांचें उत्तरकार्य आटपणाऱ्या धर्मास, त्या वृद्ध पण तितक्याच गोड पितामहांबद्दल किती वाईट वाटलें असेल, व एखाद्या अबलेप्रमाणें त्यानीं किती अपार शोक केला असेल त्याचें चित्र काढणेंहि आमच्या शक्तीबाहेरचें आहे! आम्ही एवढेंच सांगतों कीं, त्यांच्या त्या विलक्षण तळमळीवर शेवटीं व्यासांना अश्वमेध यज्ञाची युक्ति सुचवावी लागली. व याप्रमाणें तो करण्याचें ठरलें, व सर्व मंडळी हस्तिनापुरास आली.

यानंतर तीर्थें, वनें व नद्या यांची शोभा पहात हिंडणाऱ्या श्रीकृष्णांनीं अर्जुनास पुन्हां गीतोपदेश केला असा एक भाग आहे. व त्यास 'अनुगीता' म्हणतात. पण हा सर्व भाग प्रक्षिप्त दिसतो. कारण त्याला सबब काय, तर म्हणे अर्जुन म्हणतों कीं, 'आपण सर्व उपदेश विसरलों.' ज्या उपदेशामृताच्या पानावर अर्जुनानें एवढी भयंकर लढाई मारली व त्यांतले शेकडों व्यामोहाचे प्रसंग जिंकले, त्याच अर्जुनास त्याच उपदेशाचा विसर पडला, हें म्हणणेंच किती हास्यास्पद दिसतें! "मूळचा ग्रंथ २४००० श्लोकच असून चारजणांच्या हातून तो जाऊन तो वाढत वाढत एक लाख श्लोकांवर आला आहे" इत्यादि भारताचे 'चिकित्सक' (critics) म्हणतात, तें कांहीं उगीच नाहीं. अस्तु.

व्यासांनीं उपाय सांगितला खरा, पण लढाईनें लोक हैराण झाले असतां पुन्हां प्रजेकडून पैसा काढण्यास युवराजांचे स्वागत करणाऱ्या इंग्रजसरकारप्रमाणें धर्म थोडाच तयार होता? त्यानें साफ सांगितलें कीं, असला अश्वमेधच मला नको! मग व्यासांनीं जेव्हां हिमालयावरील पूर्वीच्या अशाच एका यज्ञाचे भूमीच्या उदरांत राहिलेलें सामान आण-

व्यास सांगितलें, तेव्हां कुठें आमच्या धर्माची समाधानी झाली ! व्यासांच्या सांगण्याप्रमाणें पांचही पांडव हिमालयावर जाऊन त्यांनीं तें सामान अनेक वाहनांतून भरलें व ते हळू हळू हस्तिनापुर ा मार्ग चालूं लागले !

पण इकडे बापड्या उत्तरेची कोण दशा झाली होती याची त्यांना कल्पनाहि नसेल ! पतिमरणोत्तर त्याच्या अंशाचें जनन त्याच्या 'अनाथ' पत्नीस किती दुःखदायक होत असेल याची कल्पना तसा प्रसंग दुर्दैवानें कोसळणारी स्त्रीच करूं जाणे ! आणि त्यांतून जर तें बालक प्रथमच होणारें असलें व तें जर मृत झालें—मृतच जन्मलें—तर राजवंशांतील तशा स्त्रीला तरी निदान किती दुःख होईल बरें ? आमच्या दुर्दैवी उत्तरेची—करुणदृश्यांतील नायिकेची—तीच स्थिति झाली. सर्वांतर्यामी श्रीकृष्णास त्याची खबर लागून ते द्वारकेहून त्वरेनें तेथें येऊन पोहोंचले. तों इकडे उत्तरेच्या मुलाकडे कुंती, सुभद्रा, इत्यादिकांचे डोळे लागून राहिले असतां उत्तरा प्रसूत झाली; पण बिचारीच्या नशिबीं पुत्रसुख सुद्धां लिहिलेलें नव्हतें. कारण जन्मलेलें मूल मृतावस्थेंतच जन्मलें ! क्रूरकर्म्या अश्वत्थाम्याच्या ब्रह्मशिरस् अस्त्रानें इतरांप्रमाणेंच बिचाऱ्या उत्तरेच्या पोटांतीलहि गोळा ठार केला होता !—कुरुकुलाचा भावी एकच आधार करपवून टाकला होता ! तें पाहून त्या बायांना किती दुःख झालें असेल याची कल्पनाच केली पाहिजे. उत्तरा तर शोकानें अगदीं वेडी होऊन गेली व मूर्छित पडली ! श्रीकृष्ण घाईघाईनें प्रसूतिगृहाकडे येतात तों तेथें एकच आकांत उडालेला त्यांच्या दृष्टीस पडला ! डोळ्यांत पाणी आणून त्या बालकास उठविण्यास व आपली प्रतिज्ञा खरी करण्यास कुंती—सुभद्रेनें श्रीकृष्णास विनंति केली. " बाळ ! " मृत पुत्राचें शव मांडीवर घेऊन मूर्च्छेतून जागृत होऊन विलाप करणारी हतभागी उत्तरा बोलत होती, " बाळ, हे पहा त्रैलोक्यनाथ भगवान् श्रीकृष्ण तुझ्याकडे येत आहेत ते तुला दिसले कां ? ह्या तुझ्या हतभागी आईकडे एकदां तरी डोळे उघडून पहारे ! अरेरे, कोण्या दुष्टानें माझें बाळ मारलें बरें ?" याप्रमाणें उत्तरेचा अनंत विलाप सुरू होता ! त्या सर्वांचें समाधान करून श्रीकृष्णांनीं आपल्या प्रतिज्ञेचें उच्चारण केलें व—" मी जर खरा सत्यवादी, ब्रह्मण्य व धर्मप्रिय असेन तर ब्रह्मास्त्रानें मृत झालेला हा

बालक उठो ! " असें श्रीकृष्णांनीं म्हटल्याबरोबर तें मूल जिवंत होऊन रडूं लागलें! व क्षणांत सगळीकडे आनंदी आनंद झाला! 'परिक्षीण' कुलांतूनहि जगलेल्या ह्या मुलाचें 'परीक्षित' नांव ठेविलें. याच सुमारास हास्तिनापुरास सर्व पांडव येऊन पोंचले! तेव्हां ह्या दुहेरी आनंदाचें प्रदर्शन नागरिकांनीं गुढ्या, तोरणें, पताकादि उभारून किती केलें असेल हें सांगणें नकोच!

यानंतर यज्ञासाठीं खंडणी गोळा करण्यासाठीं व स्वतःचें सार्वभौमत्व प्रस्थापित करण्यासाठीं उत्तम जातिवंत काळा घोडा सोडण्यांत आला, व त्याचें रक्षण करीत 'दिग्विजय' गाजविण्यास आमचा धनंजय पार्थ निघाला. "ज्या कोणाची पांडवांसारख्या सार्वभौम सत्तेस विरोध करण्याची तयारी असेल—त्यांचे मांडलिक होणें ज्यांस मान्य नसेल—त्यांनीं मनगटांत जोर असेल तर त्या घोड्यास अडवून धरावें व लढाईस तयार व्हावें, नाहीं तर ज्या देशाच्या हद्दीवरून तो घोडा अप्रतिहत जाईल तो देश पादाक्रांत झाला आहे—पांडवांचें मांडलिकत्व त्या राजास मान्य आहे—असें समजलें जाईल "—असा या 'दिग्विजयार्थ' घोडा सोडण्याचा अर्थ होय. प्रभू रामचंद्रांनीं अयोध्येस परत आल्यावर असाच यज्ञ केला होता, व त्यांतला घोडा दिग्विजयासाठीं लक्ष्मण घेऊन जात असतां 'बापसे बेटा सवाई' अशा लवकुशांनीं तो अडवून धरून "कर्दळी वनीं" कसा बांधला, व लक्ष्मणच काय, पण प्रत्यक्ष श्रीराम लढाईला आले असतां त्यांची सुद्धां त्यांनीं कशी फॅ फॅ उडवली, याची मनोरंजक कथा रामायणांत आहे. इथेंहि तोच प्रकार झाला. अर्जुनाच्या तीर्थयात्रेंत त्यानें वरिलेल्या मणिपुरनृपकन्येच्या-चित्रांगदेच्या-पोटीं जन्मलेला 'बभ्रुवाहन' राजा असाच प्रख्यात वीर होता; व त्यानें अर्जुनाशीं निकराची झुंज खेळून त्यास ठार केलें! पण नागकन्या उलूपीनें संजीवनमणि आणून अर्जुनास पुन्हां जिवंत केला व चित्रांगदेच्या शोकास नाहींसें करून मग आपणच ही सगळी धनंजन—मृत्यूची माया कशी केली होती व त्यास—भीष्मांस एक प्रकारें अधर्म युद्धानें मारणाऱ्या अर्जुनास—वसूंनीं दिलेला शाप कसा कारण झाला, इत्यादि सर्व हकीकत सविस्तर सांगितली. असो. याच्या आधीं सिंधुदेशावरून अर्जुन येत असतां जयद्रथाचा मुलगा त्याच्या—त्या

परंतपाऱ्या–नुसत्या धाकानेंच मेला!–त्यानें आत्महत्याच करून घेतली म्हणतात! यंवरे वीर! शेवटीं दुःशीलेच्या प्रार्थनेवरून अर्जुनानें तिच्या तान्ह्या नातवासाठीं युद्धाचा विचार सोडून दिला! नंतर माणिपुरास आमच्या अर्जुनजींची कशी प्राणांतिक अवस्था झाली तें आपण वर वाचलेंच आहे! असो.

यानंतर मागध, कोसल, पंचनद, चेदी, गांधार इत्यादि सर्व देश जिंकून अर्जुन परत आला, व चैत्रीपौर्णिमेस यज्ञास प्रारंभ झाला! धर्मराजानें यज्ञदक्षणा म्हणून खुद्द व्यासांना सर्व पृथ्वी दान केली! पण त्याबद्दल व्यासांनीं साऱ्या एक हजारच मोहरा घेतल्या व पृथ्वी त्याची त्यास परत दिली! यज्ञ यथास्थित सुरूं होता. यज्ञास आलेल्या पांडवांच्या विशेष परिचयाच्या व आग्रहाच्या व इतरही मंडळींस रोज अन्नदान व इतर सोयी मिळत होत्या! करभाररूपानें आणलेलें इतर धनही तपोनिष्ठ ब्राह्मणांस 'महादान' म्हणून धर्मानें देऊन टाकलें–धर्माचा जिकडे तिकडे 'बोलबाला' झाला! पण सर्वस्वाची होळी करून–प्रसंगीं सर्वजण उपास काढून, आलेल्या अतिथीस अन्नदान करून जो महायज्ञ होतो त्याच्यापुढें असल्या यज्ञाचीहि मातब्बरी नसते! असें दाखविण्यास कुरुक्षेत्रांतील 'कापोती' नांवाच्या उंछवृत्तीनें रहाणाऱ्या ब्राह्मणानें, त्याच्या वृद्ध पत्नीनें व तरुण सुनेनें, प्रत्यक्ष यमधर्मच अज्ञातपणें अतिथिरूपानें त्यांची परीक्षा पाहण्यास आले असतां वरीलप्रमाणें स्वार्थत्याग करून व त्या अतिथीस तिघांनींही अन्न देऊन, कसा दिव्य यज्ञ केला व त्या दिव्य यज्ञांतील सातूचे पिठावर लोळल्यानें अर्धांग सोन्यानें झालेला, व चालू यज्ञांत–धर्माच्या अश्वमेध यज्ञांत–येऊन तेथल्या अन्नावर लोळून सुद्धां आपलें अर्धांग कसें सोन्यासारखें होत नाहीं हें सांगणारा, एक मुंगूस तेथें आला व त्यानें वरील कथा सांगून तो गुप्त झाला.

यानंतर अंध धृतराष्ट्र वृद्ध गांधारीसह राजा धर्माजवळच १५ वर्षे राहिला. बापड्या वृद्ध दंपत्यास आतां दुसरा कोणाचा आधार होता? त्यांचे शंभरच्या शंभर पुत्र लढाईत ठार झाल्यावर त्यांनीं कुणाकडे पहावें? राजा धर्मही त्यांचें मोठ्या प्रेमानें पालन करीत होता, व त्यांना सर्व प्रकारें मान देऊन त्यांना आपल्या पुत्रांचा विसर पडेल असें करण्याचा

शक्य तितका प्रयत्न करीत होता. पण आमच्या असंस्कृत भीमास एवढेंहि सहावेना! "त्या दुष्टांना मारलेले हे माझे भुजदंड पहा !" असें धृतराष्ट्र–गांधारीदेखत दुसऱ्याजवळ वारंवार मोठ्यानें बोलून तो आपले प्रचंड दंड थोपटीत असे ! साहजीकच १५ वर्षांनीं धृतराष्ट्र व गांधारी–कांहीं अंशीं वरील भीमाच्या उद्गारास कंटाळून, व कांहीं अंशीं देहाचें सार्थक करण्यास–वनास निघालीं! धर्मानें पुष्कळ आग्रह केला. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. व्यासांनींहि धर्मास सांगितलें कीं, " 'क्षत्रियानें रणांत किंवा तपांत मरावें,' ह्या शास्त्रनियमाप्रमाणें आयुष्याचीं राहिलेलीं थोडीं वर्षें त्यांस वनांत घालवूं दे." मोठा दानधर्म करून धृतराष्ट्र शेवटीं निघालाच! त्याबरोबर गांधारी, विदुर, संजय व कुंतीहि निघाली. जिनें आपणास एवढें अमित प्रोत्साहन देऊन भारतीय झगडा करवला, ती आपली माताच म्हातारपणीं आपणास सोडून जात आहे–आपण लढाईंत यशस्वी होऊन सर्व प्रकारें तिच्या मनाजोगें करूनही तिनें जावें–याबद्दल तिच्या प्रेमळ पुत्रांस–पांडवांस साहजीकच फार वाईट वाटलें. पण कुंतीनें दिलेलें उत्तर प्रत्येक आर्यस्त्रीनें हृदयमंदिरीं कोरून ठेवण्यासारखें असल्यामुळें आम्हीं तें पुढें देत आहों. ती म्हणाली, "तुमचें राज्य जाऊन शूर पंडूचे पुत्र असूनही दीनाप्रमाणें तुमची स्थिति होऊं नये व तुम्हीं सर्वांनीं लहानपणापासून भोगलेल्या दुःखांचा व बिचाऱ्या द्रौपदीच्या छळाचा कांहीं तरी सूड उगवावा, व त्या गांजलेल्या, पोळलेल्या गाईंस सुखी करावें म्हणूनच मीं तुम्हांला ह्या झगड्यास उद्युक्त केलें. बाकी माझ्याविषयींच म्हणाल तर, "नाहं राज्यफलं पुत्राः कामये पुत्रनिर्जितं । पतिलोकानहं पुण्यान् कामये तपसा विभो ॥" याप्रमाणें आपल्या पोरांचें समाधान करून कुंतीहि धृतराष्ट्रादिकांबरोबर भागीरथीचे तीरावरील अनेक ऋषींचे आश्रमांपैकीं शतयूप नांवाच्या राजर्षींचे आश्रमांत जाऊन राहिली !

सहदेव हा कुंतीचा फार लाडका होता. कृष्णशिष्टाईच्या वेळेस–" मातेसि नमुनि वद कीं आहे आरोग्य साधु सहदेवा।" असेंच धर्मांनीं सांगितलें आहे व खुद्द कुंतीसही त्यावेळच्या–कृष्णशिष्टाईच्या वेळच्या–प्रसंगीं सहदेवाचीच अधिक आठवण होत आहे व–" पावेन कधीं बा

मी म्हणते स्वबहिश्चरासु सहदेवा ॥ " असें ती म्हणत आहे, यावरूनही हीच गोष्ट उघड होत आहे. मातेला शेवटच्या अपत्याची अत्यंत ममता असते. अधोगामी असा तिच्या प्रेमाचा ओघ सहाजीकच शेवटच्या बालकावर स्थिर व स्थित होतो. ( खुद्द प्रस्तुत लेखकाची माता वेडाच्या स्थितींतही सायंकाळच्या गुरें परत येण्याच्या सुमारास त्याची आठवण होऊन क्षणैक शुद्धीवर येऊन आम्ही–तिचें शेवटचें बालक–कोठें रस्त्यावर खेळत तर नाहींना ? नाहींतर एखाद्या गुराखालीं चेंगारायचें, म्हणून ती पाहात असे, असें आमचे पूज्य वडील सांगतात. यावरूनहि आमच्या वरील म्हणण्यास बळकटीच येत आहे. कारण निसर्गांतील ती एक खरीच गोष्ट आहे! ) साहजीकच सहदेवास आपलें पुत्रवत् पालन करणाऱ्या आपल्या मातेस भेटावें असें फार वाटलें! कारण त्यास चैनच पडेना. धर्माचीहि तीच गत होती. लवकरच सगळी मंडळी शतयूपाचे आश्रमांत जातात तों धृतराष्ट्रादि मंडळी यमुनेवर स्नान करून फुलें व पाणी आणण्यास गेल्याचें कळलें म्हणून तिकडे वळलीं, तोंच ती हळुं हळुं येतांना दिसली. धर्मादिकांनीं धांवत जाऊन लोटांगणें घातलीं. पण विदुर कोठें दिसेना. चौकशीअंतीं वायु भक्षण करून कुठें तरी तपाचरण करीत तो भटकत असल्याचें कळलें. पण इतक्यांत जटिल, धूलिधूसर, कृश व नग्न अशी मुक्तावस्थेंतली विदुरमूर्ति धर्माच्या दृष्टीस पडली. " पिशाच्चा ! बोल तूं कोण आहेस ? " म्हणून आपल्या बापाचे भुतामागें धांवणाऱ्या हॅम्लेटप्रमाणें धर्म हांका मारीत विदुरामागें धांवला! कांहीं वेळानें विदुर एका झाडास टेंकून उभा राहिला, व कांहीं वेळ धर्माकडे टक लावून नंतर योगबळानें प्राणेंद्रियांसह तो धर्मांत मिळून जातांच त्याचें कलेवर मृतप्राय होऊन पडलें, व इकडे धर्मास आपल्या सात्विकता, विद्या व ज्ञान यांच्या साठ्यांत विशेष भर पडल्यासारखें वाटलें!

नंतर व्यासांच्या कृपेनें एका रात्रीं खुद्द भागीरथींतून सर्व मृतवीर–दिव्य शरीरानें नटलेले असे–सर्व कौरवस्त्रियांस व धृतराष्ट्रादिकांस भेटलें–खुद्द धृतराष्ट्रासही तें दिव्यदृष्टीनें पहावयास मिळालें ! रात्रभर आनंद झाल्यावर ते आले तसेच भागीरथींत गडप झाले, व शेक्स्पिअरच्या टेंपेस्टमधील जादुगाराप्रमाणें–मिरांडेच्या बापाप्रमाणें–

त्यांना बोलावणाऱ्या व्यासांनीं त्यांच्या पाठोपाठ जावयाचे असेल त्यांनीं भागीरथींत उड्या घ्याव्यांत असें म्हटल्यावर कौरवस्त्रियांनीं व इतर क्षत्रिय स्त्रियांनीं भडाभड नदींत उड्या घेतल्या ! नंतर सुमारें दोन वर्षांनीं खुद्द नारदांनीं हस्तिनापुरास येऊन, ' अचानकपणें राहत्या आश्रमास आग लागून तो वणवा सगळ्या अरण्यभर कसा पेटला व त्यांत बिचाऱ्या तिघांचा–धृतराष्ट्र, गांधारी व कुंती या तीन वृद्धांचा–कसा अंत झाला, व संजय तेवढा मुष्किलीनें वांचून हिमालयावर कसा निघून गेला' तें वृत्त सांगितलें. तेव्हां साहजीकच सर्वांस फार वाईट वाटलें ! याप्रमाणें १८ वर्षें संपलीं. भारतीय युद्ध आटपून १८ वर्षें खलास झालीं ! अजून अशींच १८ वर्षें संपल्यावर खुद्द आमच्या चरित्रनायकांचा व नायिकेचा अंत जवळ आला. कादंबरीच्या दृष्टीनें सुद्धां महाभारताचें पसरलेलें एवढें मोठें जाळें एखाद्या कुशल कादंबरीकाराप्रमाणें किंवा कुशल नाट्याचार्याप्रमाणें त्यांनीं कसें कुशलतेनें –जसें विणलें तसेंच–आवरलें आहे हें पाहिलें म्हणजे व्यासांच्या चातुर्याचें कोणासही कौतुकच वाटणार आहे! कोणच्या पात्रांचा केव्हां, कसा व कुठें अस्त दाखवावयाचा ही हतोटी त्यांना बरोबर साधली आहे. अस्तु. पहिल्या प्रथम कृष्णप्रभू सर्व यादवांसह निजधामास गेले आहेत. भक्तत्राणार्थ अवतरलेला जगन्निवास तें कार्य झाल्यावर भक्तांच्या आधींच स्वस्वरूपीं विलीन झाला ! विश्वामित्र, कण्व,नारदादि ऋषींची, ' विनाशकाले विपरीतबुद्धि ' होऊन, यादवांनीं चेष्टा केली. सांबाला स्त्रीवेष देऊन ह्या बभ्रूच्या स्त्रीला काय होईल म्हणून विचारल्याबरोबर "वृष्ण्यंधकविनाशाय मुसलं घोरमायसं " म्हणून त्यांनीं सणसणीत शाप दिला. खरोखरच सांबाला मुसळ झालें ! त्याचें पीठ करून बभ्रूनें समुद्रांत टाकलें. पण अंतकाल जवळ आल्यामुळें हुकमाविरुद्ध दारू पिऊन बळराम कृतवर्मा सात्यकी या वृद्धांनीं सुद्धा दारूनें झिंगून एकमेकांची टाळकीं सडकलीं व त्या ' यादवीं'त सर्व यादव ठार झाले ! बळरामाच्या अंगांतून एक प्रचंड सर्प निघून जातांच ते मरून पडले. खुद्द भगवान् डाव्या गुडघ्यावर उजव्या पायाची टांच ठेवून एका वृक्षाखालीं पहुडले असतां तें हरिणच समजून दुरून एका पारध्यानें बाण मारला. जवळ येऊन

पाहतो तों पीतांबरधारी प्रभू! बापडा मनांत फार कष्टी झाला! पण त्याचें समाधान करून देवदूतांच्या जयघोषांत दिव्य देहानें ती दिव्य मूर्ति वैकुंठीं गेली !! दारुकाच्या निरोपाप्रमाणें अर्जुनानें द्वारकेंतला सर्व स्त्री-समाज—सर्व राणीवशांतला स्त्रीसमाज—बाहेर काढला व त्यांच्या पोरा-बाळांसकट तो तेथून बाहेर पडला. बिचारा वसुदेव दुःखानेंच मेला! देवकी व रोहिणी त्याबरोबर सती गेल्या. नंतर अर्जुन बाहेर पडला तोंच इकडे समुद्राच्या वाढत्या लाटांनीं द्वारकेस आपल्या पोटांत घेतलें—द्वारका समुद्रांत बुडाली! पण पंचनदांतील प्रसंग—तेथील भिल्लकोळ्यांनीं अर्जुनाच्या डोळ्यांदेखत, त्या अलंकारसुशोभित सुंदर स्त्रिया पळवाव्या व अर्जुनास—व्यासांच्या समाधानीप्रमाणें बोलायचें तर केवळ त्यांचा—पांडवाचा—अंतकाळ जवळ आल्यामुळें त्यास कांहींच प्रतिकार करतां येऊं नये ही गोष्ट जरा चमत्कारिक दिसते. असो. त्यानंतर खुद्द पांडवांचा व द्रौपदीचा अंतकाळ समीप आला! व सर्व ऐहिक बंधनांचा पाश टाकून देऊन परीक्षितास गादीवर बसवून व राज्याची व्यवस्था लावून सर्वजण 'पृथ्वी'प्रदक्षिणेसाठीं म्हणून बाहेर पडले. समुद्रांत बुडालेली द्वारका पाहून ते पुढें हळुं हळुं हिमालय चढून गेले! समोरच मेरू दिसत होता. मध्यें वाळूचें मैदान पसरलें होतें! सर्वांच्यापुढें धर्म, मग भीम, मग अर्जुन, नकुल, सहदेव व त्यामागें द्रौप्रदी, असे चालले होते. व द्रौपदी-कडून अनुक्रम धरून एकएकजण त्या मैदानांवर गळून पडला! भीम पडेपर्यंत धर्मांनी प्रत्येकाबद्दल उत्तरें दिलीं. प्रेमाच्या पंक्तिप्रपंचास्तव द्रौपदी गळाली, ज्ञानाच्या धमेंडीबद्दल सहदेव आटपला, रूपगर्वाबद्दल नकुल पडला, गर्विष्ठपणाबद्दल अर्जुन खपला, व फाजील खादाडपणास्तव भीमदादा संपले! राहतां राहिले धर्मराज व त्याबरोबरचा एक कुत्रा. हा त्यांचा मोठा आवडता होता. खुद्द यमधर्मच साक्षात् श्वान बनून धर्माची कर्तव्यनिष्ठा पाहण्यास आले होते. तो कुत्रा धर्माजवळ त्याच हेतूनें बरेंच दिवस होता. व त्याची भक्ति त्यांच्यावर फार होती. पण स्वर्ग-सुखार्थ ह्या कुत्र्याचा धर्म त्याग करतो काय हें पाहण्याची संधी लवकरच आली. कारण तितक्यांत इंद्राचा रथ आपल्या गंभीर नादानें दशदिशा धुमवीत तेथें आला! व त्या कुत्र्यास तेथेंच सोडून स्वर्गास चल, म्हणून

इंद्र म्हणूं लागला. सामान्य मानव त्यावेळीं खास हुरळून जाता ! पण धन्य त्या धर्माची कीं, त्या एकनिष्ठ सेवक–श्वानासाठींसुद्धां त्यानें स्वर्गसुखावर लाथ मारली! " अरे, तूं आपल्या भावांचा व बायकोचा त्याग केलास ना ? ह्या–'मग कुत्र्याचा कां करीत नाहींस' ह्याचें सूचक अशा–प्रश्नावर धर्मानें " तीं मला वर आली नव्हतीं. पण त्यांना उठवण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं त्याला मी काय करणार ? " ह्या धर्माच्या उत्तरांवरून त्यांच्या मृत्यूची गोष्ट धर्मास किती लागून राहिली होती हें चांगलेंच दिसतें! व तोच इष्ट–माझे भाऊ व इतर आसेष्ट असतील तेथें मला न्या हीच प्रार्थना, व हाच आक्रोश–धर्मांचा स्वर्गांतही कायम टिकला आहे यावरून त्यांच्या अत्यंत प्रेमळ सहृदयत्वाची चांगलीच साक्ष पटते !! नानातऱ्हेची दुर्गंधी, कढणारी नदी, तरवारीच्या पानांचें वन, संतप्त वालुकामैदान इत्यादि हालांतून जाऊनही धर्म आपल्या भावादिकांच्या दर्शनास उत्सुक होऊन मार्ग आक्रमीत होता, व अंधार, दुर्गंधी व प्रेतराशी यांवांचून पुढें कांहींच नाहीं अशा समजुतीवर तो वाटाड्या–देवदूताबरोबर परत सुद्धां फिरणार होता, इतक्यांत " धर्मा, तूं इथून जाऊं नकोस रे! तुझ्या येथें असण्यानें आमच्या यातना कमी होत आहेत!" असे शब्द धर्माच्या कानावर आले, व तुम्ही कोण आहां व तुम्हांस एथें कां टाकलें आहे, असें त्यानें विचारल्याबरोबर–" कर्णोऽहं भीमसेनोऽहं अर्जुनोऽहमितिप्रभो । नकुलः सहदेवोऽहं धृष्टद्युम्नोऽहमित्युत । द्रौपदी द्रौपदेयाश्च " याप्रमाणें एकच गलका–दुःखाच्या उतावळीचा गलका–करून त्यांनीं सांगितलें! " कांहीं हरकत नाहीं. " यत्र ते ममसस्वर्गो " असें म्हणून व त्यांस बरें वाटत आहे तर तेथेंच राहावयाचें असें ठरवून त्यानें तसा निरोपही त्या दूताबरोबर लावून दिला, पण इतक्यांत 'ट्रॅन्सफर सीन' होऊन तो पडदा–कृत्रिम नरकाचा, असत्य भाषणाबद्दल–'नरो वा कुंजरो वा' बद्दल क्षणैक दुःख देण्याचा–तो पडदा दूर झाला–वर गेला–व जिकडे तिकडे प्रकाशाचा लखलखाट, सुवासांचा घमघमाट, अप्सरांचें मधुर नृत्याचा मंजुल पदरव, इत्यादि इंद्रदरबाराचा थाट झाला, व सर्व कौरवपांडवादि मंडळी स्वस्वरूपांत अधिष्ठित झालेली आहेत असें आकाशगंगेंत सुस्नात झालेल्या दिव्य देहधारी धर्मानें पाहिलें! व महा-

भारताच्या नाटकाचा शेवटच्या अंकाचा शेवटचा ड्रॉप पडला. आता फक्त 'भरतवाक्य'च राहिलें आहे, व तें म्हणजे विहंगमदृष्टया कथानकांतील प्रमुख पात्रांवरून शेवटची दृष्टि टाकण्याचें होय ! तेंवढें करून—म्हणून आपण हें बरेंच लांबलेलें नाटक खलास करूं !

महाभारतांत किती तरी विविधप्रकृतीच्या व्यक्ति आपणास पहाण्यास मिळतात. त्यांच्या स्वभावादिकांबद्दल जातां जातां कथानकाच्या ओघांत जें जें लिहिलें आहे तें तें वाचकांनीं जरूर जमेस धरावें व त्यास पूरक असेंच पुढील स्वभाववर्णन वाचावें, अशी रामायणातल्याप्रमाणेंच इथेंहि त्यांना विनंति आहे. कथानकाच्या ओघाप्रमाणेंच जीं जीं पात्रें आपल्या डोळ्यां-समोर येतात त्यांच्याकडे पाहतां प्रथम—

राजा शंतनु हा डोळ्यापुढें उभा राहतो. तो राजा दशरथाप्रमाणें शूर होता, पण त्याच्याचप्रमाणें थोडासा विलासी होता—रंगेल म्हातारा होता. कैकयीच्या सौंदर्यास भाळलेल्या राजा दशरथास ज्याप्रमाणें आपल्या स्त्रैणपणानें रामरायासारख्या सुकुमार बालकास वनवासास पाठ-वावें लागलें त्याचप्रमाणें म्हातारपणींहि बुभुक्षित असलेल्या आपल्या कामवासनेच्या पायीं—( कितीही उलट यत्न केला तरी )—भीष्मासारख्या तरुण युवराजाच्या भावीं संसारसौख्याची होळी पहाण्याचें शंतनूच्या नशिबीं आलें. तो जसा शूर होता तसाच पुत्रवत्सलहि होता. व म्हणू-नच त्यास भीष्मांच्या भयंकर प्रतिज्ञेचें—अज्ञातत: केलेल्या प्रतिज्ञेचें फारच वाईट वाटलें. व त्यांनीं त्यास 'इच्छामरणी'पणाचा वर दिला. पण या सर्वांची माती करणारा दुर्गुण म्हणजे—" नौकेमाजी धीवरकन्या संगोत्सुक झाला ! "

पण याच्याच बरोबर दुसरें जें झगझगीत चित्र दृष्टीस पडतें तें पाहून खरोखर " बुद्धीला गरगर फिरल्यासारखें वाटतें, मति कुंठित होते, वाचा स्तिमित होते," डोळे दिपून जातात व साहजीकच हॅम्लेटप्रमाणें "हें चित्र पहा व हें चित्र पहा ! " असें उद्गार तोंडावाटें बाहेर पडतात. सात आठ पुत्र होऊन म्हातारपणींहि कोळ्याच्या पोरीचा अभिलाष धरणारा विषयी शंतनु कुठें, व त्याच्याच पोटीं आलेला पण त्याहून अत्यंत भिन्न प्रकृतीचा, वडिलांच्या सुखासाठीं तारुण्यांतच आपल्या भावी संसारसुखावर लाथ

मारून आजन्म कडकडीत ब्रह्मचर्याची प्रतिज्ञा करणारा भीष्म कुठें ! भांगेंत तुळस उगवावी असा हा प्रकार आहे. परस्परविरुद्ध अशा दोन टोकांची गांठ पडावी असा नैतिक सृष्टींतलाहि संबंध आहे कीं काय कोण जाणे ! भौतिक शास्त्राच्या दृष्टीनें यांत विशेष आश्चर्यकारक कांहीं नाहीं. कारण ' सारखें सारख्यास आकर्षितें, ' तसेंच कित्येकदां अत्यंत भिन्न गुणधर्मी पदार्थांचेंहि एकत्र आकर्षण होत असतें. पण हीच गोष्ट जननशास्त्राच्या नैतिक सृष्टींतही पुष्कळदां खरी ठरत असावी, असें वाटतें. व " शुद्धबीजा पोटीं, फळें रसाळ गोमटीं " हा नियम सर्वव्यापी नाहीं ही गोष्ट मनास पटते. नाहीं तर शिवाजीसारख्या अत्यंत निर्मल नीतिमंताच्या पोटीं संभाजीसारखा नीतिमत्तेला पायाखालीं तुडवणारा नीच नरपशु कां जन्मास यावा, राघोभराऱ्यासारख्या शूर जवानमर्दाचें पोटीं दिव्याच्या घाटाकडे धूम ठोकणारा भ्याड भागुबाई बाजीराव कां निपजावा, इत्यादि गोष्टींचा उलगडा होत नाहीं. " बीज तसें फळ " ह्या सर्वसाधारण नियमास हरताळ फांसणारीं पुराणांतून व इतिहासांतून पुष्कळ उदाहरणें सांपडतील. आमच्या भीष्माचार्यांचें उदाहरण त्यांपैकींच एक होय. भीष्माचार्य जसे अंतःशत्रूंस–षड्रिपूंस—कर्दन काळ होते, तसेच बाहेरच्या शत्रूसही आपल्या भयंकर पराक्रमानें ते चळचळा कांपावयास लावीत असत. थोडक्यांत म्हणजे ' कार्लाइल ' नांवाच्या पाश्चात्य तत्ववेत्त्याच्या " शूर हा सर्वत्र शूरच " ह्या उक्तीस साजेसेच आमचे भीष्माचार्य होते. राजकारण, धर्म, युद्धशास्त्र, भक्ति, नीति, इ. प्रत्येक गोष्टींत त्यांचा झगझगीत शूरपणा–शारिरिक मानसिक व बौद्धिक तडफच–दृष्टीस पडते. आतां मनुष्य ह्या दृष्टीनें त्यांच्याहि हातून चूक झालीच नसेल असें नाहीं. पण प्रभु रामरायाप्रमाणेंच ह्यांचाहि स्वभाव त्यानें जास्तच उठावदार दिसतो, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. त्यांनीं धर्मराजास सांगितलेली राजनीति, द्रौपदीच्या प्रश्नावर " धर्म परम सूक्ष्म असे " इ. दिलेलें उत्तर, तसेंच सत्याची " यद्भूतहितमत्यंतं तत्सत्यमिति धारणा । " अशी केलेली व्याख्या, " निष्पांडवी " पृथ्वी करण्याच्या प्रतिज्ञेनें पांडवांचें दणाणलेलें धावें, व कृष्णप्रतिज्ञा मोडण्यास लावतांना केलेला घनघोर संग्राम, बाणांच्या आसनावर–शर–

पंजरीं पडले असतांहि मुखानें कृष्णनामाचा चाललेला गजर, व आजन्म ब्रह्मचर्यव्रताचें कडकडीत प्रतिज्ञापालन, यांवरून त्यांची अनुक्रमें राजकारण, धर्म, युद्धशास्त्र, भक्ति, व नीति इ. मध्यें असणारी ख्याती व पारंगतता दिसून येते.

यानंतर धर्मराजाची मूर्ति डोळ्यापुढें उभी राहते. धर्मराज म्हणजे धर्माचा—यमधर्माचाच—पुत्र तो! अर्थात् धार्मिक वृत्ति त्यांच्याठायीं पुरेपूर होती. कीचकासारख्या दुष्टास मारण्यास इकडे भीम उतावीळ झाला असतांना—कीचकवधांत कोणचाही अधर्म नाहीं हें उघड उघड दिसत असतांहि—“ पण भीमा, यांत कांहीं वावगें तर होणार नाहींना ? ” या धर्माच्या उद्गारावरून तो किती पापभीरु होता हें दिसून येतें. तथापि अशा धर्मासही ‘ राजकारणासाठीं ’ “ नरोवा कुंजरोवा ” कसें करावें लागलें हें आपण मागें पाहिलेंच आहे. तसेंच द्यूतासक्तीच्या भयंकर व्यसनानें त्यास किती झपाटलें होतें व त्याच्याचपायीं पुढील अनर्थपरंपरा त्यावर कशी कोसळली, हेंहि आपण पाहिलें आहे. त्याचा स्वभाव फारच साधाभोळा होता. शकुनीसारख्या कपटपटूनें त्यास कसें चकविलें हें द्यूतवर्णनांत आलेंच आहे. तसेंच समरांगणावरही तो फारसा शूर नव्हता. कर्णासारख्या वीरांनीं त्यास कित्येकदां गोत्यांत आणून सोडून दिलें आहे, यावरून हीच गोष्ट सिद्ध होते. तथापि त्याचा स्वभाव मोठा दिलदार होता. यक्षप्रश्नाचे वेळीं “ माद्रीसुत आधीं उठावेत ” या त्याच्या मागणीवरून हीच गोष्ट प्रत्ययास येते. व त्याच यक्षप्रश्नाचे वेळीं त्यानें दिलेलीं उत्तरें त्याचें अगाध धर्मज्ञानहि व्यक्त करतात. त्याचे हृदयहि किती प्रेमळ व सहृदय होतें हें आपण नुकतेंच पाहिलें आहे. तसेंच तो सत्यवक्ता म्हणून प्रसिद्ध होता. फक्त एकदांच—द्रोणवधप्रसंगीं—तो खोटें बोलला. व त्याचा परिणामही तत्काळ दिसून आला. तथापि ह्या अपवादानें त्याच्या ‘सत्यवादि’त्वाचा नियमच सिद्ध होतो. दुर्योधनासारख्या दुष्टासही तो ‘ सुयोधन ’ म्हणे, यावरून त्याचें अजातशत्रुत्व चांगलेंच व्यक्त होतें. तसेंच चित्ररथ गंधर्वाशीं प्रसंग पडला असतां—“ वयं पंचाधिकंशतं ” ह्या त्याच्या उपदेशावरून तो राजकारणांतही हुशार होता हें दिसून येतें. त्याचप्रमाणें वनवासांत द्रौपदी व भीम “ लढाई करा;

प्रतिज्ञा मोडा व लढाई करा " असे मागें लागले असतांना " आज मी प्रतिज्ञा मोडून लढाई केली तरी भीष्म–द्रोण–कर्णासारख्यांना ठार मारण्याची ताकद तुम्हांत आहे काय ? मग उगीच अधर्म तरी कां करा ? " या त्याच्या उत्तरावरून कालदेशवर्तमानाप्रमाणें वागण्याची दूरदृष्टीही त्याचे ठायीं होती, हें उघड होतें. त्याचप्रमाणें " रक्षितसो धर्मातें आम्हाला धर्म ठाउका नान्य । " ह्या कृष्णांनीं कर्णास दिलेल्या उत्तरावरून प्रत्यक्ष परमात्म्याचेंहि धर्मराजाबद्दल किती उच्च मत होतें हें चांगलेंच व्यक्त होतें ! तसेंच कृष्णशिष्टाईच्या वेळीं " लढाईचा प्रसंगच होतां होईतों न यावा" व "पांच गांवें मिळालीं तरी चालतील " ह्या त्याच्या म्हणण्यावरून तो शांतताप्रधान व अल्पसंतुष्ट होता हेंही दिसून येतें. थोडक्यांत म्हणजे महाभारतकालीन तो धुष्कळसा महात्मा गांधीच होता ! असें म्हणावयास हरकत नाहीं.

पण याच्याच उलट दुर्योधन पहा. दुष्टपणाचा व अधर्माचा पुतळाच तो. व्यासांनीं अशा विरोधी चित्रांच्या दुकली महाभारतांत किती तरी मांडल्या आहेत. लाक्षागृह, कपटद्यूत, द्रौपदीवस्त्रहरण, व सुईच्या अग्रावरील मातीहि न देण्याची त्याची दर्पोक्ति हीं त्याची अधर्मप्रवृत्ति चांगली उघड करतात. तो गदायुद्धांत चांगला प्रवीण होता व राजाहि चांगला होता. कर्णपक्षीय त्याचें भांडणहि योग्यच होतें. पण एकंदरींत गुण थोडे व दुर्गुण फार अशी ही स्वारी होती.

कर्णाचीही कांहींशी अशीच स्थिति होती. चांगल्या वाईट गुणांचें तो एक अलौकिक मिश्रण होता ! कर्णाचें दातृत्व प्रसिद्ध आहे. एखादा गृहस्थ दानशूर असल्यास त्यास " कर्णासम दानशूर " म्हणतात–नेहमीं कर्णाची उपमा देतात. " कर्णासारखा दाता " किंवा " कर्णासारखा उदार " ही उपमा ठरून जाण्याचें कारण त्याचें दातृत्व व औदार्यच असें लोकविलक्षण होतें कीं, त्याच्या ह्या अतुलनीय औदार्याची स्तुति व्यासादि सर्व कवींनींही मुक्त कंठानें करावी. जन्मजात अंगावरलीं कवचकुंडलें मागण्यास आलेल्या ब्राह्मणास त्यानें तीं काढून दिलीं, तसेंच आपल्या आजन्म मैत्रीचें अखंड दान त्यानें राजा दुर्योधनास देऊन, कृष्णाच्या व कुंतीच्या शब्दास न भुलतां तें त्यानें आमरणांत कसें

पाळलें हेंहि आपण पाहिलेंच आहे. तसाच तो अर्जुनाहूनही कांकणभर जास्तच शूर वीर होता हें प्रत्यक्ष भगवंतांनींही अर्जुनास सांगून एके प्रसंगीं पटवून दिलेलें आपण वाचलेंच आहे. तसाच तो सुंदरही होता! फक्त त्याच्या जातकुळीच्या हीनत्वाचे "रक्तलांछनाचा" टिळा—तें "सैतानी चक्र" मात्र त्यास पदोपदीं छळीत होतें. त्याचप्रमाणें त्याच्या ठिकाणीं कित्येक दुर्गुणही होते. पण त्यांचा विचार आपण सविस्तरपणें मागें केलाच आहे!

त्यानंतर आपण पांडवांतील मुख्य अशा व त्यामुळेंच कदाचित् पुष्कळदां 'पांडव' ह्याच नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या, श्रीकृष्णभक्तींत उत्कट प्रेमी अशा, व स्वशौर्याचे बळावर ज्यांनें 'धनुर्धारी' 'धनंजय' 'सव्यसाची' 'परंपत' इत्यादि नांवें प्राप्त करून घेतलीं, त्या नरश्रेष्ठ अर्जुनाकडे वळूं या. त्याच्याकडे दृष्टिक्षेप केला असतां ठळकपणें डोळ्यांपुढें त्याचे दोन गुण उभे रहातात; व ते म्हणजे त्याची अलौकिक श्रीकृष्णभक्ति, व असामान्य शौर्य. "देखा नवल तया प्रभुचें। अद्‌भुत प्रेम भक्ताचें। जें सारथ्यपण पार्थाचें। करीतसे॥" या ज्ञानोबारायांच्या उक्तीप्रमाणें श्रीहरीनें ज्याचें सारथ्य सुद्धां पत्करलें—"धुतो अर्जुनाचे घोडे। सदा राहे मागें पुढें।" याप्रमाणें ज्या महाभागाच्या घोड्यांची चाकरी बजावून त्याचा खासदार-मोतद्दार-खुद्द रमापति भगवान् बनले त्या अर्जुनाच्या भक्तिभाग्याला खरोखर सीमाच नाहीं! श्रीकृष्णांचा दुसरा अलौलिक भक्त उद्धव यास एकदां श्रीकृष्णांच्या अर्जुनावरील विशेष प्रीतीचें वैषम्य वाटलें. त्यावेळेस उद्धवाची खात्री करण्यासाठीं देव उद्धवास घेऊन अर्जुनाकडे गेले. अर्जुन स्नान करून केंस मोकळे सोडून पलंगावर निद्रिस्त होत्साता पहुडला होता. "उद्धवा," देव म्हणाले, "पाहिलीस कां अर्जुनाची ही दिव्य समाधी?" उद्धवास याचा अर्थ न कळून तो विस्फारित नयनानें श्रीकृष्णाकडे पाहूं लागला. तेव्हां देव हंसून म्हणाले, "उद्धवा, पलंगावरून खालीं भूपृष्ठापर्यंत पसरलेल्या त्याच्या लांब, सडक व सुस्नात अशा केशराजीजवळ आपला कान दे, म्हणजे मी म्हणतों याची तुला प्रतीति येईल!" उद्धवानें कान केशराजीजवळ नेला तोंच "कृष्ण कृष्ण जय। कृष्ण कृष्ण जय।" असा मधुर गंभीर ध्वनि संथपणें सुरू असलेला

त्यास ऐकूं आला ! उद्धवाचा गर्व जिरला व वैषम्य पळालें ! ज्याच्या प्रेमाखातर देवांनीं आपल्याजवळचें " गुह्यात् गुह्यतरं " असें ज्ञानामृत त्यास त्याच्या व्यामोहाचे प्रसंगीं पाजलें, ज्याच्या रक्षणार्थी देव स्वतःची प्रतिज्ञाही विसरून ' अत्याचार ' करणाऱ्या भीष्मांच्या डोक्यांत चक्र घालण्यास सरसावले त्याच्या अलोट भक्तीचें महिमान कोणी जाणावें ? राजसूययज्ञाचे वेळीं ज्या पांडवांच्या प्रेमाखातर एखाद्या सामान्य वाढप्याप्रमाणें प्रभूंनीं ब्राह्मणांच्या उष्टया पत्रावळी काढल्या, त्या पांडवांची भक्ति किती थोर असेल बरें ? अहाहा ! धन्य त्या महाभाग पांडवांची! त्यांतलाच आमचा अर्जुन होता. त्याच्या भावाला देवांनीं भुलावें असाच तो भक्त होता ! अर्जुनाचें शौर्यही तसेंच विलक्षण होतें. वृक्षावरील भास पक्ष्याचे डोके उडवणारा, द्रुपदराजास रथास बांधून आणणारा, द्रौपदीस्वयंवरांत मत्स्यनेत्रवेध करणारा, शस्त्रास्त्रविद्येच्या परीक्षेंत नाना चमत्कार करणारा, सुभद्राहरणप्रसंगीं ' यादवचमु मशका-प्रमाणें उडविणारा,' किरातवेषधारी शंकरांशीं झुंजून त्यांपासून पाशुपतास्त्र मिळविणारा, उत्तर–गोग्रहण करणाऱ्या भटांना–कौरवयोध्यांना पळवून विराटाच्या गांयीं सोडविणारा, कालखंजासारखे प्रतापी राक्षस ठार मार-णारा, निवांतकवचांचा 'ठावो फेडणारा', व प्रत्यक्ष समरांगणांवर–कुरुक्षेत्रांवर असामान्य पराक्रम गाजविणारा बलसागर वीरशिरोमणी अर्जुन शूर नव्हता असें कोण म्हणेल ?

त्यानंतर भीमदादांची मूर्ति डोळ्यांपुढें उभी रहाते. भीमाचा पराक्रम किती अद्‍भुत होता याची साक्ष जरासंधाच्या हाडचे फांसेच देत होते! बकासुरास ठार मारणारा, कीचकाला एखाद्या घुंगुरट्यासारखा चिरडणारा, व दुःशासनाचा कंठनाळ चिरणारा भीम किती विलक्षण शूर होता ह्याची कल्पनाच केली पाहिजे! तसेंच इतका तापट असूनही वडील भावाच्या–धर्माच्या–आज्ञेबाहेर त्यानें कधींहि पाऊल टाकलें नाहीं. श्रीकृष्णाची भक्तीही त्याची किती उत्कट होती हें दुःशासनवधानंतर आनंदानें बेहोष झालेल्या व दुःशासनाचा खून चढलेल्या अवस्थेंत तो प्रथम श्रीकृष्णा-कडे " हर्षे नाचत " गेला व त्यास कडकडून भेटला, यावरूनच दिसून येतें ! कृष्णसख्याला तो अशा प्रसंगींही विसरला नाहीं !

तोच दुःशासन पहा ! दुर्योधनाचाच भाऊ तो ! तेव्हां–" फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग ।" असला निर्लज्ज पशुपणा करण्यास तो यत्किंचित्ही कचरणें शक्यच नव्हतें.

पण अशा दुष्ट कौरव शतकांतही विकर्णासारखा सत्यभक्त निघालाच, व त्यानें द्रौपदीवस्त्रहरण प्रसंगीं–" बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोलाहो " याप्रमाणें द्रौपदीस होणाऱ्या अन्यायाचा एकच गिल्ला करून सोडला, वगैरे भाग आपण मागें पाहिलाच आहे.

शकुनिमामा म्हणजे पक्के कपटपटु जुवेबाज होते व त्यांनीं आपल्या फाशांचा फांस–तांत धर्माच्या गळ्यांस करकचून बांधून द्रौपदीसह सर्व पांडवांचा जीव त्यांत कसा गुदमरून टाकला! हें आपण मागें पाहिलेंच आहे. असा–" हा न बरा, बुडवाया शिरला या राजमंदिरीं कवडा ।"–असा हा मामा होता !

नकुलसहदेव हे वयानें जरी लहान होते तरी सिंहाचेच छावे होते ! कर्णासारख्या वीरावरही हात टाकण्यास नकुलानें कमी केलें नाहीं व खुद्द वरील ' मामांचा ' बळी तर आमच्या सहदेव बाळानेंच घेतला आहे !

द्रोणाचार्य हा मोठा मानधन पुरुष होता. राजा द्रुपदानें भरदरबारांत केलेल्या अपमानाचा सूड त्यानें कसा पुरा उगवलान् हें आपण कथानकाच्या प्रारंभीं पाहिलेंच आहे. तसेंच तें शस्त्रास्त्र विद्येंतही कुशल होते ही गोष्टहि त्यांस कौरव पांडवांचे त्या कामीं शिक्षक–गुरु नेमले होते यावरूनच सिद्ध होते. तसेंच ते अत्यंत पुत्रवत्सल होते व ह्याच गोष्टीचा फायदा घेऊन त्या अजिंक्य वीरास मारण्यास प्रत्यक्ष धर्मांनीं–" नरोवा कुंजरोवा " केलें होतें. अस्तु.

बळरामदादा साधुसंतांचे–यतीतापसींचें किती भुकेले होते, किती भोळसट होते, किती मनमोकळे होते, किती धांदल्या स्वभावाचे होते, व प्रसन्नक्षणीं उदार तर कोपिष्टक्षणीं आकाश पाताळ एक करणारे कसें होते, इत्यादि गोष्टी आपण "सुभद्राहरण"प्रसंगीं पाहिल्याच आहेत.

अश्वत्थामा द्रोणाचार्यांचाच पुत्र असल्यामुळें त्यानेंहि आपल्या पित्याच्या मृत्यूचा सूड उगविण्याचा कसा घुरा घाट घातला होता हें आपण नुकतेंच वाचलें आहे. पण धन्य त्या महाभागाची कीं, त्यानेंही

गांधारी ही खरी पतिव्रता होती. आपला पति आंधळा आहे हें पाहून तिनेंही आपल्या डोळ्यांस झांपड घालून घेतलें व ती अंधपतीची अंध स्त्री होऊन राहिली. यांत, "आपल्या पतीस जर नेत्रसुख नाहीं तर आपण तरी तें कशास घ्यावें" हीच उत्कट भावना—पतीच्या सुख दुःखांशीं एकजीव होण्याची कल्पना—आहे. राजघराण्यांतील ती स्त्री असल्यामुळें तिला तें शक्य झालें, म्हणून गरिबांनींही तसेंच करून भागणार नाहीं. त्यांत तारतम्यभाव हा ठेवलाच पाहिजे.

धृतराष्ट्र हा कसा लोभिष्ट होता, किती कमकुवत मनाचा होता, त्याचा मुलावर बिलकुल दाब कसा नसे, व गुलामागिरींतून मुक्त करून पुन्हां द्यूतास बोलावण्यासारख्या गोष्टी करणाऱ्या त्या वृद्धाचे मनावर सदसद्वृत्तीच्या लाटा कशा सारख्या उठत होत्या—पण त्यांत असद्वृतीच कशा अधिक असत, तसाच तो कसा बलवान् होता, व पुढें कसा सात्विक बनला इत्यादि भाग आपण नुकताच वाचला आहे.

शेवटीं मोठे असे राहतां राहिले श्रीकृष्ण! पण त्यांचें रम्य चरित्र स्वतंत्रच वर्णन करावयाचें असल्यामुळें महाभारताचा येथेंच शेवट करून तें यथामति गाण्यास ज्या प्रभू श्रीकृष्णानें बुद्धि दिली त्याच्याच चरणीं हें अर्पण करून आतां आपण त्याच्याच—पूर्णावतारी श्रीकृष्णाच्या—चरित्राकडे वळूं.+

---

+ हें चरित्र "भगवान् श्रीकृष्ण!" ह्या नांवानें मागेंच प्रसिद्ध झालेलें वाचकांस ठाऊक आहेच.

—ग्रंथकर्ता.



# मंडळाचीं पुस्तकें.

## गडकरी वाङ्मय.

| | | | |
|---|---|---|---|
| सचित्र प्रेमसंन्यास-कापडी ... | १ | ४ | ० |
| सचित्र संगीत पुण्यप्रभाव-कापडी ... | १ | ४ | ० |
| सचित्र " एकच प्याला-कापडी ... | १ | ४ | ० |
| सचित्र " राजसंन्यास-कापडी ... | १ | ४ | ० |
| सचित्र " वेड्यांचा बाजार-कापडी | १ | ० | ० |
| वाग्वैजयंती ( समग्र कविता-संग्रह ) | २ | ० | ० |
| सचित्र संगीत भावबंधन " | १ | ४ | ० |
| विनोदी लेखसंग्रह " ( छापत आहे ) | | | |

**कै. अण्णासाहेब किर्लोस्कर व श्रीयुत चिं. ग. कोल्हटकरकृत.**

| | | | |
|---|---|---|---|
| सचित्र संगीत रामराज्यवियोग ... | १ | ० | ० |

**श्रीयुत ल. ब. भोपटकरकृत**

| | | | |
|---|---|---|---|
| सचित्र नवरत्नांचा हार ... | १ | ० | ० |

**श्रीयुत शंकर यादव पॉक्षेकृत**

| | | | |
|---|---|---|---|
| हिंदुस्थानची शासनपद्धति ... | १ | ८ | ० |

**कॅप्टन गोपाळ गंगाधर लिमयेकृत**

विनोदी लेखसंग्रह

**श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जरकृत**

| | | | |
|---|---|---|---|
| संगीत राजलक्ष्मी ... | १ | ४ | ० |

नाट्यसुधा ( गडकरी यांच्या नाटकांतल्या चीजा ) छापत आहे

संगीत नंदकुमार छापत आहे

**के. वा. वा. केळकरकृत**

सचित्र नाटिका ( छापत आहे )

**श्री सरस्वती मंडळ.**

जमखंडीकरांचा वाडा, शनिवार पेठ.

**पुणें शहर.**